भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प पंचेचाळिसावें.

# पुण्यश्लोक.

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

भगवान् श्रीकृष्ण.

# प्रस्तावना.

—:०:—

पथभ्रष्ट राष्ट्राला मार्गदर्शक म्हणून सर्वांच्या अग्रभागीं चालण्याला महात्मा-गांधी हे किती योग्य पुरुष आहेत, याची साक्ष आतां सर्व राष्ट्राला चांगल्या रीतीनें पटली आहे. ते जनतेंत वावरत होते, तेव्हां त्यांचें नेतृत्व सगळ्या राष्ट्रानें एका मुखानें कबूल केलें होतें आणि आज ते तुरुंगांत गेल्यावर राष्ट्राला कोणी नेता उरला नाहीं, हेंहि सगळें राष्ट्र आज उघड्या डोळ्यानें पहात आहे. महात्माजी तुरुंगांत पडले तर, पडोत. राष्ट्राचें दुर्दैव ! पण त्यांनीं आंखून दिलेल्या मार्गानें जनतेनें जावें तर जनतेच्या या श्रद्धेचा नाश करण्याचा निदान महाराष्ट्रांत तरी आटोकाट प्रयत्न होत आहे. असा प्रयत्न होऊं नये असें कोणाचें म्हणणें असलें, तरी इतकें खरें कीं हा प्रयत्न अवेळीं होत आहे, असें म्हणण्या-शिवाय इलाज नाहीं. महात्माजींनीं जेव्हां आपल्या मार्ग चतुष्टयाची आंखणी केली आणि ज्या वेळीं सर्व राष्ट्रानें त्याला आपली मान डोलविली त्याच वेळीं वस्तुतः या आमच्या महाराष्ट्रीय वीरांनीं कुस्तीच्या कव्यांत दंड थोपटून उत-रावयास पाहिजे होतें; परंतु राष्ट्राचें जेव्हां दुर्दैव ओढवलें तेव्हां त्या काळाला सोन्याची संधी म्हणून मिशीला तूप लावून दंड थोपटणें यांत पौरुष नसून अस-ल्यास नामर्दपणाच आहे. सिंह पिंजऱ्यांत सांपडल्यावर वात्रट मुलें जशीं बाहेरून खडे मारतात, त्याप्रमाणें आतां कोणी ' सुतानें स्वराज्य मिळतें तर तें कोष्ट्यांना केव्हांच मिळालें असतें. ' ' आफ्रिकेंत राहिल्यामुळें निग्रोच्या संसर्गानें गांधींचा मेंदु विकृत होऊन ते अव्यवहार्य तत्त्वें प्रतिपादन करूं लागले आहेत. ' वगैरे धोंडे गांधींच्या अंगावर फेकून आपलें कर्तृत्व गाजविण्याची अहिमहमिका महारा-ष्ट्रांत बऱ्याच स्पष्टतेनें नजरेस येऊं लागली आहे.

यांत मुख्य धोक्याचें स्थळ आहे, तें निराळें आहे. तुरुंगाचें भय नष्ट करावें म्हणून एक दोन नव्हे तर देशांतले पंचवीस तीस हजार तरुण सर्व सुखावर लाथ मारून तुरुंगांत गेले आहेत. हे आतां हळूहळू तुरुंगाच्या बाहेर पडूं लागले आहेत. बाहेर पडतां क्षणींच ते आपल्या मायभूमीकडे मोठ्या आशेनें पाहतात; परतु दुसऱ्याच क्षणीं पालटलेली परिस्थिति पाहून ते निराश होतात आणि प्रसंग पडल्यास पुन्हां तुरुंगांत जाऊं, ही त्यांची उमेद पार खचून जाते. तरुणांच्या चित्तांत अशा प्रकारची उमेद असणें हें राष्ट्राच्या केवढ्या गरजेचें आहे, याचा

निर्णय कधींच झाला आहे; तेव्हां या उमेदीवर प्रहार करून तेथे नाउमेदीचें व निराशेचें पीक निर्माण करण्याचें पातक राष्ट्राला किती काळ नडत राहील, हें कोणीं सांगावें !

पुढीफुट—जानसन एकदां आपल्या भाषणांत म्हणाले कीं, ' एके वेळीं मला एक विद्वान दारुडा भेटला आणि दारू पिणें कां श्रेयस्कर आहे, याचे दाखले त्यानें दहापांच ग्रंथांतले काढून दाखवून मला अगदीं चित केलें, असा त्यानें अभिमानहि व्यक्त केला. मला त्यावेळीं खरोखरच हंसूं आलें. कारण दारू पिणें हें सर्वप्रकारें अनर्थकारक आहे, अशा पांचशें ग्रंथांचीं त्याला नुसतीं नांवें देखील माहीत नव्हतीं. ' याच न्यायानें महात्माजींच्या विरुद्ध एकादी जळकी काडी सांपडली, तरी ती देवघरांत ठेऊन तिची आरती करावयाची आणि गांधीच्या बाजूचें सुंदर ताजें कमळ दृष्टीस पडलें, तरी त्याची गंधवार्तांहि कोणास होऊं द्यावयाची नाहीं, ही न्यायबुद्धि कीं क्षुद्रबुद्धि ? आणि मन इतकें अधोगामी झाल्यावरहि मग न्यायाचा ताजवा हातांत धरण्याचा उगीच फार्स कशाला ? आपण चुकणार नाहीं, असें स्वतः महात्मा गांधीहि म्हणत नाहींत; पण ह्या न्याय महात्मा गांधींचे दोष तपासताना स्वतःचे डोळे कितपत निर्दोष आहेत, हें अशा शाहण्यांनीं अगोदर शोधावयाला पाहिजे. गांधी चुकीला पात्र आणि हे अहंमन्य मात्र प्रति ब्रह्मदेव, ते का कधीं चुकणार आहेत ! पण स्वतःचे दोष कबूल करण्याची जी माणुसकी गांधीजवळ शिल्लक आहे, तेवढी यांच्या जवळ असेल तर ! असहयोगाच्या आंदोलनाचे प्रवर्तक व परिचालक महात्मा गांधी आज जनतेंत नसून कारागृहांत आहेत. ते तुरुंगांत जाण्याच्या अखेरच्या घटकेपर्यंत सगळा देश त्यांनी एकसूत्री बनविला होता. राष्ट्रपुरुषाची छटा बदलून त्याच्यांत चैतन्य उत्पन्न झालें होतें. हिंदुस्थानात अमवस्त्राविना एकहि व्यक्ति असतां कामा नये, या दिशेनें त्यांनीं आपल्या कार्यांची रूपरेषा आंखून जनतेला स्वावलंबनाचा मार्ग सुकर करून दिला होता. हिंदू आणि मुसलमान आपल्या धर्माभिमानास फाजील महत्त्व न देतां महात्माजींच्या आज्ञेवरून भावंडाप्रमाणें एकमेकांशीं वागूं लागले होते; परंतु महात्माजी तुरुंगांत गेल्याबरोबर राष्ट्राला अणू विजेच्या धक्याप्रमाणें झटका बसून निराशेचें वातावरण उत्पन्न झालें. एवढा मोठा देश, कोट्यवधी जनता, सहस्रावधी दादशूर, पण राष्ट्राला गांधींच्या मागून गांधीच्या तोडीचा नेता मिळाला नाहीं ! उलट राष्ट्राला पथभ्रष्ट करणारे दिवटे मात्र लाभले. देशाचें दुर्दैव म्हणतात तें हेंच ! !

महात्माजींनीं आपल्या अनेक लेखांत व भाषणांत, एक मुद्याची गोष्ट प्रतिपादिली आहे कीं, आपण ज्यांच्याशीं भांडत आहों त्या ब्रिटिश राजनीतीचें चारित्र्य कसेंहि असो, पण त्यांची एकजूट खरोखरच शिकण्यासारखी आहे. व्हाइसरायसारख्या उच्च अधिकाऱ्यापासून तों गोऱ्या पोलिस सार्जंटपर्यंत आपल्या वीण्याच्या तारा कधींहि ते बदसूर होऊं देत नाहींत. आणि ब्रिटिश व्यापारीहि या सुराला साथ मिळेल अशा रीतीनें आपलें ढोलकें तालबद्ध वाजवीत आहेत. उलटपक्षीं आम्हा हिंदी जनतेचे पुढारी काय करीत आहेत ? जिकडे पहावें तिकडे बदसूर आणि बेताल ! देशासाठीं आम्ही आमच्या मानापमानाच्या क्षुद्र *भावना आणि स्वार्थाच्या हिडिस कल्पना सोडून देण्यास जोंपर्यंत तयार होणार* नाहीं, तोंपर्यंत भरतभूमीची ग्रहदशा संपणार नाहीं, हेंच निश्चित !

एक महाराष्ट्रीय.

# पुण्यश्लोक.

१

आज साऱ्या जगांत सर्वश्रेष्ठ पुरुष कोण आहे, या प्रश्नाची चर्चा केल्यास ती तुम्हांस मनोरंजक वाटेल असा माझा समज असल्यामुळें आज याच विषयावर मी बोलणार आहें. या प्रश्नाला उत्तर शोधण्याचा यत्न आपण सुरू केल्याबरोबर आपलें मन गत महायुद्धाच्या दिवसांकडे आपोआपच वळतें. त्यावेळीं प्रचंड जबाबदारी ज्यांच्या शिरावर येऊन पडली होती आणि अभूतपूर्व सत्ता ज्यांनीं हातांत खेळविली, त्यांच्या नांवांकडे आपली दृष्टि वळल्याशिवाय रहात नाहीं. विशेषतः १९१९ सालाच्या आरंभीच्या महिन्यांत जे युद्धप्रणेते पारीसशहरीं जमा झाले होते, त्यांजकडे आपलें लक्ष प्रथम जातें. या प्रश्नाचा विचार आज न करता त्या वेळीं करण्याचें आपण मनांत आणलें असतें, तर हा पुरुषश्रेष्ठ संयुक्त राष्ट्रांच्या प्रधानमंडळांतच कोठें तरी सांपडला पाहिजे, याबद्दल आपणा सर्वांची एकवाक्यता झाली असती. त्यावेळीं पारीसमध्यें जमलेलीं माणसें सामान्य नव्हतीं. जगांतील अत्यंत भयंकर प्रसंगांत त्यांची कसोटी लागली होती. साऱ्या दुनियेची संस्कृति ज्यांत बुडून जाणार, असा हा प्रसंग होता. आणि असल्या भयंकर आपत्तींतून या माणसांनीं जगाला बाहेर आणलें होतें. यांनीं मिळविलेला जय अगदीं पूर्ण स्वरूपाचा होता. युद्धकाळाच्या कसोटीवर हे पुरुष श्रेष्ठ ठरले यांत शंका नाहीं; पण आतां शांतता कालाची कसोटी त्यांस लागावयाची होती. जय मिळाला खरा; पण त्या जयाचा उपयोग कसा करावयाचा या ज्ञानाची परीक्षा द्यावयाची वेळ आतां आली होती आणि याच कठिण परीक्षेंत या पुरुषांपैकीं कोणीहि यशस्वी झाल्याचें दिसून येत नाहीं. म्हणून येथें ज्या गोष्टी त्यावेळीं घडून आल्या आणि विशेषतः तहाच्या कागदावर सह्या झाल्यानंतर जे प्रकार दिसले, त्यांवरून पुरुषश्रेष्ठ या पदवीला पात्र होण्याचा हक्क यांपैकीं कोणातरी व्यक्तीनें सिद्ध केला, असें म्हणतां येईल काय? युद्धाची आपत्ति टळली; पण शांततेची आपत्ति या माणसांनीं जगावर कोसळविली. शांतता परिषदेंत जमलेल्या पुरुषांपैकीं एकाच मनुष्याची कीर्ति माझ्या दृष्टीनें अबाधित राहिली आहे.

आहे की अशा प्रकारच्या साहित्यांत ती अमर होऊन बसेल. महायुद्ध सुरू झालें, तेव्हां फ्रेंच सरकारानें या शांततावाद्याची उचलबांगडी करून त्याला हद्दपार केलें. महायुद्ध संपलें, तरी त्याच्यामागें त्यांचे अनेक घोंटाळे अद्यापीहि शिल्लक आहेत. राष्ट्राराष्ट्रांतील द्वैतभाव अद्यापीहि पूर्वीसारखाच जागृत आहे. अशा स्थितींत हा द्वैतभाव मोडून सर्व राष्ट्रांनीं सलोख्यानें आणि बंधुभावानें नांदावें अशी सदिच्छा बाळगणारे जे कांहीं गृहस्थ युरोपांत आहेत, त्यांत रोलँड यांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे. रोलँड यांच्या हातून कांहीं प्रत्यक्ष क्रिया घडली असें म्हणतां येत नाहीं; तथापि हें अत्युच ध्येय आणीबाणीच्या प्रसंगींहि आपल्या चित्तापुढें त्यांनीं सदोदित बाळगलें आहे. जगप्रसिद्ध रशियन साधु लियो टॉलस्टॉय यांचा आणि रोमेन रोलँड यांचा वर्ग एकच आहे, इतकें म्हटलें, म्हणजे या गृहस्थाबद्दल कोणालाहि पूर्ण कल्पना येईल. टॉलस्टॉय यांच्यामागें त्यांची गादी चालविण्यास योग्य असा पुरुष साऱ्या युरोपांत कोणी असेल, तर तो रोमेन रोलँड हाच होय. साऱ्या एकोणिसाव्या शतकाच्या अवधींत टॉलस्टॉय यांनीं जें कार्य केलें, तें पुढें चालविण्यास आणि त्यांनीं पेरलेल्या बीजाची योग्य जोपासना करण्यास सर्व प्रकारें अधिकारी असा कोणी असेल, तर तो रोलँड हा होय. टॉलस्टॉय यांजप्रमाणेंच रोलँड हे अत्यंत साध्या राहणीनें राहतात. केवळ जीवितधारणाला आवश्यक अशा वस्तूंशिवाय चैनीचा असा पदार्थ त्यांजजवळ तुम्हांस एकहि आढळावयाचा नाहीं. टॉलस्टॉय यांजप्रमाणेंच प्रचंड बुद्धिमत्ता आणि कोमल अंतःकरण यांचा संयोग रोलँड यांजपाशीं आहे. टॉलस्टॉय यांजप्रमाणेंच शुद्ध व्यवहार सोडून आणि जड जगाच्या बाहेर जाऊन चैतन्याच्या अत्युच आकाशांत रोलँड हे वावरत असतात. मानवी जीविताचें रहस्य प्रेमचारित्र्य हेंच आहे, असा टॉलस्टॉय यांजप्रमाणेंच रोलँड यांचाहि निश्चय आहे. या पृथ्वीवर स्वर्ग कधीं अवतारावयाचा असेल तर त्याची सिद्धि परस्पर बंधुभावावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें व्हावयाची नाहीं, असें टॉलस्टॉय यांजप्रमाणेंच रोलँड यांचाहि सिद्धांत आहे.

युरोपावर घनघोर युद्धाची धाड पडणार हें स्वप्न रोलँड यांस अगाऊच पडलें होतें. साऱ्या युरोपांत या प्रचंड वणव्याची कल्पना फारच थोड्यांस झाली होती. असली आपत्ति युरोपावर कोसळूं नये म्हणून आपल्या हातून बनेल ती खटपट रोलँड करीत होते. याच दृष्टीनें जीन क्रिस्टॉफ ही कादंबरी त्यांनीं लिहिली आहे. साहित्याचार्य म्हणून जगांत कीर्ति मिळवावी या भाईचिन भावनेनें हा ग्रंथ त्यांनीं

निर्माण केला नसून जर्मनी आणि फ्रान्स यांच्या मनोघटनांची ओळख परस्परांस व्हावी, आणि या दोन देशांतील वैमनस्य नाहींसें होऊन त्यांच्यांत सलोखा उत्पन्न व्हावा, या एकाच हेतूनें ती त्यांनीं लिहिली आहे. महायुद्ध सुरू झालें, तेव्हां त्यानें निर्माण केलेल्या देशाभिमानाच्या वावटळींत न सांपडतां स्वतःचें अंतःकरण शुद्ध राखून इतरांच्याहि मनोवृत्ति वावरू नयेत अशी खटपट ते करीत होते. युद्ध हें मनुष्यजातीला कल्याणकारक आहे, असें म्हणणारा एक पक्ष युरोपांत बराच प्रबळ आहे. युद्धामुळें मनुष्याची स्वार्थप्रियता नाहींशी होते, त्याचें अंतःकरण अधिक उदार आणि अधिक विस्तृत होतें, असें या पक्षाचें म्हणणें आहे; पण या मताची अंधुक छायासुद्धां रोलंड यांनीं आपल्या अंतःकरणावर पडूं दिली नाहीं. इतकेंच नव्हे तर युद्ध ही एक घोर आपत्ति असून मानवी अंतःकरणांतील कोमल सद्भावनांचा नाश ती करते, या मताचें प्रतिपादन मोठ्या अट्टाहासानें ते करूं लागले. युद्ध चालू असताहि या उच्च भावना त्यांनीं मरूं दिल्या नाहींत. आणि युद्धाच्या समाप्तीनंतर हेंच महत्कार्य त्यांनीं पुन्हां हातीं घेतलें आहे. देशाभिमानाच्या जाज्वल्य विषानें करपून गेलेल्या अंतःकरणास सद्भावनारूपी जलाचा पुरवठा ते पुन्हां करूं लागले आहेत. या भयंकर विषाचें निर्मूलन होऊन तरवार पुरी मोडली जावी व प्रेममय परमेश्वराचें राज्य पृथ्वीवर अवतरावें म्हणून त्यांची खटपट पुन्हां सुरू झाली आहे.

महायुद्धानें सारें युरोपखंड मुळापासून हललें. युरोपीय संस्कृति कायमची नाहींशी होते कीं काय अशी भीति वाटूं लागली. अशा भयंकर स्थितींत या संस्कृतीचा कांहीं अवशेष दिसत असेल तर त्याचें श्रेय एखाद्या फॉश, क्लेमेनगो, लायड ज्यार्ज किंवा युद्धो युइलसनकडे नसून तें रोमेन रोलंड यांचच दिलें पाहिजे. जगाची स्थिति कांहीं सुधारेल हें स्वप्न कधीं काळीं प्रत्यक्ष सृष्टींत खरें व्हावयाचें असेल, तर तें वाचाळ राजकारणी पुरुषांच्या खटपटीनें होणार नसून रोमेन रोलंड यांसारख्या एकांतिक भक्तांच्या खटपटीनेंच होणार आहे.

रोमेन रोलंड यांच्यांत जी कांहीं उणीव आहे, ती अद्भुत आदर्शांची नसून त्याच्या प्रत्यक्ष व्यवहाराची आहे. आपल्या तत्त्वांचा आचार प्रत्यक्ष सुरू व्हावा या दृष्टीनें फारशी खटपट त्यांनीं केली नाहीं. सदोदित चालणाऱ्या तत्त्वचिंतनानें त्यांच्या बुद्धीला आणि अंतःकरणाला इतकें मार्दव आलें आहे कीं, व्यवहारांत उतरून त्याचें आघात सोसण्या इतकी सहनशक्तीच जणूं काय त्यांना नाहीं. सामान्य मनुष्याच्या पद्धतीनें वाढून आणि त्यांच्यांत मिसळून आपल्या

मतांची छाप त्यांजवर पाडावी, ही गोष्ट करण्यास अंतःकरणाला जी जडस्वरूपाची दृढता लागते, तिचा पुरवठा त्यांजपाशीं नाहीं. समाजघटना समूळ बदलून टाकण्यास लागणारें व्यावहारिक कर्तृत्व त्यांजपाशीं नसल्यामुळें अशा प्रकारच्या क्रांतीचें पुढारीपण स्वीकारणें त्यांना शक्यच नाहीं. लक्षावधी लोकांना एकत्र बांधण्यास लागणाऱ्या घटनाशक्तीचा त्यांजपाशीं अभाव आहे. यामुळें नवा समाज आमूलाग्र निर्माण करण्याचें कार्य रोलंड यांच्या हातून होण्यासारखें नाहीं. या कार्यासाठीं कोणत्या मार्गाचें अवलंबन करावें, याचा नकाशा, ते आंखून देतील; पण प्रत्यक्ष युद्धाच्या धुमश्चक्रींत स्वतः न शिरतां तें कार्य ते इतरांवरच सोंपवतील. टॉलस्टॉय यांजप्रमाणेंच त्यांची मनोरचना अशा प्रकारची आहे, यास त्यांचा इलाज नाहीं. आपलें चैतन्यसाम्राज्य सोडून पृथ्वीवरील दूषित वातावरणांत हे गृहस्थ कधींच उतरावयाचे नाहींत. सर्व पृथ्वीवर धुकें आणि धूर यांचा गडप अंधार पडला असतां दिशाभूल होऊं न देणारा एखादा तारा ज्याप्रमाणें तळपत असतो, त्याचप्रमाणें व्यवहाराच्या वावटळींतून बाहेर राहून दिशा दाखविण्याचें कार्य रोमेन रोलंड हे करीत असतात. व्यवहाराच्या धुक्यांत स्वतःचें तेज ते मलिन होऊं देत नाहींत. यांनीं दर्शीत केलेला मार्ग धोक्याचा कोठें आहे, त्यांत खांचखळगे कोठें आहेत आणि काटेरी कुंपणें कोठें आहेत, हें दाखविण्याचें कार्य इतर लहान सहान धुरकट दिवट्यांनींच केलें पाहिजे.

कल्पनासृष्टि आणि प्रत्यक्ष आचारसृष्टि यांचा विचार मनांत आल्याबरोबर दुसऱ्या एका महापुरुषाची आठवण मला होते. प्रथम जे तीन पुरुष मीं सांगितले, त्यांतच याचा अंतर्भाव होतो. हा दुसरा पुरुष म्हणाला म्हणजे रशियांतील सोव्हियट सरकारचा मुख्य प्रधान निकोले लेनिन हा होय. केवळ व्यक्तीच्या दृष्टीनें पाहतां लेनिन यांच्या हातांत जेवढी सत्ता आज एकवटली आहे, तेवढी दुसऱ्या कोणत्याहि व्यक्तीच्या हातांत ती नाहीं. रशियामध्यें आज जें कार्य लेनिन करीत आहे, त्याच्यासंबंधीं आपल्या कानावर आलेल्या अनेक विकृत कल्पना प्रथम आपल्या चित्तांतून दूर करून या कार्याचें परीक्षण आपणास केलें पाहिजे. लेनीन यांचीं तत्वें त्याज्य आहेत, असें घटकाभर मान्य करण्यासहि हरकत नाहीं, त्याचप्रमाणें त्यांचे राजकीय डावहि जगाला नुकसानकारक आहेत, असेंहि वाटल्यास म्हणा, लेनीन यांनीं जगाच्या संस्कृतीच्या विनाशाचें कार्य चालविलें आहे, असें कोणीं म्हटलें, तर त्यालाहि आपण क्षणभर हो म्हणूं; पण

इतक्या साऱ्या गोष्टी कबूल केल्या तरी लेनीन यांच्या अंगीं असलेली कर्तृत्व-शीलता नाकबूल करतां येत नाहीं. नेपोलियन बोनापार्ट हा जगाचें नुकसान करण्यासाठींच जन्माला आला होता आणि नीतीच्या अत्युच्च तत्वांस त्यानें हर-ताळ फांसला, असें म्हणणारे लोक आजहि आहेत; तथापि तो महापुरुष होता, आणि तो कर्तृत्वशाली होता, ही गोष्ट कोण नाकबूल करील ? नाहीं म्हणावयास केवळ अपवादात्मक उदाहरण वेल्स यांचेंच आहे. या एकाच ग्रंथकाराला ने-पोलियनच्या अंगीं कर्तृत्वशक्ति मुळीं आढळत नाहीं ! हाच प्रकार निकोले लेनीन यांचाहि आहे. साऱ्या जगांत याच्या इतका तिरस्करणीय राक्षस दुसरा नाहीं, असेंहि वाटल्यास म्हणा; पण तसें असलें तरी त्यांची कर्तृत्वशक्ति कोणा-लाहि अमान्य करतां येण्यासारखी नाहीं. त्यांच्या तुलनेनें आजच्या जगांतील सारे राजकारणी पुरुष केवळ वामनमूर्तीसारखे दिसूं लागतात. साऱ्या जगाची चालक शक्ति, या पुरुषाच्या ठिकाणीं जणूं काय आज एकवटलेली आहे. चा-काच्या कण्याभोंवतीं जशा त्याच्या आरा घोंवत असतात, त्याचप्रमाणें अवघें रशियन मानव कुल या मध्यबिंदूभोंवतीं घिरटया घालीत आहे. पूर्वीच्या इति-हासांतील अनेक काळ त्या त्या वेळच्या विशिष्ट व्यक्तींच्या नांवानें अद्यापीहि ओळखले जातात. इलिझाबेथचा काळ, चवदाव्या लुईचा काळ, अशी नांवें त्या त्या काळाला अनुलक्षून इतिहासकारांनीं दिलीं आहेत. हाच परिपाठ भावी इति-हासकारांनीं पुढें चालविला, तर चालू काळाला ते लेनीनचा काळ असेंच नांव देतील की काय, असीहि शंका मला येऊं लागते.

निकोले लेनीन यांची प्रत्यक्ष भेट घेऊन आणि कांहीं काळ प्रत्यक्ष त्यांच्या सहवासांत घालवून ज्यांनीं त्यांच्या संबंधीं लेख लिहिले आहेत, त्यांचेंच मत या कामीं आपल्या विशेष उपयोगी पडण्यासारखें आहे. केवळ वरवर पाहणाराला *लेनीन यांच्या कर्तृत्वशीलतेची साक्ष त्यांच्या चेहऱ्यावरून पटण्यासारखी नाहीं.* त्यांचा चेहरा इतका क्षुद्र दिसतो की त्यांच्या बद्दल कोणाचाहि फारसा चांगला ग्रह आरंभीं होत नाहीं. त्यांचें बोलणें चालणेंहि एखाद्या मोठ्या वीराला शोभ-ण्यासारखें नाहीं. 'लेनीन यांस मी पाहिलें; तेव्हां एका मोठ्या मेजा मागें एखादा क्षुद्र मनुष्यासारखा तो बसला होता,' असें वेल्स यानें म्हटलें आहे. 'या गृहस्थाच्या अंगीं अहंकाराचा स्पर्शहि नसून कोणाशींहि हा अगदीं मित्रभावानें बोलतो' असें लेनीन यांचें वर्णन बर्टन रसेल यांनी केलें आहे. 'हा गृहस्थ अमूढ आहे, याची आरंभीं कल्पना नसतां लेनीन यांस कोणीं पाहिलें तर याच्या

आंगीं एवढी कर्तृत्वशक्ति असेल, असें त्याच्या स्वप्नींहि येणार नाहीं. इतका अहंकारशून्य असा दुसरा एकहि मनुष्य माझ्या पाहण्यांत नाहीं.' असें मत आणखी एका गृहस्थानें प्रगट केलें आहे. लेनीन यांच्या चेहरेपट्टींत कांहीं विशेष असा भाग असेल, तर तो त्यांचें डोकें हाच होय. आणि केवळ डोक्याच्या आकारावरूनच लेनीन यांच्या अलौकिकबुद्धिमत्तेची कल्पना थोडी बहुत होण्यासारखी आहे. त्याचा उच्च भालप्रदेश नजरेस पडल्याबरोबर एकदम शेक्सपीयरचीच आठवण होते. चेहरेपट्टींतील हा एक विशेष वगळला, तर लेनीन यांच्या मोठेपणाचें दुसरें कोणतेंहि बाह्य लक्षण आपणास दिसावयाचें नाहीं. त्यांचा चेहरा जितका साधा, साळाभोळा आणि सामान्य आहे, तितकीच त्यांची वागणूकहि अगदीं साधी आहे.

लेनीन यांनीं केलेल्या कार्याबद्दल मतभेद असला, तरी त्यांची कर्तृत्वशक्ति अलौकिक आहे, याबद्दल मतभेद नसल्याचें या निरनिराळ्या हकीकतींवरून दिसून येतें. अर्थर र्‍यानसम यांना बोलशेविझमचीं तत्वें पसंत असून लेनीन हे चालू काळचे अद्वितीय पुरुष आहेत, असें त्यांचें मत आहे. बर्टन रसेल यांस बोलशेविझमचीं तत्वें मान्य नाहींत; तथापि लेनीन यांची थोरवी यांनींहि मान्य केली आहे. रेमंड रॉबिन्स यांनीं तत्वविचार बाजूला सोडून केवळ व्यक्तिदृष्ट्या साऱ्या युरोपांतील राजकारणी पुरुषांत लेनीन यांची शिरस्थानीं योजना केली आहे. "न्यूयार्क टाइम्स" हें पत्र बोलशेविझमला अनकूल आहे, असें कोणालाहि म्हणतां येणार नाहीं, तथापि लेनीन हे एक अद्वितीय पुरुष महायुद्धाच्या वावटळीनें बाहेर आणले, असें मत त्यानेंहि प्रकट केलें आहे. अशा रीतीनें शत्रु आणि मित्र या दोघांचीहि एकवाक्यता या बाबींत कां व्हावी, हा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आणि याचें उत्तर हेंच की अवघ्या तीन वर्षांच्या अवधींत या अद्वितीय पुरुषानें ज्या घडामोडी घडवून आणल्या त्यांना साऱ्या जगाच्या इतिहासांत कोठेंहि तोड सांपडावयाची नाहीं. यांनीं केलेल्या कार्याच्या जोडीला बसविण्यासारखें कार्य साऱ्या जगाच्या इतिहासांत आजपर्यंत कोणींहि केलेलें नाहीं. अंतःस्थ आणि परकीय अशा दोन्ही प्रकारच्या शत्रूंनीं त्यांना चोहोंकडून घेरलें असतां तितक्या साऱ्यांस या बहादरानें धूळ चारली. लष्करामागून लष्करें मास्कोवर धांवून जाण्यास निघत होतीं; पण दिव्याच्या ज्योतीवर पतंगानें झडप घालावी त्याप्रमाणें हीं सारीं सैन्यें एकामागून एक भस्मसात् होऊन गेलीं. लेनीनच्या ज्या 'आरक्त' लष्करानें यांचा फडशा पाडला, त्याला कोणाचाहि पाठिंबा नव्हता,

पुरेशी लष्करी सामग्री नव्हती; फार काय, पण दारुगोळा आणि तोफा बंदुका यांचाहि योग्य पुरवठा नव्हता. देशांतील रहिवाशांकडून कांहीं मदत मिळेल म्हणून म्हणावें, तर आर्धीच्या महायुद्धानें तेच स्वतः अधमरदशेस आले होते; पण अशा दुबळ्या सैन्यानेंहि आपल्या सर्व आघाडी शाबूत राखून अनेक शत्रुसैन्यांना पुरें नामोहरम केलें. फ्रान्सांतील पहिल्या क्रांतीच्या वेळीं सारें बादशाही युरोप त्या देशाविरुद्ध उठलें होतें आणि त्या प्रसंगीं युद्धमंत्री कार्नो यानें जी अतुल बुद्धिमत्ता प्रगट करून या बादशाही सैन्यांस परतून लावलें, तीच बुद्धिमत्ता आज लेनिन यांनीं प्रगट केली आहे, असें म्हणण्यांत यत्किंचितहि अतिशयोक्ति नाहीं.

महायुद्धाला सुरवात होऊन तें भर रंगांत येण्याबरोबर रशियांत मोडतोडीला सुरवात झाली. साऱ्या रशियन संस्कृतीचीं पाळेंमुळें खणलीं जाऊन ती आतां नामशेष होते कीं काय अशीहि भीति वाटूं लागली. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं लेनिन पुढें सरसावले आणि आपल्या कर्तबगारीच्या जोरावर आपल्या सैन्याच्या मदतीनें या प्रचंड आपत्तींतून रशियाला त्यानीं बाहेर आणलें. बोलशेविझमनें रशिया देश कायमचा नामशेष झाला, असा समज आज सर्वत्र झाला आहे; पण तो सपशेल खोटा आहे. बोलशेविझमनें रशियाला दुःखाच्या गर्तेत लोटलें आणि समाजाची सारी घडी विस्कटून टाकली, असें जे कोणी म्हणतात, त्यांनीं या बाबीचा सरोखर विचारच केला नाहीं, असें म्हटलें पाहिजे. झारशाही जमीनदोस्त झाली, ती आपल्या अनगंन गुणांनीच झाली. एकादा प्रचंड वृक्ष आंतून पोखरलेला असावा, त्याप्रमाणें झारशाहीचें सारें अंतरंग कीड लागून पोकळ झालें होतें; आणि बाहेरून जें काहीं दिसत होतें, तो पोकळ डोलारा मात्र होता. यामुळें युद्धाच्या वावटळीचा झपाटा लागतांच तो कोसळून पडला यांत नवल काय? रशियाची सत्ता बोलशेविझमच्या हातीं येण्याच्या आधीं नऊ महिने झारशाही स्मृतिशेष होऊन गेली होती. जगांतील सारी संस्कृति उध्वस्त व्हावी, याच हेतूनें हें युद्ध जन्माला आलें होतें. ज्यांनीं तें सुरू केलें, त्यांना ही जाणीव झाली नसेल ही गोष्ट खरी, तथापि त्याचा निश्चित परिणाम साऱ्या संस्कृतीचा विनाश हाच होणार ही गोष्ट विचारवंतांनीं अगोदरच कळून चुकली होती. संस्कृतीच्या रक्षणासाठीं हें युद्ध सुरू केलें आहे, असा बडबट बोलशेवच्या गजबजाटानें पुष्कळांनीं कितीहि केला, तरी मयस्थ विचारी लोक या बडबडीनें फसून गेले नाहीत.

१० मु० १९१७ सालीं रशियांत जी भयंकर अंदाधुंदी माजली, तीच प्रकार

आणखी एक वर्ष युद्ध चालू राहिलें असतें तर फ्रान्सांतहि घडला असता आणि हें महायुद्ध आणखी चारपांच वर्षे चाललें असतें, तर इंग्लंडहि रशियाच्या माळेंत जाऊन बसलें असतें. या प्रचंड वावटळीला रशियाचा बळी सर्वांच्या आधीं पडला, याचें कारण हेंच कीं सुसंघटनेच्या बाबतींत रशिया सर्वांहून अधिक मागासलेला होता. रशियाच्या घटनेला व्यवस्थित आणि भक्कम स्वरूप आलेलें नव्हतें. याशिवाय रशियांतील अधिकारी वर्ग नीतिदृष्टयाहि अगदीं कनिष्ठ प्रतीचा होता. यामुळें महायुद्धाच्या वावटळीनें पडलेला ताण सोसण्याचें सामर्थ्य रशियांत नव्हतें. इतर देशांत भांडवलवाले आणि मजूर याचे पाय एकमेकांशीं जसे पक्के जखडले गेले आहेत, तशी स्थिति रशियांत नव्हती. यामुळें पहिल्याच झपाटयाबरोबर तो जमीनदोस्त झाला. झारशाहीच्या पतनाच्या पाठोपाठ ज्या लोकांच्या हातीं राज्यसूत्रें आलीं त्यांनीं आपणाकडून व्यवस्था लावण्याचा यत्न पुष्कळ केला; पण या यत्नांत त्यांना मुळींच यश आलें नाहीं. या मंडळीच्या पाठोपाठ राज्यधुरा केरेन्स्कीच्या हातीं आली; पण त्यालाहि अधिक यशाची प्राप्ती झाली नाहीं. नतर लेनिन पुढें सरसावले आणि क्षणोक्षणीं पडूं पाहणाऱ्या या प्रचंड डोलाऱ्याला टेका देऊन तो त्यांनीं प्रथम सांवरून घेतला आणि रशियन संस्कृतीचा हा डोलारा कसाबसा अद्यापीहि जीव धरून राहिलेला दिसतो, या गोष्टीचें सारें श्रेय लेनिन यांसच दिलें पाहिजे. रशियांत माजलेली बेबंदशाही लेनिन यांनीं नाहींशी केली आहे. अंतस्थ गोंधळाच्या ज्या अनेक गप्पा आपण ऐकतों त्या खरोखर गप्पाच आहेत. रशियांतील शहरें बेचिराख झालेलीं नाहींत. रशियांतील आगगाड्यांचे रस्ते अगदींच गंजून गेले आहेत, असेंहि नाहीं आणि रशियातील शेतकरी वर्ग वडारी लोकाप्रमाणें अन्नाच्या शोधार्थ कोठें तरी भटकत फिरतो, असेंहि नाहीं. अशा प्रकारची परिस्थिति उत्पन्न करण्याचें श्रेय जर कोणा एकटयाच पुरुषाला द्यावयाचें असेल, तर तें लेनिन यांस देणेंच योग्य आहे. रशिया पंगु झाला तर साऱ्या युरोपची गतीहि तीच होईल, ही वेल्स यांची कल्पना खरी असेल, तर भविष्यत् काळीं लेनिनचें नाव समाजविध्वंसक म्हणून नव्हे तर समाजसंरक्षक म्हणून चिरस्मरणीय होऊन राहील, असें म्हणण्यास मला मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

आतां राजकारणी पुरुष या दृष्टीनें लेनिन यांची योग्यता काय आहे, या गोष्टीचाहि विचार करणें अवश्य आहे. चोहोंकडे अंदाधुंदी माजून रशियन समाज सर्व प्रकारें विस्कळीत झाला असतां लेनीन यांनीं आपल्या नव्या तत्त्वांस अनुसरून

*नवीं आर्थिक व सामाजिक बंधनें निर्माण केलीं. सारी समाजरचना त्यांनीं नव्यानें* निर्माण केली. देशांतील संपत्तीवर कामकरी वर्गाचा पहिला हक्क आहे. या तत्त्वाचा आधार घेऊन त्या तत्त्वावर नव्या ध्येयाची उभारणी त्यांनी केली. ज्या तत्त्वांना पूर्वी कल्पनासृष्टींत मात्र अस्तित्व होतें, त्यांचा अवतार प्रत्यक्ष आचारसृष्टीमध्यें लेनीन यांनीं जन्मास घातला.

येथवर लेनीन यांच्या अंतःसृष्टीचें एका बाजूचें स्वरूप दाखविलें, यावरून लेनिन यांची बुद्धिमत्ता आणि त्यांची कर्तबगारी हीं व्यवहारांतहि किती शाबूत आहेत, हें निःसंशय सिद्ध होतें. आज जगांत हयात असलेल्या व्यवहारी पुरुषांत लेनीन यांची योजना सर्वांच्या शिरोभागींच करणें योग्य आहे. आतां लेनीन यांच्या चारित्र्याची दुसरी बाजूहि पाहिली पाहिजे. त्यांच्यात उणीवा कोणत्या आहेत, याचा विचार केला म्हणजे, शुद्ध नीति तत्त्वांच्या दृष्टीनें लेनीन कमी दर्जाचे ठरतात, हेंहि आपणास स्पष्ट दिसून येतें. नीति आणि धर्म या *विषयांसंबधीं आपणा सर्वांच्या दृष्टीनें ज्या कांहीं कल्पना आहेत, त्या दृष्टीनें* पाहतां लेनीन यांच्या चित्तांत या कल्पनांचा अभाव आहे, असें म्हटलें पाहिजे. त्यांची वागणूक नीतीला सोडून आहे, असें म्हणण्याचा माझा आशय नाहीं; पण विशुद्धध्येय म्हणून ज्या तत्त्वांचा संग्रह जगानें केला आहे, त्यांची ओळख लेनीन यांस नाहीं. आपणाला धर्म म्हणून कांहीं नाहीं, असें मोठ्या आदयतेनें ते स्वतःच सांगतात. केवळ जडवाद आपलासा करून त्याच्या सृष्टींत ते सुखासमाधानानें वावरत असतात. सर्वश्रेष्ठ असा कांहींतरी नीतिनिर्बंध असून आपल्या साऱ्या जीवनचरितास त्यालाच प्राधान्य दिलें पाहिजे, असें लेनीन यांस मुळींच वाटत नाहीं. फार काय; पण अशा प्रकारचा एखादा सर्वश्रेष्ठ निर्बंध अस्तित्वात तरी आहे कीं नाहीं त्याचीहि त्यांना शंकाच आहे. केवळ उच्चनीतीचे निर्बंध म्हणून ज्या वस्तु पूज्य मानून प्रत्येकानें त्यांच्या अनुरोधानें चालावें, असें आपण म्हणतों, ते निर्बंधहि बलिष्ठांनीं कनिष्ठावर साम्राज्य गाजविण्याकरतांच निर्माण केले आहेत, त्यांच्या संरक्षणाकरतां कांहीं निर्बंध निर्माण करून त्यांना नीतीचा आदर्श असें भव्य नाव दिलें आणि समाजाच्या माथीं ते मारले, असें लेनीन यांचें मत आहे. अशा रीतीनें नीति आणि अनीति आणि धर्म व अधर्म हा भेदच त्यांनीं नाहींसा करून टाकला. सामान्य मजूरदार वर्गाचें कल्याण ज्या मार्गांनीं होईल, तो मार्ग खरा आणि सत्याचा, असी लेनीन यांची दृष्टि आहे. *तेव्हां यान्या उलट कामकरी वर्गाला, कांहीं बंधनें निर्माण झालीं, तर तीं मोड*

चुकीची आहे, असें लेनीन यांना वाटणें साहजिक आहे. प्रसंगाची निकट म्हणून रणभूमीवर सामान्य नीतीशास्त्र गुंडाळून ठेवण्याची जी वहिवाट आहे. तीच लेनीन यांनींहि पुढें चालू ठेवली आहे. कामकरी वर्गाचें कल्याण साधावें ही गोष्ट त्यांना निकडीची वाटते. तेव्हां ही साधण्यास जो जवळचा मार्ग सांपडेल, त्याचा स्वीकार ते तावडतोब करतात. असें करतांना सामान्य नीतिशास्त्र आड आलें, तर तें पायाखालीं तुडविण्यास त्यांना दिक्कत वाटत नाहीं. शत्रूचा पराभव करावयाचा हें एकच ध्येय पुढें ठेवून एकादा शिपायी ज्याप्रमाणें हव्या त्या गोष्टी करीत असतो, त्याप्रमाणें लेनीन यांनी आपल्या वर्तणुकीतहि हें एकच धोरण पुढें ठेवलें आहे. जय झाला म्हणजे, तो निर्माण करणारीं सारीं साधनें मंगलरूप आहेत. ही जुनी म्हण लेनीन यानीं अगदीं आपलीशी करून टाकली आहे.

चालू समाजबंधनें सामान्य जनतेस असह्य झालीं आहेत; त्यांपासून तिची मुक्तता करणें आणि तिची वाढ होण्यास योग्य अशी परिस्थिति निर्माण करून देणें हेंच आजचें पहिलें कार्य आहे, असें लेनीन यांचें म्हणणें आहे. आणि हें ध्येय सिद्ध करण्यास कोणत्याहि भल्याबुऱ्या उपायांची योजना करण्यांत त्याना पाप वाटत नाहीं. जुन्यारचनेचा अस्त आणि नवीचा उदय यांचा हा संधिकाल आहे. या संधिकालांत जुन्या कल्पनांचा अस्त एकदम होतो असें नाहीं. रूढीला चिकटून राहणें हा जन्मजात मनुष्यस्वभाव आहे. अशा स्थितींत आपलें चालू वळण सोडून सारीं मनुष्यें नव्या दिशेकडे एकदम वळतील असें नाही. असें होण्याची वाट पाहात बसणें म्हणजे नदी वाहून गेल्यावर पाय न भिजविता पलीकडे जाण्याच्या संधीची वाट पहात बसण्या इतकें शहाणपणाचें आहे, असें लेनीन यांचें म्हणणें आहे. आपलें अखेरचें ध्येय चुकीचें नसेल, तर कालाचा अपव्यय न करतां शक्य तितक्या लवकर, शक्य तितक्या उपायांनीं तें सिद्ध करणें पाप आहे काय? असा लेनीन यांचा प्रश्न आहे आणि याच विचारसरणीला अनुलक्षून सौम्य अथवा जालीम उपायांची योजना ते करीत असतात. आपलें ध्येय नुसतें उच्च कोटीचें असून उपयोगी नाहीं. त्याचा प्रत्यक्ष व्यवहार झाला पाहिजे, असें लेनीन यांचें मत आहे आणि या मताला विरुद्ध चालल्यामुळेंच पुष्कळ वेळां लेनीन यांच्या मनांत आणि आचरणांत विरोधाभास उत्पन्न होतो. सामान्य जनतेला स्वमनाचा अवलंब करण्यास पूर्ण अवकाश असावा, असें त्यांचें मत आहे; तथापि जगानें पूर्वी कधींहि न अनुभवलेल्या अशा एकमुरी सत्तेच्या अधिष्ठानीं ते आहेत. रशियन

व्हावा, अशी मुळींच इच्छा नसतांहि सहा आठवडेपर्यंत रशियांत रक्ताच्या नद्या वाहविण्यास त्यांनी कमी केलें नाहीं. ते स्वतः लष्करी बाण्याचे नसतांहि झाडून साऱ्या शेतकरी वर्गाला लष्करी नोकरीच्या दावणींत बांधून त्यांनी कशा प्रकारचें वज्र तयार केलें याची माहिती आता साऱ्या जगाला आहेच. आज या लष्कराच्या जोडीला बसेल असें यशस्वी लष्कर जगांत दुसऱ्या कोठेंहि नाहीं. रशियांत लेनीन यांनीं निर्माण केलेला हा जो देखावा आज आपणास दिसत आहे, त्याला जगाच्या आजपर्यंतच्या इतिहासांत कोठें तोड असल्याचें मला तरी माहीत नाहीं.

लेनीन हे अगदीं चोख दानतीचे गृहस्थ आहेत. त्यांच्या खाजगी वागणुकींत नांव ठेवण्यास तुम्हास जागा आढळावयाची नाहीं. त्यांची वागणूक अगदीं साधी आणि निरभिमानपणाची आहे. त्यांना दंभ किंवा मपरा कसा तो ठाऊक नाहीं. जगाची चालू स्थिति सुधारून उच्च मार्गावर त्याला आरूढ करावें, याशिवाय दुसरी कसलीहि महत्वाकांक्षा त्यांनीं आपल्या चित्तांत बाळगलेली नाहीं. स्वतः-साठीं कोणतीहि गोष्ट त्यांना साधावयाची नाहीं. केवळ स्वबांधवांची सेवा करावी, याशिवाय दुसरा कोणताहि उद्देश त्यांनीं आपल्या नजरेसमोर ठेवलेला नाहीं आणि असें असतांहि त्यांच्याइतकी एकमुखी सत्ता हातीं बाळगणारा, कधींहि नाव न वांकविणारा, अत्यंत कणखर आणि पाषाणहृदयी असा मनुष्यहि जगांत दुसरा नाहीं. त्याच्या हृदयाला 'ओलावा' हा शब्द ठाऊक नाहीं. नाहीं म्हणावयाला लहान मुलांशीं वागतांना मात्र त्यांचें अंतःकरण आर्द्र झाल्याचा भास थोडाबहुत होतो. या गृहस्थाच्या अंतःकरणाच्या खोल भागांत बुडी मारून अगदीं तळापर्यंतचा ठाव तुम्ही घेतला, तर तेथें कोरड्या गर्द्याशिवाय तुम्हांस दुसरें काहींच आढळावयाचें नाहीं. प्रेम आणि भक्ति यांच्या ओलाव्याचा मागमूसहि कोठें दिसावयाचा नाहीं. गारेचा एखादा डोंगर पाहून ज्याप्रमाणें नुसत्या कोरड्या शकलांची कल्पना आपल्या मनांत येते. तीच कल्पना लेनीन यांस पाहून तुम्हास येईल. यांचें अंतःकरण पोलाद आणि गढूळ या दोनच वस्तूंचें जणूं काय बनलें आहे. 'लेनीन यांचा विचार मनांत आला म्हणजे महंमदाची आठवण मला होते,' असें वेल्स म्हणतात. यांचें कारण हेंच असावें असें मला वाटतें. इंग्लंडच्या इतिहासांत प्रसिद्ध तरवारबहाद्दर क्रामवेल आणि त्याचें प्युरिटन सैन्य यांच्याशीं लेनीन यांची तुलना बर्ट्रांड रसेल यांनीं केली आहे. माझ्या दृष्टीनें लेनीन यांची तुलना नेपोलियन बोनापार्ट याशीं

अधिक चांगल्या रीतीनें करतां येईल. या सान्या तुलना समर्पक आहेत, असें नाहीं आणि विशेषतः लेनीन आणि बोनापार्ट यांच्या मनोघटनेंत पुष्कळ फरक आहे, हें खरें; तथापि अलौकिक बुद्धिमत्ता आणि त्याच प्रतीची कर्तबगारी यांच्या दृष्टीनें या तुलनांचा विचार केला म्हणजे लेनीन याचें अंतर्बाह्य चित्र आपल्या मनःचक्षूंपुढें उभें करण्यास त्यांचा बराच उपयोग होईल.

याप्रमाणे एकंदरीनें विचार करतां सर्व जगांत श्रेष्ठ पुरुष कोण हा प्रश्न अद्यापि बाकीच आहे, असें आपणास दिसून येईल. रोमेन रोलंड हे शुद्ध कल्पना साम्राज्यांत दंग होणारे पण अव्यवहारी आहेत. त्यांची ती बाजू लंगडी पडल्यामुळें आपल्या कसोटीस ते उतरत नाहींत. उलटपक्षीं लेनीन हे अत्यंत व्यवहारदक्ष पण शुद्ध कल्पनाशून्य आहेत. यामुळें तेहि आपल्या पसंतीस उतरावयाचे नाहींत. सर्व जगाला मान्य होईल, अशा मनुष्याच्या शोधांत आपण आहोंत. फ्रेंच गृहस्थ रोलंड आणि रशियन पुरुष लेनीन या दोघांच्याहि गुणांचा एकत्र परिपाक ज्याच्या ठिकाणीं पूर्ण समतेनें राहिला आहे, अशा पुरुषाच्या शोधांत आपण आहों. विशुद्ध कल्पनांच्या निरामय वातावरणांत परिभ्रमण करीत असतांहि ज्याचे पाय जमीन सोडीत नाहीत, अशा अद्वितीय व्यक्तीच्या शोधांत आपण आहोंत. अत्युच कोटीचें साध्य आपणास साधावयाचें आहे, या सुखमय स्वप्नांत मन वावरत असतांहि ज्याचे हात निरंतर कार्यरत राहतात, अशा पुरुषाच्या शोधात आपण आहों. स्वर्गाचें साम्राज्य ज्याच्या नजरेला सदोदित दिसतें, असा अलौकिक द्रष्टा आणि तें प्रत्यक्ष सृष्टींत आणण्यासाठीं झटणारा कार्यकर्ता जेथें एकत्र नांदत आहे, अशा पुण्य पुरुषाच्या शोधांत आपण आहों. असा नरश्रेष्ठ आजच्या जगात अस्तित्वांत आहे काय ?

अशा प्रकारचा नरश्रेष्ठ जगांत आहे, असें मला वाटतें. आजच्या काळीं तर तो सर्वश्रेष्ठ आहे, यांत संशय नाहींच; पण आजपर्यंतच्या इतिहासातील सर्वश्रेष्ठ पुरुषांच्या मालिकेंत बसण्याइतकी त्याची श्रेष्ठता सिद्ध झाली आहे. या पुरुषाचें नांव मी प्रथम इ. स. १९१७ सालीं ऐकलें. हिबर्ट जर्नल नांवाच्या एका मासिकांत प्रोफेसर गिलबर्ट मरे यांनीं या गृहस्थाबद्दल एक लेख लिहिला होता; आणि त्यावरूनच मला त्या गृहस्थाची प्रथम ओळख झाली. यानंतर पुढें सुमारें तीन वर्षांत त्याचें नांवहि पुन्हा माझ्या कानीं आलें नाहीं आणि आता थोड्या महिन्यांपूर्वी या गृहस्थाच्या भाषणांतील व लेखांतील कांहीं उतारे छापलेलें एक लहानसें चोपडें माझ्या टेबलावर येऊन पडलें. वास्तविक झटलें, तर हो मादिनी

अगदीं अपूरी आहे; पण त्यांत जेवढा कांहीं मजकूर आहे, तेवढा वाचूनच माझी खात्री झाली कीं, एक अव्वल प्रतीचा तारा जगाच्या क्षितिजावर उदय पावत आहे.

ज्या गृहस्थाबद्दल हें विधान मीं केलें त्याचें नांव मोहनदास करमचंद गांधी असें आहे. हिंदुस्थानातील चालू ब्रिटिश नौकरशाही उलथून पाडण्याकरतां जी चळवळ सध्या सुरू झाली आहे, त्या चळवळीचे हे आद्य गुरु आहेत. गांधी यांजवर त्यांच्या देशबांधवांची उत्कट भक्ति असून त्यांना ते 'महात्मा' ह्या नांवानें संबोधितात. महात्मा या शब्दाचा अर्थ संत अथवा सत्पुरुष असा आहे. गांधी यांचें नांव तुम्हांपैकीं कितीशा लोकांच्या कानीं आलें असेल अथवा त्यांची चरित्रकथा तुम्हांपैकीं कितीकजणांस ठाऊक असेल, हें मला सांगवत नाहीं; पण पुष्कळांना ही माहिती नसावी, यांत नवल नाहीं. आतां या चरित्राचें सिंहावलोकन अगदीं थोडक्यात मी करणार आहें, तें तुम्ही लक्षपूर्वक ऐकून घ्या आणि गांधी यांना मी नरश्रेष्ठ असें म्हणतों, तें योग्य किंवा अयोग्य हें तुम्हीच ठरवा.

हिंदुस्थानातील एका श्रीमंत आणि सुसंस्कृत कुटुंबांत सुमारें पन्नास वर्षांपूर्वी गांधी यांचा जन्म झाला. अशा प्रकारच्या कुलीन कुटुंबांत ज्या प्रकारचें शिक्षण हिंदुस्थानातील मुलांस सामान्यतः मिळतें, तसेंच तें गांधी यांसहि मिळालें. वडिलांजवळ पैशाला कमतरता नाही आणि मुलगाहि त्यांचा लाडका. मग इच्छेस येईल त्या पद्धतीनें आणि हवा तो खर्च करून आपल्या मुलाचें संवर्धन त्यांनीं केलें, यांत नवल काय ? सन १८८९ सालीं कायद्याच्या अभ्यासाकरतां गांधी इंग्लंडात गेले. चालीप्रमाणें योग्य मुदतींत हा अभ्यास पुरा करून ते मुंबईस परत आले आणि तेथील न्यायकचेरींत ते वकिली करूं लागले. त्याचा जम लवकरच बसून त्यांची वकिली चांगली चालूं लागली; पण याच वेळीं धर्मविचारांनींहि गांधी यांच्या चित्तांत काहूर उत्पन्न केलें. ते इंग्लंडास जावयास निघाले, त्याच्या आधींच मद्यमांसाचा त्याग आणि ब्रम्हचर्य हीं बंधनें त्यांनीं स्वतःला लावलीं होतीं. इंग्लंडांत असतां अगदीं साध्या रीतीनें राहून हीं बंधनें त्यांनीं कटकपणें पाळलीं. हिंदुस्थानांत परत आल्यानंतर त्यांची त्यागवृत्ति वाढत गेली. धर्म साधावयाचा तर पैशाचा नाद सोडला पाहिजे, ही गोष्ट लवकरच त्यांच्या लक्षांत आली. यानंतर लवकरच त्यांनी आपल्या माल मिळकतीचा व्यय सत्कार्याकडे करून टाकला आणि केवळ जीवधारणापुरती मिळकत मात्र त्यांनीं आपल्या

हातीं ठेवली. सांप्रत त्यांनी जवळ जवळ भिक्षावृत्तीची शपथ घेतली आहे आणि आजमितीला खरोखरच ते अगदीं अकिंचन बनले आहेत.

काल व्यतीत होऊं लागला, तसतशीं नवीं धर्मतत्वें गांधी यांच्या बुद्धींत उदय पावूं लागलीं. अप्रतिकाराचें तत्व त्यांच्या बुद्धीला पूर्णपणें पटलें. हिंदुधर्माच्या मूळ पायाच्या जागीं हेंच तत्व आहे, असें ते म्हणूं लागले. इतकें झाल्यानंतर वकिली सोडणें, ही गोष्ट ओघानेंच प्राप्त झाली. कारण चालू काळची न्यायपद्धति म्हणजे दंडुकेशाहीनें न्याय करण्याची पद्धति होय.

इ. स. १९१४ सालीं प्रोफेसर गिल्बर्ट मरे, यांनीं गांधी यांस प्रथम पाहिलें, तेव्हांच्या त्यांच्या स्थितीचें वर्णन पुढीलप्रमाणें त्यांनीं केलें आहे. 'गांधी हे नुसता भात खातात, नुसतें पाणी पितात आणि नुसत्या लाकडाच्या फळक्यावर निजतात. त्यांच्याशीं संभाषण करूं लागलें म्हणजे हे एक बहुश्रुत आणि सुसंस्कृत गृहस्थ आहेत, अशी खात्री तेव्हांच पटते आणि त्यांच्या सामान्य भाषणांतहि साधुत्वाची अंधुक छटा उमटल्यावांचून रहात नाहीं. साधूला शोभण्यासारखी अमुक एक गोष्ट ते बोलले, असें निश्चयानें म्हणवणार नाहीं, हें खरें; पण श्रोत्याच्या मनाला तसा भास झाल्यावांचून रहात नाहीं, हेंहि खरें आहे.'

गांधी यांची वृत्ति या वेळीहि सत्पुरुषाला शोभण्यासारखी खरोखरच झाली होती. इंद्रियजन्य सुखाला अनुकूल अशा प्रत्येक वस्तूचा त्याग पूर्ण विचारपूर्वक या वेळीं त्यांनीं केला होता. आपल्या साध्याच्या मार्गाआड कांहीं येऊं नये आणि आपल्या इंद्रियांनीं केव्हांहि वहकूं नये, असें आपल्या वागणुकीचें धोरण यावेळीं त्यांनीं बुद्धिपूर्वक स्वीकारलें होतें. आपल्या पूर्ववयापासूनच ते सामान्य मनुष्य-कोटीच्या बाहेर गेले होते. कायावाचामनानें मानवजातीची सेवा करावी हेंच ध्येय आरंभापासून आपल्या चित्तापुढें त्यांनीं ठेवलें होतें.

त्यांच्या सार्वजनिक चरित्राचे मुख्यतः दोन भाग पडतात. इ. स. १८९० पासून इ. स. १९१३ पर्यंत दक्षिण आफ्रिकेंत त्यांनीं केलेली जनसेवा हा एक-भाग असून त्यानंतरचा भाग म्हणजे हिंदुस्थानांत आजपर्यंत त्यांनीं केलेलें कार्य हा होय.

दक्षिण आफ्रिकेंतील नाताळ प्रांतीं अजमासें दीडलक्ष हिंदी लोकांची वस्ती इ. स. १८९० सालच्या सुमारास होती. कालिफोर्नियांत जपानी लोक येऊं लागल्यामुळें तेथें ज्याप्रमाणें चमत्कारिक परिस्थिति उत्पन्न झाली आहे, तीच परिस्थिति या हिंदी लोकांमुळें दक्षिण आफ्रिकेंत निर्माण झाली. वर्णभेदाच्या

हिंदी वसाहतवाल्यांनी आफ्रिकन सरकारविरुद्ध युद्धाचा उपक्रम शिस्तवार पद्धतीनें सुरू केला. हा सारा दीर्घ काळ या लोकांना मोठ्या कष्टांत काढावा लागला. प्रसंगीं त्यांना अन्नालाहि मोताद व्हावें लागे आणि घरादाराची राखरांगोळी झालेली उघड्या डोळ्यानें पहावी लागे. हिंदी लोकांचा मुख्य मार्ग म्हटला म्हणजे संघटित हरताळ पाडावयाचा, हाच होता असें दिसतें. शहरांतून आणि खेड्यापाड्यांतून कोणत्याहि कामाला हात लावूं नये, असा उपक्रम सुरू झाला. यामुळें दक्षिण आफ्रिकेंतील उद्योगधंदे आणि सामाजिक जीवन यांना पक्षघाताचा झटका होऊन त्यांचे हातपाय क्रमाक्रमानें लुळे पांगळे होऊं लागले. अशा रीतीनें दक्षिण आफ्रिकेंतील समाजपुरुषाच्या नाड्या एका मागून एक आंखडूं लागल्या; तथापि हिंदी लोकांच्या या संपाचें स्वरूप गत इतिहासांतील संपाहून एका बाबींत अगदीं वेगळें होतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. प्रतिपक्ष अडचणींत सांपडला म्हणजे त्या संधीचा फायदा घेऊन त्यावर चोहों बाजूनें तुटून पडावें, आणि त्या संधीचा फायदा जितका लवकर आणि जितका अधिक घेतां येईल, तितका घ्यावा, ही पद्धत आजपर्यंत सर्वत्र मंजूर असल्याचें दिसतें; पण अशा प्रसंगीं गांधी यांनीं अगदीं उलट मार्ग स्वीकारला. हें युद्ध चालू असतां आफ्रिकन सरकार एकाद्या अनपेक्षित पेंचांत सापडलें, तर लवकर विजय मिळविण्याच्या बुद्धीनें त्याची लांडगेतोंड न करतां गांधी यांनीं तावडतोब तहकुबी पुकारावी आणि आपल्या शत्रूच्या मदतीस धावून जावें. पेंचांत सांपडलेल्या शत्रूवर वज्रप्रहार करण्या इतका दुष्टपणा करण्याचें कार्य गांधी यांच्या सात्विक बुद्धीला रुचलें नाहीं. १८९९ सालीं बोअर युद्ध सुरू झालें. त्याबरोबर गांधी यांनीं आपलें संपाचें दप्तर तावडतोब म्यानांत घातलें आणि रणशुश्रूषेकरतां एक हिंदी पथक त्यांनीं तयार केलें. युद्धसमाप्तीपर्यंत हें पथक आपलें जीवदयेचें कार्य करीत होतें आणि हें काम त्यांनीं इतक्या चोख रीतीनें बजावलें कीं मुख्य सेनापतीनें या पथकाचा गौरवपूर्वक उल्लेख आपल्या खलित्यांत दोनवेळा केला. तोफखान्याच्या भर मार्‍यांतहि न डगमगतां या लोकांनीं जीवावरची कामें केलीं म्हणून आफ्रिकन सरकारानें त्यांचे आभारहि मानले. इ. स. १९०४ सालीं जोहान्सबर्ग येथें प्लेगचा कहर उसळला, तेव्हांहि संप बंद करून गांधी यांनीं एक इस्पितळ उघडलें आणि त्यांत धर्माचा अथवा जातीचा विचार न करतां रोग्यांची शुश्रूषा ते करूं लागले. इ. स. १९०६ सालीं मूळच्या आफ्रिकन रहिवाशांनीं नाताळांत बंडाची वावटळ उठविली. यावेळींहि आपलें युद्ध तहकूब करून जखमी

लोकांच्या सेवेकरतां एक पथक गांधी यांनीं उभारलें. याप्रसंगीं या पथकाला करावें लागणारें काम युद्धांतील कामापेक्षांहि अधिक अडचणीचें व अधिक धोक्याचें होतें. या प्रसंगींहि नाताळच्या गव्हरनर साहेबांनीं सार्वजनिक रितीनें गांधी यांचे आभार मानले आणि पुढें लवकरच संपाला पुन्हां सुरुवात झाली; तेव्हां जोहान्सबर्ग येथील तुरुंगांत त्यांनीं गांधी यांची रवानगी केली. या एकंदर दीर्घ काळांत गांधी यांजवर आपत्ति किती कोसळल्या, त्यांची मानहानी किती प्रसंगीं झाली आणि त्यांजवर दुष्ट बुद्धीची आग किती वेळां कोसळली, या साऱ्याचा हिशेब तुम्हास सांगणें मला अगदीं अशक्य आहे. तथापि अशा प्रसंगींहि गांधींच्या क्षमाबुद्धीनें केव्हांहि कच खाल्ली नाहीं आणि तिनें केव्हांहि पाठ दाखविली नाहीं. त्यांना तुरुंगवास किती वेळां घडला, हें आंकड्यांनीं सांगतां येण्याजोगें नाहीं. अशा वेळीं अंधार कोठडीची शिक्षा त्यांना किती तरी वेळां मिळाली आणि त्यांच्या कोठडीच्या गजाला हातपाय किती वेळा तरी जखडून टाकण्यांत आले होते. तुरुंगांतून ते बाहेर पडले म्हणजे आडदांड गोऱ्या वसाहत वाल्यांनीं त्यांजवर तुटून पडावें आणि ते बेशुद्ध पडेपर्यंत त्यांस मार द्यावा, असेहि प्रकार किती वेळां तरी घडले. आतां हा मेला असें समजून गांधी यांना रस्त्याच्या कडेला फेंकून द्यावें आणि आपण पुढें चालतें व्हावें. असा क्रम गोऱ्या वसाहत वाल्यांनीं धरला होता. भर चव्हाट्यावर गांधी याची मानहानी करण्याचा प्रसंग गोऱ्या लोकांनीं कधींच वांया जाऊं दिला नाहीं आणि अशी मानहानी करण्याच्या अगदीं अजब आणि अश्रुत अशा युक्त्याहि त्यांनीं शोधून काढलया होत्या; पण या भयंकर प्रसंगांतहि गांधी यांचें सात्त्विक धैर्य अणू रेणूइतकेंहि ढळलें नाहीं. त्यांची समताबुद्धि त्यांना सोडून गेली नाहीं, त्यांच्या सहनशीलवृत्तीला ओहोटी लागली नाहीं, त्यांचें प्रेममय अंतःकरण विपदग्ध झालें नाहीं, आणि क्षमावृत्ति यत्किंचितहि ढळली नाहीं. अशा रीतीनें वीस वर्षे ही उग्र तपश्चर्या त्यांनीं अव्याहत चालविली होती आणि या दीर्घ काळाच्या शेवटीं विजयश्रीनें त्यांना अखेरीस माळ घातली. इ. स. १९१३ सालीं लॉर्ड हार्डिंग यांनीं हें प्रकरण हातीं घेतलें. यांनीं नेमलेल्या कमिशननें आपल्या रिपोर्टांत गांधी यांना अनुकूल मत दिलें आणि गांधी यांच्या बहुतेक साऱ्या मागण्या आफ्रिकन सरकारास मान्य करावयास लावलें. कोणतेंहि अकर्म न करतां, दंडाचा उपयोग न करतां केवळ क्षमेचें शस्त्र हातीं घेऊन आणि शत्रूचे सारे अपकार समता बुद्धीनें विसरून जाऊन केवळ लज्जेनें त्याला खालीं पहावयास लावून नामोहरम केल्याचें

प्रश्नाला तेथें हळूहळू उग्र रूप येऊं लागलें. या काळ्या लोकांना नामशेष करण्याच्या उद्देशानें नव्यांचें आगमन बंद करून जुन्यांची हकालपट्टी करावी, असें धोरण दक्षिण आफ्रिकन सरकारानें अमलांत आणलें. नव्यांना येऊं न देणें ही गोष्ट या सरकारास फारशी अवघड नव्हती; पण जुन्यांना बाहेर काढणें, हें मात्र तितकें सोपें नव्हतें. कारण असें करणें पूर्वीच्या तहाविरुद्ध असल्यामुळें तें बेकायदेशीरहि ठरलें असतें. आणि याशिवाय नाताळांतील कांहीं रहिवाशीहि या सरकारी धोरणाविरुद्ध होते. कारण त्यांना स्वस्त हिंदी मजुरांची गरज होती. त्यांचे उद्योगधंदे या मजुरांवर अवलंबून होते. याशिवाय दक्षिण आफ्रिकन सरकाराविरुद्ध हिंदुस्थान सरकारानेंहि या धोरणाला आक्षेप घेतला तो वेगळाच. अधिक हिंदी लोकांची आयात दक्षिण आफ्रिकेंत होऊं नये म्हणून एक बंदीचा कायदा पसार करून आपल्या धोरणाचा पहिला भाग आफ्रिकन सरकारनें दृश्य स्वरूपांत आणला. हा कायदा अस्तित्वांत आल्याबरोबर उभयपक्षीं युद्धाला तोंड लागलें. हें दीर्घकालपर्यंत मोठ्या कडाक्यानें चाललें होतें. दक्षिण आफ्रिकेंतील गोऱ्या वसाहतवाल्यांनीं आपल्या वर्णबंधूंच्या कृतीचें अनुकरण करण्यास सुरुवात केली. जगांतील कोठल्याहि भागांत झालें तरी अशा प्रकारच्या परिस्थितींत सर्व गोरे लोक याच मार्गाचें अवलंबन करीत असतात. हा मार्ग म्हटला म्हणजे आपल्या प्रतिपक्षाचा मन मानेल तसा छळ करून त्याला त्राही त्राही करावयास लावणें हा होय. गोरे लोक स्वतःहून ज्यांना हलके समजतात, त्यांच्यामागें हात धुवून लागण्याची त्यांची वहिवाट पिढीजात आहे. शुद्ध मजूरवर्ग वगळून बाकीच्या वरिष्ठप्रतीच्या पांढरपेशा वर्गाला पद्धतशीर रीतीनें छळण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला. उद्देश इतकाच कीं दक्षिण आफ्रिकेंत राहणें त्यांना असह्य होऊन जावें. हेवा आणि दुष्टपणा यानीं जितके मार्ग सुचविले त्या सान्यांचा अवलंब गोऱ्या वसाहतवाल्यांनीं केला होता. हिंदी लोकांवर कांहीं विशेष कर लादण्यांत आले. त्यांच्या नावाची नोंद सुरु झाली आणि तीहि त्यांना अत्यंत उपमर्दकारक रीतीनें करण्यांत येत असे. अस्सल बदमाशाला योग्य अशा रीतीनें त्यांच्या आंगठ्याचे ठसे घेण्यांत येत. भर चव्हाट्यावर हिंदी लोकांची अब्रु कोणीहि घ्यावी. केवळ हिंदी म्हणूनच त्याला वाटेल त्या रीतीनें कोणीहि छळावें. हिंदुस्थानांत जन्म होणें, यांहून दुसरें अधिक मोठें पातक जगांत कोणतेंहि नाहीं, असें हे गोरे वसाहतवाले मानूं लागले. जेथें कायद्याचा उपयोग सोईस्कर रीतीनें करतां येण्यासारखा नव्हता तेथें दुसऱ्याच एका मार्गाचा अवलंब त्यांनीं केला.

हा मार्ग आम्हां अमेरिकन लोकांसहि अपरिचित नाहीं. त्याचा स्वीकार मोठ्या अभिमानानें आम्हीहि करीत असतों. गोऱ्या वसाहतवाल्यांनीं टोळ्याटोळ्यांनीं फिरून हिंदी लोकांची लुटालूट करावी, त्यांचीं घरेंदारें जाळावीं आणि प्रसंगीं एकाद्या माणसालाहि जिवंत जाळून टाकावें, असा क्रम त्यांनीं धरला. या गरीब बिचाऱ्या हिंदी लोकांना जीव नकोसा करण्याच्या हेतूनें अमुक एक गोष्ट करण्याचें गोऱ्या वसाहतवाल्यांनीं बाकी ठेवलें नाहीं. आपल्या घरादारावर आणि मालमत्तेवर तुळशीपत्र ठेवून दक्षिण आफ्रिकेंतून निघून जाण्याशिवाय दुसरा कोणताहि मार्ग गोऱ्या लोकांनीं त्यांना मोकळा ठेवला नाहीं.

इ. स. १८९३ सालीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांनीं आपलें पुढारीपण स्वीकारून आपल्या मदतीस धांवण्याची विनंति गांधी यांस केली. या विनंतीला गांधी यांनींहि तावडतोब मान दिला. आपले देशबांधव जगांतील कोणत्याहि भागांत दुःख भोगीत असले, तरी त्यांत वांटेकरी होणें, हें आपलें कर्तव्य आहे, किंबहुना हा आपला हक्कच आहे, असा गांधी यांच्या मनाचा निश्चय झाला होता. यामुळें नाताळांतील हिंदी लोकांच्या हांकेस ओ देऊन इ. स. १८९३ सालीं ते त्या प्रांतीं रहावयास गेले आणि इ. स. १९१३ पर्यंतचा बहुतेक साराकाळ त्यांनीं तेथेंच काढला. प्रथम कायदेशीर रीतीनें भांडण्याचा उपक्रम गांधी यांनीं सुरू केला आणि ते चांगल्या प्रकारचे कायदे पंडीत असल्यामुळें प्रतिपक्षाच्या सर्व मल्याबुऱ्या मार्गांस विरोध करून न्याय कचेरींत त्यांनी जय मिळविला. यानंतर युद्धाच्या पुढील अंकास सुरुवात झाली. दक्षिण आफ्रिकेच्या एकंदर वसाहतींत हिंदी लोकांना राजकीय आणि सामाजिक हक्क गोऱ्या वसाहतवाल्यांच्या बरोबरीनें मिळावे या उद्देशानें अप्रतिकाराचें वज्र हातीं घेऊन या लांब मुदतीच्या युद्धास सुरुवात केली. आरंभापासून अखेरीपर्यंत हें एकच शस्त्र गांधी यांनीं हातीं धरलें होतें. हें युद्ध बराच काळ लांबलें असतांहि दंडुक्याचा अवलंब गांधी पक्षानें केला नाहीं. इतकेंच नव्हे तर सूड उगविण्याचे आणि उलट प्रहार करण्याचे प्रसंग चालून आले असतांहि त्या मोहाला गांधीपक्ष बळी पडला नाहीं.

हिंदी लोकांचे नेते आणि सल्लागार या नात्यानें आपल्या बांधवांस मदत करण्यासाठीं दरबान शहराच्या जवळच एका खुल्या जागीं गांधी यांनीं एक नवी हिंदी वसाहत स्थापिली. या ठिकाणीं पुष्कळ हिंदी लोकांस त्यांनीं एकत्र केलें. जमीन नांगरून उदरनिर्वाह करावयाचा आणि जन्मभर दरिद्री रहावयाचें. अशा शपथा आपल्या बांधवांकडून गांधी यांनीं घेवविल्या होत्या. या ठिकाणीं राहून

दुसरें उदाहरण मानवजातीच्या इतिहासांत मला तरी ठाऊक नाहीं. या साऱ्या गोष्टींचा विचार केला, म्हणजे मन आश्चर्यानें आणि कौतुकानें थक्क होऊन जातें.

गांधी यांच्या चरित्राच्या उत्तरार्धास इ. स. १९१३ सालीं सुरवात झाली आणि या वेळीं त्याला अगदीं पूर्ण भरती आली आहे. गांधी दक्षिण आफ्रिकेंत असतां इकडे हिंदुस्थानांत ब्रिटिश नौकरशाहीचें उच्चाटन करण्याकरतां चळवळ सुरू होऊन हळूहळू तिची वाढहि होत होती. अशा प्रकारचें संक्रमण सुरू असतां गांधी हिंदुस्थानांत आले आणि चळवळीचें आधिपत्य त्यांनीं स्वीकारलें. पुढें इ. स. १९१४ सालीं युरोपिय महायुद्धास सुरवात झाल्यावरोबर हिंदुस्थानांतील हालचाली गांधी यांनीं बंद ठेवल्या. इंग्लंड अशा प्रकारें पेंचांत सांपडलें असतां त्याजवर प्रहार करणें म्हणजे शत्रूच्या पाठीवर प्रहार करण्याइतकेंच नामर्दपणाचें आहे, असें गांधी यांचे मत आहे. व्यक्ति काय अथवा राष्ट्र काय शत्रु पेंचांत सांपडला असतां त्याजवर प्रहार करणें हें नीतिदृष्टया गांधी यांना सारखेंच गर्हणीय वाटतें. या कारणानें महायुद्ध सुरू असतां गांधी यांनीं मोठया उत्साहानें ब्रिटिश साम्राज्यास आपणाकडून होईल ती मदत केली. मात्र असें करताना आपल्या धार्मिक तत्त्वांचें उल्लंघन त्यांनीं केलें नाहीं.

युद्धाची परिसमाप्ति होतांच गांधी यांनीं आपल्या चळवळीचें निशाण पुन्हां उभारलें. ब्रिटिश नौकरशाहीनें याच वेळेच्या सुमारास हिंदी प्रजाजनावर जुलुमाचा जो कहर केला, त्यामुळें तिला तावडतोब प्रत्युत्तर देणें गांधी यांना भागच पडलें. तावडतोब चळवळ सुरू करून असहकाराचें तत्व जोरानें प्रचारांत आणण्यास त्यांनीं सुरवात केली. या प्रचंड चळवळीच्या जबर धक्क्यानें ब्रिटिश साम्राज्य पायापासून डळमळूं लागलें आहे. गांधी यांच्या नेतृत्वाखालीं चाललेली ही चळवळ म्हणजे एक प्रचंड राज्यक्रांतीच आहे; पण आजपर्यंत इतिहासाला जितक्या क्रांत्या ठाऊक आहेत, त्यांच्याशीं या क्रांतीचें कोणतेंहि साम्य नाहीं. पूर्वीच्या क्रांत्या आणि ही चालू क्रांति यांत मुख्यतः चार बाबतींत भेद आहे.

पहिली बाब ही कीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश नौकरशाहीच्या विरुद्ध ही चळवळ अगदीं उघडपणें आणि तितक्याच निष्ठुरतेनें चाललेली आहे. या चळवळींत लपवाछपवीचा प्रकार मुळींच नाहीं. परकीयांच्या सत्तेबरोबर अवश्यपणें येणारी दुष्टता आणि अन्याय यांच्या तडाक्यांतून हिंदी लोकांना मुक्त करणें हाच आपला हेतु आणि दृढ निश्चय आहे, असें गांधी यांनीं अगदीं मोकळ्या मनानें जाहीर केलें आहे. ते म्हणतात, 'आपली अन्याय बुद्धि चालू सरकार

जोंपर्यंत सोडीत नाहीं, तोंपर्यंत मी त्यांचा कट्टा शत्रु आहे, ही गोष्ट त्यांनीं पक्की ध्यानांत धरावी. आम्हास न्याय देऊं नये, अशी या सरकारची कितीहि इच्छा असली, तरी त्याला न्याय द्यावयास लावणें हें माझें साध्य आहे आणि हें साधण्याकरतां त्याजवर प्रहार करून त्याला मी लुलें करीन. माझें अखरचें साध्य हेंच. या नौकरशाहीचें जीवित्व पेंचांत सांपडलें आणि ती नामशेष होण्याच्या मार्गाला लागली, तरी त्याची मला पर्वा नाहीं. तिची इतकी वेळ येईपर्यंत तिच्याशीं झुंझण्याचा मार्ग मीं बुद्धिःपुरस्सर स्वीकारला आहे.'

कायद्याच्या दृष्टीनें पाहतां ही भाषा राजद्रोहाची आहे, हें कोणालाहि उघड दिसणारें आहे आणि खुद्द गांधींनाहि ही गोष्ट समजत नाहीं, असें नाहीं. हिंदुस्थानांतील फौजदारी कायद्याखालीं न्याय कचेरींत त्यांना उभें केलें, तर हा आरोप त्यांना नाकारतां येणार नाहीं, हें उघड आहे व हें त्यांना स्वतःलाहि ठाऊक आहे; पण यावर ते उत्तर देतात. 'चालू नौकरशाहीबद्दल लोकांच्या मनांत इतका तीव्र असंतोष उत्पन्न व्हावा, कीं अशा प्रकारच्या सरकारशीं सहकारिता करून त्याचें गाडें चालू ठेवण्यास सहाय्य करणें ही गोष्ट लोकांस लज्जास्पद वाटली पाहिजे. लोकांचा विश्वास, आदर बुद्धि आणि सहाय्य हीं संपादन करण्याचा हक्क ज्या सरकारानें निखालस गमाविला आहे, त्याजविरुद्ध अप्रीति उत्पन्न करणें, हाच माझ्या भाषणांचा उघड उद्देश आहे.'

ब्रिटिश सत्तेविरुद्ध अशा प्रकारें प्रचंड चळवळ गांधी यांनीं चालविली असतां तिच्यात इंग्रज लोकांबद्दल द्वेषबुद्धि उत्पन्न होऊं न देण्याबद्दल आणि ही चळवळ अकलंकित ठेवण्याबद्दल गांधी यांनीं खबरदारी घेतली आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. जर्मनीशीं महायुद्ध चालू असतां, जर्मन सरकार आणि जर्मन प्रजा यांची सरमिसळ करून वड्याचें तेल वाग्यावर काढण्याचा मोह आपणापैकीं बहुतेकांस पडला होता; पण या दोपापासून अद्यापि गांधी अगदीं अलिप्त राहिले आहेत. ते म्हणतात, 'ब्रिटिश लोकांवर माझें प्रेम आहे आणि त्यांच्या सहवासाची मला गरज आहे, हें मी प्रांजलपणें त्यांना कळवितों; पण या गोष्टी अगदीं बरोबरीच्या नात्यानें आणि हिंदी लोकांच्या स्वाभिमानास धक्का न लागेल याच अटीवर झाल्या पाहिजेत.'

पूर्वींच्या क्रांत्या आणि ही क्रांति यांतील दुसरा मोठा फरक म्हणजे सशस्त्र प्रतिकाराचा अभाव हा होय. जुलूम अथवा दंडुकेशाही यांचें नांवसुद्धां या चळवळींत नाहीं. शांततापूर्वक चळवळ हेंच नांव या चळवळीनें घेतलें असून हिच्या

ध्वजेवरहि सूत्र हेंच आहे. गांधी हे स्वतः अप्रतिकाराच्या तत्त्वाचे कट्टे पुरस्कर्ते आहेत, ही गोष्ट दक्षिण आफ्रिकेंत त्यांनीं सिद्ध केल्याचें आपणास ठाऊक आहेच आणि तेथल्याप्रमाणेंच हिंदुस्थानातहि केवळ शांततेच्याच मार्गानें ते एक तर विजय मिळवितील अथवा तसें न घडल्यास नामशेष होऊन जातील. ते म्हणतात, "दंडनीतिमूलक धडामोडी युरोपांत अनेक झाल्या. युरोपांत या नीतीनें कांहीं कार्यभाग केला असला, तरी हिंदुस्थानांत ती सर्वथा निरुपयोगी आहे. आमचें युद्ध आम्हाला अधिक पवित्र शस्त्रानें अधिक उच्च भूमिकेवर आरूढ होऊन चालविलें पाहिजे. याकरतां या परमेश्वरद्वेष्ट्यांशीं आपण भक्तिमान झालें पाहिजे. त्यांच्या असत्याचा प्रतिकार आपण सत्यानें केला पाहिजे. त्यांची लुच्चेगिरी आणि दुष्टपणा यांच्याविरुद्ध मोकळेपणा आणि साधेपणा हीं हत्यारें आपण उभीं केलीं पाहिजेत. त्यांच्या भीतिमूलक दमननीतीला शौर्यानें आणि अत्यंत सहनशीलतेनें प्रति जबाब दिला पाहिजे. त्याच प्रमाणें आपल्या बाजूचे जे नसतील त्याजवर कोणत्याहि प्रकारचा जुलूम आपण करतां कामा नये."

लेनीन यांनीं हेंच शास्त्र तंतोतंत पाळलें असतें, तर आज केवढी मजा झाली असती! गांधी म्हणतात, 'आपल्या आप्तेष्टांचें जीवित आपणाला जितकें प्रिय आणि पवित्र वाटतें तितकेंच इंग्रज लोकांचें आणि त्यांच्या नोकरींतील अधिकारीवर्गाचें जीवितहि आपणास पवित्र वाटलें पाहिजे.' आयर्लंडांतील सिनफीन पक्षानें हा उपदेश अमलांत आणला, तर आज आयर्लंड किती शुद्ध बनून जाईल याचा विचार करा. गांधी आणखी म्हणतात, 'हिंदुस्थानानें तरवार पसंत केली, तर हिंदी मनुष्य या नात्यानें माझ्या जीविताची इतिश्री झाली असें मी समजतों. हिंदुस्थान ही माझी मातृभूमि आहे, असें म्हणण्यात आज मला मोठा अभिमान वाटतो; पण त्यानें तरवार हातीं धरली, तर असा अभिमान बाळगण्यास मला यत्किंचितहि जागा उरणार नाहीं! अशा रीतीनें अप्रतिकाराचें तत्व हिंदुस्थानांत आरूढ करण्याचें कारण हिंदु लोकांचें दौर्बल्य हें नव्हे असें गांधी ठासून सांगतात. उलट ते असेंहि म्हणतात कीं, नोकरशाहीच्या दमननीतीला पुरून उरेल, इतकें सामर्थ्य आमच्या अंगीं आहे, यामुळेंच प्रतिकराचें कारण आम्हास नाहीं. गांधी म्हणतात, 'अप्रतिकार हें दुबळ्याचें शस्त्र नसून वीर पुरुषाचें आहे, असें माझें मत आहे. हातांत कोणतेंहि शस्त्र न घेतां उघड्या छातीनें जो मृत्युमुखीं जातो, तोच खरा वीर आहे, असें मी समजतों. हातीं अशस्त्र होऊन आपल्या शत्रूसमोर जो उभा राहूं शकतो, तोच खरा बल

वान शिपायी आहे. हिंदुस्थान देश असाच समर्थ आणि शक्तिमान आहे, म्हणूनच त्यानें दंडाचा अवलंब करूं नये असें मी म्हणतों. हिंदुस्थानाला शस्त्राची गरज नाहीं. शस्त्रांवें आपणास दुर्वी असा भास आपल्या चित्ताला केव्हां केव्हां होतो, याचें कारण त्यावेळीं आपण म्हणजे नुसते हाडामांसाचे गोळे आहोंं, असा भ्रम आपल्या चित्ताला झालेला असतो हें होय. मी म्हणजे शरीर, असें वाटणें हेंच खरें दौर्बल्य. आपणाला चैतन्यमय आत्मा असून तो अविनाशी आहे, ही गोष्ट हिंदुस्थानानें जाणली पाहिजे. जडसृष्टि सारी एकवटून आपणावर उठली, तरी आपल्या आत्म्याचा नाश करण्याचें सामर्थ्य तिला नाहीं. एवढेंच नव्हे, तर या जडशक्तीला पायाखालीं तुडवून आपलें चैतन्य तिच्या हद्दीबाहेर जाऊं शकतें, हें तत्व हिंदुस्थानानें ओळखलें पाहिजे.'

'दंडाचा अवलंब न करणें, हा सत्यमार्ग आहे, अशी माझी खात्री असल्यामुळेंच त्याच्या प्रचाराचा उपदेश मी करतों. दंडनीतीनें न्याय्यमार्ग स्वीकारणें हा न्यायच नव्हे, तर स्वतःचें बलीदान करून न्यायारूढ होणें हेंच मानवजातीला उचित आहे. दंडापेक्षां क्षमा हें पुरुषार्थाचें अधिक उज्वल शस्त्र आहे क्षमा हें वीराचें भूषण आहे.' गांधी यांच्या चळवळींतील ही अंगें प्रमुख असल्यामुळेंच आपलें हें युद्ध म्हणजे धर्मयुद्ध आहे, असें ते म्हणतात. दंडत्याग हा केवळ तात्पुरता उपाय म्हणून नव्हे, तर तोच एक खरा मार्ग आहे, असा गांधी यांच्या बुद्धीचा निश्चय आहे. चिरकालिक स्वरूपाचा विजय आपणास मिळवावयाचा असेल, तर त्याला हा एकच मार्ग आपणास मोकळा आहे. ते म्हणतात, "दंडाचा पूर्ण अभाव हीच विजयाची पहिली कसोटी आहे. दंडाचें अस्तित्व शिल्लक असेपर्यंत विजय झाला म्हणतां येत नाहीं. जीविताचा आणि वित्ताचा नाश करण्याचा मार्ग हिंदुस्थानानें पत्करला, तरी त्याचा उपयोग काय ? खरा मार्ग म्हटला म्हणजे अत्यंत सहनशीलतायुक्त अप्रतिकार हाच होय. विश्वघटनेचें आदिबीज काय आहे, हें ज्याला समजत असेल, त्याच्या लक्षांत या मार्गाचें रहस्य अगदीं सहज येईल. विश्वबंधनें मूलतः जडरूप नसून तीं शुद्ध चैतन्यमय आहेत, हा मुख्य मुद्दा लक्षांत आला म्हणजे अप्रतिकाराचें रहस्य आपणासमोर ढळढळीत उभें राहील आणि क्रोधाचा शब्द उच्चारण्याचें अथवा तरवार परजण्याचें कारणच आपणास नाहीं, हेंहि आपणास समजेल. फार काय, पण कोणाविरुद्ध एक बोटहि उभें करण्याची इच्छा आपणास होणार नाहीं."

या दंडत्याग नीतींत आणखीहि एक पुढची पायरी आहे. केवळ दंडाचा

त्याग केला म्हणजे त्यांत सर्व आलें असें नाहीं. केवळ सहनशीलतेनें सर्व दुःखें गिळून बसणें हें या तत्त्वाचें एकच अंग आहे; आणि यापुढें याचें दुसरें अंग पुरुषार्थाचें आहे. हें अंग असहकारिता हें होय. सहनशक्तीची क्रिया ही परोक्ष स्वरूपाची अथवा अव्यक्त क्रिया होय. तिच्यापुढील पायरी अपरोक्ष अथवा प्रत्यक्ष क्रिया असहकारिता ही होय. याकरतांच हिंदुस्थानांतील नोकरशाहीचा गाडा ज्या क्रियांवर चालतो, त्या क्रियांत तुम्ही कोणताहि भाग घेऊं नका, असा उपदेश गांधी आपल्या अनुयायांना करतात. ज्या राजकीय अथवा सामाजिक क्रिया नोकरशाहीच्या जीविताला अत्यावश्य आहेत, त्यांत हिंदवासियांनीं कोणताहि भाग घेऊं नये, असा गांधी यांचा उपदेश आहे. याकरतां इंग्रजी वस्तूंचा त्याग करण्यास ते सांगतात. हा त्याग पूर्णतेस पोहोंचला म्हणजे नोकरशाहीच्या अमलाच्या मान्या नाड्या आंखडून तिला सन्निपात होईल, हें उघड आहे. हें उद्दिष्ट साधण्याकरतां सरकारी कौंसिलांत प्रवेश न करणें, हिंदी वकिलांनीं न्यायकचेऱ्यांवर बहिष्कार घालणें, आणि आईबापांनीं सरकारी शाळांत आपलीं मुलें न पाठविणें हे उपाय गांधी यांनीं सुचविले आहेत. त्याचप्रमाणें बहुमानदर्शक सरकारी पदव्यांचा त्यागहि त्यांना इष्ट वाटतो. युवराजांची स्वारी हिंदुस्थानांत येईल, तेव्हां त्यांच्या आदरसत्काराच्या भानगडींत कोणीहि पडूं नये, असें गांधी यांचें म्हणणें आहे. यथयावत् इंग्लिश मालावर बहिष्कार घालावा, असेंहि कांहीं लोकांचें म्हणणें होतें; पण गांधी यांस हें म्हणणें पसंत पडलें नाहीं.

गांधी यांचें हें मत विस्तृत प्रमाणावर प्रत्यक्ष कृतींत यावयास लागलें तर हिंदुस्थानांतील इंग्रजी अमलाचा नायनाट होईल हें उघड आहे. हेमलॉक नांवाच्या विषानें साक्रेटिसाचा अवयवामागून अवयव गारठून जाऊन ज्याप्रमाणें अखेरीस तो मृत्युपुरीं पडला, त्याचप्रमाणें इंग्रज नोकरशाहीचा एकेक अवयव थंड पडून तीहि यमधामी जाईल. जगाच्या मजरेस आजपर्यंत जो चमत्कार कधींहि पडला नाहीं, तो शांततामय क्रांतीचा चमत्कार अशा रीतीनें जगाच्या नजरेस पडेल.

हिंदुस्थानांतील आचार, विचार आणि तत्त्वज्ञान यांच्या दीर्घकालीन परंपरेचें विशिष्ट तत्त्व लक्षांत घेऊन त्याच्या अनुरोधानें हिंदुस्थानाची नैतिक आणि धार्मिक उन्नति करण्याचें कार्य दाखरोबरच सुरू करून गांधी यांनीं आपल्या या महत्त्वाच्या चळवळीवर जणूं काय मुकुट चढविला आहे. याच उद्देशानें कारण शेष

पर्यंत पाश्चात्य संस्कृतीची छाया हिंदुस्थानापासून दूर ठेवण्याचा यत्न ते करतात. मजूरवर्गाची गुलामगिरी, जडवादाचा पूर्ण अंगिकार आणि पाश्चात्यांची लक्ष्मी-पूजनाची हौस आणि या साऱ्या परंपरेमुळे उद्भवणारी युद्धें यांजपासून हिंदुस्थानाला अलिप्त करण्याचा त्यांचा हेतु आहे. हिंदुस्थानांत जातिभेदामुळें जे अनेक *तट समाजांत पडले आहेत, त्यांचा उच्छेद करून तेथील जनतेचा एक सुसंघटित* समाज बनविणें, ही या कार्याची पहिली पायरी आहे. याच हेतूनें धर्माधर्मांतील भेद आणि जातिभेद यांचें उन्मूलन त्यांनीं चालविलें आहे. हिंदु आणि मुसलमान या दोन विधर्मीयांनीं पूर्ण बंधुभावानें एकत्र नांदावें, असा त्यांचा यत्न सुरू आहे. हिंदुस्थान देश साऱ्या जगाला आदर्शवत होऊन बसेल, आणि हेंच त्याचें नियुक्त कार्य आहे, असा गांधी यांचा पूर्ण विश्वास आहे. गांधी हे कल्पनासृष्टींत तरंगणारे असले, तरी ते व्यवहारकुशलहि आहेत. त्यांची कल्पनासृष्टिहि केवळ एकांगी नाहीं. केवळ एखाद्या देशाकरतां अथवा एकाद्या मानवकुलाकरतांच अमुक एक गोष्ट करावी, असें त्यांना वाटत नाहीं. असलीं पार्थिव बंधनें तोडून त्यांच्या कल्पनासृष्टीनें पलीकडे उड्डाण केलें आहे. साऱ्या मनुष्यजातीनें एका कुटुंबाप्रमाणें एकत्र नांदावें अशी त्यांची इच्छा आहे. डोंगर आणि नद्या यांनीं त्यांच्या दिव्य साध्यांत खंड उत्पन्न केलेला नाहीं. ते म्हणतात, 'माझ्या धर्माला पर्वतांचीं अथवा समुद्राचीं बंधनें नाहींत. भूगोलरचनेंतील विशिष्ट तत्व त्यांच्या प्रसाराआड येऊं शकत नाहीं. या माझ्या श्रद्धेंत कांहीं खरा जिवटपणा असेल तर माझी प्रेमभावना हिंदुस्थान सोडून त्याच्या बाहेरहि जाऊं शकेल.'

महात्मा गांधी हे अशाप्रकारचे गृहस्थ आहेत. आपल्या कल्पनासृष्टीची आणि ध्येयाची पूर्ण जाणीव हृदयांत सदोदित बाळगून आपल्या सामान्य बांधवांत ते रहात आहेत. गांधी हे एका गांवाहून दुसऱ्या ठिकाणीं जावयास निघाले म्हणजे केव्हां पन्नास पन्नास हजार लोकांचे समुदाय त्यांच्याभोंवतीं जमतात. त्यांचा एकादा शब्द तरी कानीं पडावा म्हणून मोठ्या उत्सुकतेनें ते वाट पाहतात. एकाद्या खेड्यांत अथवा एकाद्या शेतांत रात्रीचा मुक्काम त्यांनीं केला; तर तेथें ताबडतोब मोठी यात्रा जमते. एकाद्या पवित्र मानलेल्या स्थळाकडे ज्याप्रमाणें यात्रेकरूंच्या झुंडी धांव घेतात, त्याच प्रमाणें गांधींच्या मुक्कामाच्या ठिकाणाकडे प्रचंड लोकसमुदाय जमा होऊन त्या जागेला पवित्र स्थळाचें रूप प्राप्त होतें. गांधी हे पूर्णत्व पावलेले आणि विश्वरूप झालेले महात्मा होत, असा हिंदी लोकांचा विश्वास आहे आणि हा विश्वास अस्थानीं नाहीं, असें दिसतें. राजकारणाच्या

बाबतींत गांधी हे लेनीन इतकेच कठोर आहेत. लेनीनचे पाय ज्याप्रमाणें सामान्य भूमि कधींहि सोडीत नाहींत, त्याचप्रमाणें गांधीहि या बाबतींत व्यवहाराला पक्के चिकटून आहेत. आपलें साध्य प्रत्यक्ष सृष्टींत आणण्याकरतां लेनीन जितक्या चिकाटीनें धडपडतात, तितक्याच चिकाटीनें गांधीहि आपलें अंगीकृत कार्य करीत आहेत; पण लेनीनप्रमाणें त्यांची बुद्धि रजोगुणी नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. लेनीन यांची रजोगुणी बुद्धि प्रसंग पडला म्हणजे तमोगुणाचा आश्रय करते; पण गांधी यांची व्यवहारांतली रजोगुणी बुद्धि व्यवहार सुटल्याबरोबर शुद्धसत्वाच्या निरामय वातावरणांत प्रवेश करते. रोमेन रोलँड याजप्रमाणें या पवित्रस्थळीं वास करून तेथून व्यवहाराचें नियमन ती करीत असते. शुद्ध चैतन्याचा आश्रय रोमेन रोलँड यांची बुद्धि ज्याप्रमाणें सोडीत नाहीं, त्याच प्रमाणें गांधी यांच्या बुद्धीलाहि या शुद्ध पुण्यमय वातावरणाचा विसर पडत नाहीं. रोलँड यांचा विचार मनांत येण्याबरोबर मला टॉलस्टॉय यांच्या मूर्तीचें स्मरण होतें. लेनीन यांच्या आठवणीबरोबर नेपोलियन मला दिसू लागतो आणि गांधी यांचा विचार चित्तांत येतांच माझ्या मनःचक्षुंपुढें मूर्तिमंत येशुख्रिस्त उभा राहतो. ख्रिस्ताच्या जीवितयात्रेची पुनरावृत्ति येथें दिसूं लागते. ख्रिस्ताचेच शब्द गांधींच्या मुखानें पुन्हा ऐकूं येऊं लागतात. ख्रिस्ताप्रमाणेंच गांधी देहदंड भोगीत आहेत मनुष्यजातीनें उन्नतिमार्गाला लागावें म्हणून ख्रिस्ताप्रमाणेंच आपल्या जीवाची आटापीट ते करीत आहेत आणि आपलें हें स्वर्गीय साम्राज्य पृथ्वीवर स्थापन करण्याचा उद्योग करीत असतां, ते धीराला वंचित अशा स्थितांत देह सोडतील.

आपल्या शिष्यमंडळीसह येशुख्रिस्त कोठें परगांवी जात असतां त्याच्या शिष्यमंडळींत मोठा वाद्‌विवाद सुरू झाला, म्हणून, त्यानें चवकशी केली; तेव्हां एका शिष्यानें म्हटलें, सर्वश्रेष्ठ मनुष्य कोण याबद्दल आमचा वाद चालला आहे. त्यावर ख्रिस्तानें उत्तर दिलें, 'सर्वांच्या शिरोभागीं बसण्याची ज्याची इच्छा असेल, त्यानें सर्वांची सेवा करावी.' ख्रिस्ताच्या या उत्तराची आठवण आजच्या या प्रसंगीं आल्यावांचून रहात नाहीं.

रे. जान हेन्स होम्स.

पद्धतीहून गांधी यांची पद्धत सर्वथा वेगळी आहे. सामान्यतः कोणताहि राजकारणी पुरुष अथवा सामान्यराजकीय चळवळ्या ज्या हेतूनें आपल्या कार्यास आरंभ करतो, तसल्या प्रकारच्या हेतूनें गांधी यांना त्यांच्या कार्याची प्रेरणा झालेली नाहीं. सामान्य चळवळ्यांचे उद्देश गांधी यांना कर्मप्रवृत्तीकडे नेण्यास मुळींच उपयोगी पडत नाहींत. सामान्य राजकारणी मनुष्याची जी दानत आपल्या अनुभवास नेहमीं येते, तिच्या अगदीं उलट गांधी यांची मनःप्रवृत्ति आहे. अशाप्रकारें आजपर्यंतचे आखीव मार्ग सोडून गांधी अगदीं उलट दिशेनें जात असताहि स्वबांधवांवर त्यांचें जें अनुपमेय वजन पडलें आहे, त्यामुळेंच गांधी यांची ही विशिष्ट मनःप्रवृत्ति विशेष आदरणीय झाली आहे. आजपर्यंतचा चालू रस्ता सोडून आणि त्याच्या उलट दिशेनें जाऊनहि गांधी यांना एवढें अतुल महत्व कसें प्राप्त झालें, याचा विचार करणें अवश्य आहे. पूर्वेकडील एका ब्रिटिशप्रांताचा गव्हर्नर बोलतां बोलतां एकदां म्हणाला, 'गांधी हा बहकलेला आणि भयंकर साधु पुरुष आहे.' गांधी हे सत्पुरुष आहेत, या गोष्टीबद्दल त्यांचे शत्रु आणि मित्र या दोघांचीहि एकवाक्यता आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे; आणि गांधी हे साधु पुरुष असल्यामुळेंच हिंदुस्थानांत आज त्यांना अतर्क्य महत्व प्राप्त झालें आहे.

'गांधी हा एक सत्पुरुष हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याला मोठा भयंकर शत्रु आहे.' असें गांधी यांचें वर्णन अमेरिकेंतील एका मासिकानें केलें आहे. केवळ एकच व्यक्ति आपल्या कडक आचरणानें आणि उग्र तपश्चर्येनें ब्रिटिश साम्राज्यासारख्या अफाट आणि शक्तिमान साम्राज्याचें शत्रुत्व करूं शकतें, हा नुसता देखावाहि किती मननीय आहे, बरें ? ड्यूक ऑफ कॅनाट यांची स्वारी हिंदुस्थानांत गेली असता निरनिराळ्या प्रांतांतील मोठमोठीं शहरें त्यांच्या आगमनाच्या वेळीं ओस पडल्यासारखीं कशीं दिसत होतीं, यांची हकीकत आतां सर्वांस कळून चुकलीच आहे. हिंदुस्थानांतील सामान्य जनतेच्या मनांत राजघराण्यांतील पुरुषाबद्दल विशेष आदर वसत असतो. ही आदरबुद्धि आजकालची नसून फार प्राचीन काळापासून राजभक्तीबद्दल हिंदुस्थानदेश प्रसिद्ध आहे. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे ड्यूकसाहेबांस मिळालेल्या या विलक्षण सत्काराचें रहस्य वाचकांच्या ध्यानीं येईल. विशेषतः जार्ज बादशहा हिंदुस्थानांत गेले होते, तेव्हा त्यांचा शहरोशहरीं झालेला प्रेमाचा आणि थाटमाटाचा आदरसत्कार आणि ड्यूकसाहेबांचा हा अनादर यांतील फरक कोणासहि मननीय वाटल्यावांचून

राहणार नाहीं. आतां या फरकाला आणखी एका बाबींत विशेष महत्वाचें स्वरूप प्राप्त होतें. खुद्द बादशहाचा चुलता जात असतां जे रस्ते निर्मक्षिक होते, त्याच रस्त्यानें गांधी जाऊं लागले, म्हणजे एकायास उभें राहण्यापुरती जागाहि दुष्कर होते, असा हा विलक्षण फरक कशानें झाला ? खुद्द राजधानीचेंच उदाहरण पहा. *गांधी यांची स्वारी दिल्लीला गेली, तेव्हां पाऊण लाखावर माणूस दिल्लीच्या स्टे*शनावर लोटलें होतें. स्टेशनवरच्या अधिकारीवर्गानें आपापले अधिकार तात्पुरते या मंडळीच्या स्वाधीन केले होते. स्टेशनच्या आवारांत गाडी घेण्यापासून *तों गाडींतील सर्व माणसें उतरून स्टेशनाबाहेर जाईपर्यंत तेथें रेलवेच्या अधि*कान्यांचें अस्तित्वच जणूं नव्हतें. पुढें दिल्लीच्या रस्त्याच्या दुतर्फेची सर्व घरेंदारें माणमांनीं फुलून गेलीं होतीं. मुक्कामावर जाईपर्यंत गांधींच्या मागें एक लाखाहून अधिक जनसमाज लोटत होता, *असें म्हटल्यास तें अतिशयोक्तीचें होणार* नाहीं.

हा विलक्षण चमत्कार कां घडून आला, याचा विचार केला, म्हणजे त्याच्या *मुळाशीं एक अगदीं साधें कारण आहे, असें आपणास दिसून येईल. गांधी यांज*बद्दल हिंदुस्थानांतील सामान्य जनतेच्या मनांत जी आदरबुद्धि आहे, याचें कारण त्यांचें साधुत्व हें एकच नाहीं, तर राष्ट्रीय आकांक्षाचे पुरस्कर्ते या नात्यामुळेंच *हें विशेष महत्व त्यांना प्राप्त झालें. राजकारण हा गांधींचा जन्मजात मनोधर्म* नाहीं. कांहीं राजकारण करावें या हेतूनें सांप्रतच्या चळवळींत ते पडलेले नाहींत. किंबहुना राजकारणांत यश मिळविण्यास आवश्यक म्हणून मानलेले गुणहि त्यांच्या *अंगीं नाहींत असें म्हटलें तरी चालेल. राजकारणी पुरुषांची ठराविक भाषापद्धति* गांधी यांस ठाऊक नाहीं. महत्वाच्या गोष्टी गुलदस्तांत ठेवाव्या, पूर्वेकडे जावयाचें असल्यास उत्तरेकडे तोंड करावें अथवा प्रतिपक्षास नुमत्या भाषेच्या जाळ्यांत फसगतीनें बांधून टाकावें, इत्यादि अनेक विद्यांपैकीं एकायाहि विद्येचा वास गांधी यांच्या ठिकाणीं नाहीं. त्यांना लपंडाव समजत नाहीं आणि तो खेळतांहि येत नाहीं. आपल्या आकांक्षा काय आहेत. याची सारी माहिती आपल्या प्रतिपक्षास ते अगदीं मोकळेपणानें देतात. आपलें म्हणणें आपल्या प्रतिपक्षासमोर ते मांडतात, तेव्हां त्यांत आणखी एकादा पडदा असून त्या पडद्यामागें एकादी वेगळीच घटना घडत असेल, अशी शंकाकुशंका घेण्याचें कारण नाहीं. 'त्यार्थं मयार्थं' असली *राजनीतीची नीति गांधी यांस ठाऊक नाहीं. तूं अमुक सोडलेंस तर मी अमुक* *सोडीन, ही भाषा गांधी कधींहि बोलावयाचे नाहींत.* केवळ एकादा प्रसंग पार

पाडण्यासाठीं ह्मणून आपल्या तत्वापासून ते किंचित् काळ तरी ढळले, असें एकहि उदाहरण आजपर्यंत कोणालाहि ठाऊक नाहीं. प्रसंग कितीहि निकराचा अथवा कितीहि कष्टप्रद असला, तरी आपल्या स्वीकृत तत्वापासून आजपर्यंत गांधी कधींहि भ्रष्ट झाले नाहींत. मी अमुक एका पक्षाचा असा अभिमान कोणत्याहि विशिष्ट पक्षाबद्दल गांधी कधींच बाळगीत नसल्यामुळें इतर पक्षांवर आपल्या पक्षाची मात करावी, असली आकांक्षाहि ते कधींच बाळगीत नाहींत. त्यांना कोणाहि व्यक्तीचा अथवा पक्षाचा विशेष अभिमान मुळींच नसल्यामुळें 'अरिमित्रींसमान' अशी त्यांची वृत्ति साहजिकपणेंच बनली आहे. यामुळें शत्रूच्या शिव्या आणि मित्रांच्या ओव्या या त्यांना सारख्याच योग्यतेच्या वाटतात. 'निंदेतें नेघे स्तुति न श्लाघे' हेंच त्यांचें वर्णन कोणी केलें, तर तें अगदीं उचित होईल. ते स्वतःच एके ठिकाणीं म्हणतात, 'आजपर्यंत जितके धर्मवीर माझ्या पाहण्यांत आले, त्यांतील बहुतेक अंतर्यामीं राजकारणी पुरुष होते. वस्त्रें संन्याशाचीं आणि मन राजकारणाचें अशी त्यांची स्थिति होती. माझी मनोभूमिका याच्या उलट आहे. माझा दृश्य पेहराव राजकारणी पुरुषाचा असला, तरी माझें मन धर्मपरायण आहे.'

गांधी यांच्या राजकारणाचें स्वरूप कसेंहि असलें, तरी स्वतःच्या तपःसामर्थ्यानेंच हिंदुस्थानास तें लोकप्रिय होण्यासारखें आहेत. त्यांचें सारें जीवनचरित्र लोकांच्या समोर आहे आणि त्यांच्या संन्यस्त वृत्तीमुळेंच हिंदीलोक त्यांच्या भजनीं लागले आहेत. हिंदुस्थानांतील सामान्य जनतेवर त्यांचें इतकें वजन असल्यामुळेंच हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याचे ते एक भयंकर शत्रु आहेत असे त्यांच्या प्रतिपक्षास वाटतें. मानमरातब अथवा पैसा यांच्या लांचाला भुलून ते आपली चळवळ सोडतील ही गोष्टच बोलावयास नको. कोणतेंहि तत्व त्यांनीं एकवार आपलेंसें केलें आणि तें आचरणांत आणण्याचा त्यांचा निश्चय एकवार झाला, कीं आपल्या जिवलग मित्रांच्या मुरवतीसाठीं सुद्धां एक तसूभरहि आपल्या व्रतापासून ते ढळावयाचे नाहींत. एकादा प्रसंग असा असतो कीं त्यावेळीं आपलें तत्व क्षणभर बाजूला ठेवल्यास आपल्या पक्षाला हजारों अनुयायांची जोड मिळण्याचा संभव असतो; पण अशा प्रसंगींसुद्धां गांधी व्रतभ्रष्ट होत नाहींत. गांधी यांजबद्दल कांहीं लोकांचा एक गैरसमज असल्याचें केव्हां केव्हां दिसून येतें. गांधी यांच्या प्रभावळींतील माणसें त्यांच्या वजनाचा उपयोग करून त्यांच्या नांवानें हव्या त्या चळवळी करीत असतात, असा कांहीं

लोकांचा समज आहे; पण हा समज सर्वथा चुकीचा आहे. जहाल चळवळ्याच्या पचनीं पडून आपल्या नांवाचा कसल्याहि प्रकारचा उपयोग गांधी त्यांना कधींच करूं द्यावयाचे नाहींत. कोणाहि स्नेह्याच्या मुरवतीस बळी न पडणारा माणूस जर कोणी असेल तर ते गांधी हेच होत. गांधी यांशीं माझी प्रथम मुलाखत झाली त्यावेळीं माझ्यासमोरच घडलेल्या एका हकीकतीवरून या त्यांच्या कडक वृत्तीबद्दल माझी पुरी खात्री झाली.

दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी वसाहत वाल्यांशीं तेथल्या गोऱ्या वसाहतवाल्यांचें जें विरोधी वर्तन बराच काळ सुरु होतें, त्याला इ. स. १९१३ सालच्या पावसाळ्यांत बरेंच उग्ररूप प्राप्त झालें. ब्रिटिशसाम्राज्यांतील गोऱ्या प्रजाजनाप्रमाणेंच हिंदी प्रजानाहि दक्षिण आफ्रिकेंत समान हक्क मिळविण्यासाठी बरींच वर्षे गांधी खटपट करीत होते. या चळवळींत पडण्यापूर्वीच वकिलीचा धंदा ते करीत असत आणि त्यांत त्याना प्राप्तीहि चांगली होत असे; पण या एकाच कार्याला स्वतःला वाहून घेण्यासाठीं आपला धंदा त्यानीं सोडला. इ० स० १९१३ सालच्या आक्टोबर महिन्यांत गांधी यांनीं शांततायुक्त प्रतिकाराची चळवळ दक्षिण आफ्रिकेंत सुरू केली. आफ्रिकन सरकारास आपले हक्क कबूल करावयास लावण्याचा उपक्रम गांधी यांनीं अशा रीतीनें सुरु केला. गांधी यांच्या आज्ञेप्रमाणें हजारों स्त्रीपुरुष आणि मुलें नाताळमधून निघून परवान्याशिवाय ट्रान्सवालच्या मुलुखांत शिरलीं आणि याच चळवळीला दुजोरा म्हणून दुसऱ्या शेंकडों हिंदी मजुरांनीं संप करून ते खाणींतून आणि साखरेच्या कारखान्यांतून बाहेर पडले. या हजारों संपवाल्यांस आफ्रिकन सरकारानें तावडतोब कैद केलें; पण एवढी मोठी संख्या कोंडण्यास पुरेसे तुरुंग नसल्यामुळें खाणींचाच उपयोग तुरुंगासारखा करून त्यांतच या मजुरांना बंदि-वान केलें. यांजबरोबरच गांधी आणि त्यांचे दोन तीन सहकारी युरोपीय मित्र यांनाहि सरकारानें कैदेंत टाकलें. ही हकीकत हिंदुस्थानांत समजली, तेव्हां तेथें एवढी प्रचंड खळबळ झाली कीं त्यावेळचे व्हाइसराय लॉर्ड हार्डिंग यांना तिकडे लक्ष देणें भाग पडलें आणि मद्रास येथील एका सभेंत हार्डिंग यांनीं आ-फ्रिकन सरकारच्या या कृत्याचा उघडपणें तीव्र निषेध केला. हिंदुस्थानांत प्रांतो-प्रांतीं प्रचंड जाहीरसभा होऊन निषेधाचे ठराव पास होऊं लागले. यामुळें हिंदु-स्थान सरकार आणि ब्रिटिश प्रधानमंडळ धावरून गेलें. आतां ही गोष्ट अतिरेकास चालली, हें पाहून आफ्रिकन सरकारानेंहि पड घालल्यासारखें दाखवून या साऱ्या प्रकरणाची शहानिशा करण्याकरतां घाई घाईनें एक कमीशन नेमलें. हिंदी

लोकांच्या अडचणी काय आहेत, याचा खल करून कमिशननें आपला रिपोर्ट सरकारास सादर करावयाचा होता. या कमिशनांत नेमलेल्या गृहस्थांच्या यादींत एकहि हिंदी पुढाऱ्याचें अथवा हिंदी लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधीचें नांव नव्हतें. त्याचप्रमाणें या कमिशनांत कोणत्या मुद्यांचा खल व्हावा, याची अगाऊ चवकशी करण्याच्या वेळीं कोणाहि हिंदी पुढाऱ्याचें मत आफ्रिकन सरकारानें विचारलें नव्हतें. तेव्हां गांधी यांनीं या कमिशनास हरकत घेतली आणि या मंडळांत हिंदी लोकांचा एक तरी प्रतिनिधी असावा अशी मागणी केली. आफ्रिकन सरकारनें गांधी यांचें म्हणणें साफ नाकारलें. तेव्हां सरकारच्या या कृतीला प्रत्युत्तर म्हणून या कमीशन पुढें साक्ष देण्यास ते स्वतः तर गेले नाहींतच, पण कोणाहि स्वाभिमानी हिंदी गृहस्थांनीं साक्षीला जाऊं नये, अशी आपली सल्ला असल्याचें त्यांनीं जाहीर केलें. हिंदी लोकांच्या अडचणींचा विचार करण्यासाठीं म्हणून नेमलेल्या कमिशनापुढें कोणाहि हिंदी गृहस्थाची साक्ष झाली नाहीं, तर त्याचें कार्य म्हणजे वंध्या सुताचीच कहाणी होणार, हें उघड आहे. तथापि प्रसंगीं हिंदी लोकांविरुद्ध जाणारा असाहि एक आक्षेप येण्यासारखा होता. हिंदी लोकांची ही सारी चळवळ मुळातच गैरमुद्याची आणि फोल असल्यामुळेंच कमीशन पुढें त्यांनीं साक्ष दिली नाहीं, असें त्यांच्या प्रतिपक्षास म्हणतां येण्यासारखें होतें. हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध मुत्सद्दी ना. गोखले यांच्या लक्षांत हा मुद्दा आला, तेव्हां या निश्चयापासून गांधी यांचें मन परावृत्त करण्याकरतां नामदार साहेबांनीं त्यांना कित्येक तारा पाठविल्या. हिंदी लोकांनीं या कमीशनवर अशा प्रकारचा बहिष्कार घातला, तर इंग्लंडांत आणि खुद्द दक्षिण आफ्रिकेंत या कार्याबद्दल जी थोडीबहुत सहानुकंपा उत्पन्न झाली आहे, तिला सो धमण्याचा संभव आहे, असेंहि गांधी यांस नामदारांनीं कळविलें. खाजगी रीतीनें गांधी नामदारसाहेबांचे भक्त होते. नामदार साहेबांना गांधी गुरूच्या ठिकाणीं मानीत होते आणि त्यांजबद्दल गांधी यांच्या मनांत खरी पूज्य बुद्धीहि होती; तथापि कमीशनचा हा प्रश्न खासगी नसून तत्त्वाचा होता, ही महत्त्वाची गोष्ट गांधी विसरले नाहींत. सान्या हिंदी वसाहतवाल्यांचा मान आणि स्वाभिमान येथें कसास लागणार आहे, असें त्यांना वाटत होतें. यामुळें प्रत्यक्ष गुरूचा उपदेशहि बाजूला ठेवून गांधी आपल्या तत्त्वापासून यत्किंचितहि ढळले नाहींत. केवळ, राजकारणी पुढाऱ्याच्या दृष्टीनें पाहतां नामदार गोखले यांचें म्हणणें बरोबर होतें. अशा प्रसंगास पाठ देणें व्यवहारिक दृष्ट्या कदाचित् अधिक उचित दिसलें असतें, हेंहि गांधी यांस सम-

जत होतें. आपला मुद्दा न सोडण्यांत नामदारसाहेबांस दुःख होण्यासारखें वर्तन आपण करीत आहों, हें गांधी यांस समजत नव्हतें असें नाहीं; तथापि तत्वभ्रष्ट होण्यापेक्षां या साऱ्या विरुद्ध गोष्टींचाहि स्वीकार करणें त्यांना अधिक बरें वाटलें आणि त्यांनीं एक पाऊलहि मागें न घेतल्यामुळें एकहि वजनदार हिंदी गृहस्थ त्या कमीशन पुढें साक्ष देण्यास आला नाहीं.

कोणत्याहि प्रसंगीं मतभ्रष्ट व्हावयाचेंच नाहीं, ही प्रतिज्ञा गांधी जितक्या कडकपणें पाळतात, तशी ती पाळणारे लोक अगदीं क्वचितच आढळून येतात. जेथें उचित स्वाभिमानाचा प्रश्न आला, तेथेंच गांधी कधींहि नमतें घ्यावयाचे नाहींत. त्या ठिकाणीं सवलतीचा व्यवहार करण्याची गोष्ट ते मनांत सुद्धां आणावयाचे नाहींत. गांधी यांच्या त्या दृढ निश्चयी स्वभावाचा अनुभव मला प्रथम आला, तेव्हां मला खरोखरच फार नवल वाटलें. आणि त्यानंतरहि वेगवेगळ्या परिस्थितींत त्यांची व माझी भेट झाली; पण हिंदभूमीचा अभिमानाचा प्रश्न जेथें आला तेथें गांधींनीं नमतें घेतल्याचा एकहि प्रसंग मला आढळत नाहीं. गांधी यांचें हें दृढ व्रत अदूरदृष्टीचें आहे, असें कित्येक म्हणतात. प्रसंग पाहून हें व्रत त्यांनीं थोडें बहुत सैलावलें तर आजच पुष्कळ फायदा त्यांना करून घेतां येण्यासारखा आहे; पण केवळ कल्पना सृष्टींतील एकादें उच्च ध्येय केव्हांतरी भविष्यकाळीं साधण्याच्या मागें लागून हा आजचा फायदा ते फुकट घालवितात, असें या लोकांचें म्हणणें आहे. तुरत दान आणि महापुण्य हा मंत्र या लोकांच्या दृष्टीनें अधिक फायदेशीर आहे; पण वास्तविक पाहातां हेच लोक अदूरदृष्टीचे आहेत, असें आपणांस दिसून येईल. गांधी यांच्या ठिकाणीं असलेल्या सामर्थ्याचें एकादें कारण असेल तर तें त्यांचें दृढव्रत हेंच होय. या व्रताचा त्याग म्हणजे त्याच्या हातांतील वज्राचाच त्याग होय. हें व्रत गमावून बसल्यानंतर गांधी यांस या आखाड्यांत उभें राहाण्यापुरतीहि जागा शिल्लक राहणार नाहीं. आज गांधी यांशीं कोणतीहि तडजोडीची भाषा बोलावयाची तर त्यांच्या सत्याधिष्ठित तत्वाला अंशतःहि बाधक अशी कोणतीहि गोष्ट गांधी कालत्रयीहि मान्य करावयाचे नाहींत, ही गोष्ट त्यांच्या प्रतिपक्ष्यांना पक्की माहीत आहे. या मुख्य तत्वाला सोडून कितीहि फायद्याचा मार्ग आपण त्यांना दाखविला, तरी त्याचा स्वीकार ते कधींच करावयाचे नाहींत, अशी त्यांची पुरी खात्री आहे. सत्यवस्तूचें व्यावहारिक स्वरूप कोणतें याबद्दल मतभेद असण्याचा संभव आहे. याबद्दलचीं गांधी यांचीं मतें आपणास कदाचित

मुळींच मान्य व्हावयाचीं नाहींत. त्याचप्रमाणें आपल्या ध्येयाच्या सिद्धीकरतां जे मार्ग गांधी स्वीकारतात; तेहि आपणास नापसंत होण्यासारखे असतील; तथापि गांधी यांशीं संभाषणाचा प्रसंग ज्यांना ज्यांना येतो, त्यांना त्यांना त्यांच्या शुद्ध निस्वार्थपरायणतेची साक्ष पटल्यावांचून रहात नाहीं. कोणतेंहि कार्य गांधी करीत असले, तरी स्वतःच्या कीर्तीचा अथवा समाजांतील आपल्या पायरीचा विचारहि त्यांच्या चित्तांत नसतो. आपल्या कृतीनें यांपैकीं एकाधा वस्तूस उणेपणा येईल कीं काय असा विचार ते कधींच करीत नाहींत. आपलें सर्वस्व गेलें तरी त्या भीतीनें आपल्या मतापासून ते भ्रष्ट व्हावयाचे नाहींत.

गांधी यांची शरीरयष्टि आणि त्यांचा चेहरा हीं पाहून प्रेक्षकाच्या मनांत एकदम मोठा पूज्यभाव उत्पन्न होतो असें नाहीं. त्यांच्या अलौकिकपणाचें अस्तित्व या बाह्य देखाव्यांत एकदम दिसण्यासारखें नाहीं. तपस्व्यासारख्या कडक आचरणामुळें त्यांची शरीरयष्टि क्षुद्र झाल्यासारखी दिसते. ती मनांत भरण्यासारखी आहे, असें मुळींच नाहीं. शरीर कोणत्या स्थितींत आहे, हा हिशेबच त्यांच्या गांवीं नसावा असें वाटतें. सूक्ष्म धर्मतत्वें या शरीराच्या रूपानें स्पष्टदशेस आलीं असावींत, असें म्हणणेंच अधिक श्रेयस्कर होईल. या स्पष्टीकरणांतील मुख्य मुद्दा शुद्ध चिद्रूप असल्यामुळें जड शरीराचा हिशेब तेथें येत नाहीं, हें योग्यच आहे. दक्षिण आफ्रिकेंत त्यांची व माझी पहिली भेट झाली, तेव्हां ते एकच वेळ जेवीत असत. आणि त्यांत कांहीं फळें, थोडासा मेवा आणि भाकरी, इतकेंच जिन्नस असत. ते झोंप अगदीं थोडी घेत आणि अगदीं पहांटेपासून पुढें जवळ जवळ मध्यरात्र होईपर्यंत आपल्या उद्योगांत ते गढलेले असत. या वेळांत पुष्कळ माणसें त्यांच्या भेटीला येत. त्यांच्याशीं वादविवाद करून आपल्या मोहिमेची पुढील दिशा ते आंखीत आणि हिंदुस्थानांत अथवा प्रिटोरिया येथें कांहीं महत्वाचे खलिते रवाना करावयाचे असले, तर तेंहि काम त्याच वेळांत ते करीत. एकादें फार महत्वाचें काम चालू असतां एकादा दरिद्री शेतकरी भेटावयास आला, तर फुरसत नाहीं, या सबबीवर ते त्याला कधींच विन्मुख लावीत नसत. त्यांची सल्ला मसलत घेण्याकरितां मिळान्यांतला भिकारी मजूर आला, तर निकडीचें कामहि क्षणभर बाजूला ठेवून त्याची भेट ते घेत. ते जेवावयास बसले असतां कोणी तरी भेटीस यावें, असेहि प्रसंग पुष्कळ येत; पण त्यावेळीं सुद्धां त्याला आंत बोलावून आणि आपल्या शेजारीं त्याला बसवून त्याचें म्हणणें ते शांतपणें ऐकून घेत. गांधी हे आपले जिवलग स्नेही आहेत, असा भरंवसा

अत्यंत दरिद्री मनुष्याच्या मनांतहि पूर्ण असे. कारण कोणत्याहि स्थितींतल्या मनुष्याला चार शब्द बोलल्यावांचून ते विन्मुख लावीत नसत. सेनापति स्मट्स आणि बोथा यांच्या भेटीसाठीं ते राजधानीला गेले, तेव्हां हातमागावरचा साधा नेहमींचा कपडा घालून अनवाणी पायानें गेले. एवढया मोठ्या राजकर्त्यांची भेट घ्यावयाची म्हणून आपल्या पोषाकांत त्यांनीं कसलाच फरक केला नाहीं. गांधी यांचें प्रेममय अंतःकरण आणि त्यांची तितिक्षा या गुणांची छाया त्यांच्या चेहऱ्यावरहि स्पष्ट दिसते. आजपर्यंत साधु म्हणून म्हटलेले पुष्कळ पुरुष मीं पाहिले; पण गांधी यांच्या दर्शनाबरोबर सेंट फ्रान्सिसचें चित्र जसें माझ्या नजरेसमोर एकदम उभें राहिलें, तसा अनुभव पूर्वी मला कधीं आला नव्हता. द्वेषाला प्रेमानें जिंकण्यासाठीं जे यत्न करीत असतील त्यांचा अखेरीस जय निश्चितपणें होईल, असा गांधी यांचा दृढ विश्वास आहे. स्वबांधवांना अन्यायानें वागविणाऱ्या लोकांबद्दलहि द्वेषदर्शक असा एक शब्दसुद्धां आपल्यासमोर कोणास ते उचारूं देत नाहींत. आपल्या उच्चतम नैतिकबलाच्या तेजानें राजकर्त्यांचीं मनें वळवून त्यांना आपण न्याय करण्यास भाग पाडूं, असें गांधी यांस खात्रीपूर्वक वाटत असून या एकाच मार्गाचा अवलंब अत्यंत दृढ निश्चयानें त्यांनीं चालविला आहे.

आपल्या अनुयायांच्या ठिकाणींहि असाच प्रकारची एकांतिक सत्यनिष्ठा असावी असें गांधी यास वाटतें. त्यांच्याशीं ज्यांचा मतभेद होतो, अशा आपल्या प्रतिपक्षासंबंधानेंहि गांधी उदार बुद्धि बाळगतात. अशा प्रतिपक्षाशीं वागतांना सभ्यतेचा अतिक्रम ते करीत नाहींत आणि प्रसंगी त्यांच्याशी कोणी वितंडवाद घातला तरी आपली शालीनता न सोडतां, प्रतिपक्षाचें म्हणणें शांतपणें ते ऐकून घेतात. त्यांचे जे अनुयायी बनतात, त्यांजवर त्यांच्या वागणुकीची छाप इतकी पडते कीं त्यांच्या इच्छेविरुद्ध एकहि गोष्ट करण्याचें धैर्य त्यांच्या कोणाहि अनुयायांस होत नाहीं. एखाद्या सुलतानाची सत्ता स्वतःच्या नोकरावर जशा प्रकारची असते, तसाच हाहि प्रकार बाह्यतः दिसतो; पण यांत फरक इतकाच की सुलतानी सत्तेचें मूळ भेंत भावांत असून गांधी यांची सत्ता भक्तिभावमूलक असते. त्यांचें वर्तन अ.दर्शवत असल्यामुळें त्यांच्या विरुद्ध जावें अशी इच्छाच त्यांच्या कोणा अनुयायांस होत नाहीं. मद्यपानावांचून स्वतःला समाजसेवेची पात्रता अंगीं येत नाहीं, असें गांधी यांचें मत असल्यामुळें या बाबतींत आपल्या अनुयायांनींहि अत्यंत मितपणानें चालावें, अशी त्यांची इच्छा आहे. हें मतहि ते स्वतः फार कडकपणें पाळतात. कसल्याहि प्रकारच्या मांसाशाव ते स्पर्श करीत नाहींत.

तथापि माझी स्वतःची प्रकृति एकवार बिघडली असतां तसलें अन्न घेण्याची सल्ला मला त्यांनीं दिली होती.

आपल्या प्रतिपक्षासंबंधीं गांधी इतकी उदार बुद्धि बाळगतात कीं प्रतिपक्षाच्या हातून गुप्तपणें घडलेलीं कांहीं कृत्यें त्यांना ठाऊक असलीं, तरी प्रतिपक्षावर मात करण्याच्या मोहास बळी न पडतां, अशा कृत्यांचा फायदा ते कधींच घेत नाहींत. अशा प्रकारची संधी चालून आली असतांहि प्रतिपक्षाविरुद्ध तिचा उपयोग ते करून घ्यावयाचे नाहींत. गांधींच्या या विशिष्ट गुणाचा अनुभव पुष्कळांस आला असेल; तथापि पुढील एक ठळक उदाहरण विशेष सांगण्यासारखें आहे. इ. स. १९१४ सालीं दक्षिण आफ्रिकेंतील एका तुरुंगांतून त्यांची नुकतीच मुक्तता झाली होती. इतक्यांत तेथील खाणींतल्या गोऱ्या मजुरांनीं संप पुकारला. हा संप होण्यापूर्वी एकच आठवडा आपल्या शांततेच्या प्रतिकारास आपण पुन्हां सुरुवात करणार, असें गांधी यांनीं जाहीर केलें होतें. त्याच प्रमाणें खाणींत व शेतांत काम करणाऱ्या हिंदी मजुरांचाहि संप पुकारण्याचा त्यांचा बेत होता. अशा प्रसंगीं गोऱ्या मजुरांचा संप ही एक मोठीच संधी त्यांजकडे चालून आली होती. कारण या संपामुळें आफ्रिकन सरकार एकाएकीं मोठ्या पेंचांत पडलें होतें; पण सरकारच्या या अडचणीचा फायदा न घेतां या अडचणींतून सरकार मोकळें होईपर्यंत आपली मोहीम व संप गांधी यांनीं तहकूब केली. त्यांची मर्जी असती, तर सरकारच्या या अडचणींत त्याजवर जोराचा प्रहार गांधी यांस करतां आला असता आणि ज्या न्याय्य हक्कासाठीं गांधी यांनीं हें दीर्घकालीन युद्ध चालविलें होतें, ते हक्कहि पदरीं पडण्याचा संभव या वेळीं पुष्कळ होता; पण प्रतिपक्षासंबंधीं अशी अनुदार बुद्धि गांधी यांच्या चित्तांत नव्हती. क्षात्रधर्म त्यांना ठाऊक होता आणि त्याचें उल्लंघन न करण्याइतका निश्चयहि त्यांच्या ठिकाणीं होता. त्यांचा प्रतिपक्षी सेनापति स्मट्स यालासुद्धां या गोष्टीचें मोठें कौतुक वाटलें आणि पुढें हिंदी वसाहत वाल्यांचा प्रश्न चर्चेस करतां निघाला, तेव्हां सेनापतिसाहेबांची बुद्धि बरीच समतोल झाली असल्याचें प्रत्ययास आलें. युद्धातला एक डाव म्हणून गांधी यांनीं या मार्गाचा अवलंब केला, असें नाहीं; तर आपल्या शस्त्रास्त्रावर कोणत्याहि प्रकारचें लांछन असूं नये, या शुद्ध इच्छेनेंच त्यांनीं हा मार्ग स्वीकारला. युद्धांत यशापयश येणें हें अवितव्यतेवर अवलंबून आहे; पण कसल्याहि प्रसंगीं क्षात्रवृत्ति न विसरणें हें आपल्या हातचें आहे. यासाठींच क्षात्रधर्म पाळणें हें आपलें आदि कर्तव्य

आहे, असें गांधी म्हणतात. गांधी यांनी हाव म्हणून हा मार्ग अंगिकारला नसला तरी या प्रसंगीं त्या दृष्टीनेंहि तो त्यांच्या चांगला उपयोगी पडला. हिंदी वसाहतवाल्यांच्या बहुतेक मागण्या इ. स. १९१४ सालीं आफ्रिकन सरकारानें कबूल केल्या आणि तशा आशयाचा कायदा आफ्रिकन पार्लमेंटांत पासहि झाला. येथवर दक्षिण आफ्रिकेंतील गांधी यांच्या सार्वजनिक कार्याचा आज उल्लेख मीं केला; पण गांधी यांच्या खाजगी चारित्र्याचेंहि अवलोकन करणें इष्ट आहे. परसेवेच्या तत्वावर गांधी यांनीं दरबान शहरानजीक एक लहानशी हिंदी वसाहत स्थापिली होती. या वसाहतींत रहात असतां गांधी यांची भेट ज्या कोणी घेतली असेल, त्याला त्यांच्या खऱ्या निस्वार्थी स्वभावाचा अनुभव खचित आला असेल. गेल्या शतकाच्या अवसानसमयाच्या सुमाराला या विषयासंबंधीं टॉलस्टॉय यांनीं जीं मतें सांगितली होतीं, त्याजवरच या वसाहतीची उभारणी गांधी यांनीं केली होती. टॉलस्टॉय यांच्या मतांबद्दल आणि खुद्द त्या पुण्य पुरुषाबद्दलहि गांधी यांच्या मनांत अत्यंत आदर वसत होता. शांततायुक्त, प्रतिकाराची किंमत गांधी यांस आज इतकी वाटते, त्याचें मूळ कारण बहुधा टॉलस्टॉय यांच्या मतांतच असावें, असें मला वाटतें. अहिंसा हें हिंदु धर्माच्या आदितत्वांपैकीं एक तत्व आहे, आणि गांधी त्याचा उपदेश करतात आणि स्वतः त्याप्रमाणें वागतात हेंहि खरें; पण प्रस्तुत बाबींत या धर्मतत्वापेक्षां टॉलस्टॉय यांच्या लेखांचीच छाप गांधी यांजवर अधिक पडली असावी, असा माझा समज आहे.

या वसाहतींत रहात असतां तेथले सामान्य लोक जे नानाप्रकारचे उद्योग करीत, त्यांत त्यांना गांधी जातीनें मदत करीत असत. या वसाहतींत मी त्यांची भेट घेतली, तेव्हां या बाबींत त्यांच्याशीं माझा पुष्कळसा वादहि झाला. आपला बहुमोलाचा काळ अशा प्रकारच्या क्षुल्लक गोष्टींत न घालविला तर याहून अधिक मोठ्या गोष्टी करण्यास आणि स्वतःवरील जबाबदारी अधिक चांगल्या रीतीनें पार पाडण्यास अधिक अवसर तुम्हांस सांपडेल, असें मीं त्यांना म्हटलें. असल्या क्षुल्लक गोष्टी पार पाडण्यास पुरेसें ज्ञान इतर वसाहतवाल्यांस आहे, असेंहि मी त्यांना सांगितलें; पण माझें म्हणणें त्यांच्या गळीं उतरेना. नामदार गोखले या वसाहतींत पाहुणे म्हणून राहिले असतां त्यांनाहि हाच अनुभव आला. आपल्या पाहुण्याची बरदास्त ठेवण्यासाठीं हवीं तीं हलकीं कामें गांधी करतात आणि प्रसंगीं झाडूवालासुद्धां बनून आपल्या पाहुण्याला लाजेनें ते अर्धमेला करतात, असे कांहींसे थट्टेचे उद्गार स्वतः नामदारसाहेबांनीच एका प्रसंगीं काढले होते.

असलीं हलकट कामें तुम्ही कां करतां? असा प्रश्न गांधी यांना कोणी केला, तर ते उत्तर देतात, 'केवळ कार्यांत हलकेपणा अथवा भारीपणा नाहीं. मला स्वतःला जर एकादें कार्य हलकटपणाचें वाटत असलें, तर एकाद्या भंग्याला तरी तें भारी किंमतीचें कां वाटावें? माझी माणुसकी आणि त्याची माणुसकी यांत मूलतः कांहीं भेद आहे का? मग त्याचें कार्य आणि माझें कार्य यांत तरी भेद कां असावा?'

जो स्वार्थत्याग करण्याचा उपदेश गांधी आपल्या अनुयायांना करतात, तोच ते स्वतः करण्यास नेहमीं तत्पर असतात. त्यांच्या नैतिक बळाचें रहस्य हें आहे आणि यामुळेंच स्वतःच्या अनुयायांवर त्यांना सर्वगामी अधिकार प्राप्त झाला आहे.

कोणतेंहि तत्व एकदां मान्य केलें कीं त्याच्या पूर्ततेसाठीं कसलीहि भयंकर अडचण आली, अथवा प्रसंगीं सामाजिक रूढी झुगारून द्याव्या लागल्या, तरी तसें करण्यास गांधी कधींहि माघार घेत नाहींत. गांधी यांची ही दृढ वृत्ति, त्यांची मनःपूर्वकता, त्यांचा कडक साधेपणा, त्यांचें लोकसेवाव्रत आणि त्यांचा अनन्य स्वार्थत्याग या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे स्वबांधवांवर त्यांचें इतकें वजन कसें पडलें, या प्रश्नाला तावडतोब उत्तर मिळतें. नाना प्रकारच्या युक्त्या प्रयुक्त्यांनीं अथवा नेतृत्वाच्या हुबेहुब सोंगानेंहि असें वजन कोणाहि पुढाऱ्यास प्राप्त करून घेणें कधींच शक्य नाहीं.

जोहान्सबर्ग येथें करीत असलेला आपला वकिलीचा धंदा गांधी यांनीं सोडला, तेव्हां त्यांची सालीना प्राप्ती अर्ध्यालाखाच्या वर होती; पण स्वबांधवांनीं संकट प्रसंगीं त्यांच्या मदतीकरतां तारस्वरानें हाक मारली, तेव्हां एवढ्या उत्पन्नावर पाणी सोडून त्या हाकेसरसे गांधी धांवतच गेले. दारिद्र्यामुळें मनुष्याचीं सारीं बंधनें तुटून तो स्वतंत्र होतो, असें गांधी यांचें मत आहे आणि आपणास लोक-सेवा करावयाची तर दारिद्र्याची दीक्षा घेणें अवश्य आहे, या निश्चयानेंच सर्व संपत्तीवर त्यांनीं पाणी सोडलें. त्यांचें स्वतःचें मत असें आहे; तथापि आपल्या साऱ्या अनुयायांनींहि दळती अंबारी झाली प्यावी, असें ते म्हणत नाहींत. आपलीं कोणतींहि मतें कोणावरहि जुलमानें लादण्याचा यत्न ते मुळींच करीत नाहींत. गांधी यांच्या अनुयायांत आणि भक्तमंडळांत मोठमोठे लक्ष्मीपुत्र पुष्कळ आहेत.

दक्षिण आफ्रिकेंत गोऱ्या ब्रिटिश प्रजाजनाबरोबरीनेंच स्वबांधवांस आणि दुसऱ्या कोणत्याहि देशांतील वसाहतवाल्यांस समान हक्क असावेत या इच्छेनेंच या शांतता युद्धास त्यांनी सुरुवात केली होती. कोणासहि कोठेंहि जाऊन राहण्याचा हक्क स्वयंसिद्ध आहे, असें ते म्हणतात; तथापि अशा रीतीनें या हक्कांच्या प्राप्तीकरतां ज्या सरकाराविरुद्ध ते लढत होते, त्याच सरकाराशीं सहकार्य करण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां त्याच्या मदतीसाठीं गांधी यांचा हात नेहमीं पुढें असे. इ. स. १९०६ सालीं झुलु लोकांबरोबर युद्ध झालें, तेव्हां हिंदी स्वयंसेवक पथकाचे मुख्य अधिकारी या नात्यानें त्यांनीं बजावलेल्या कामगिरीबद्दल त्यांस पदक मिळालें होतें. त्याचप्रमाणें इ. स. १८९९–१९०० सालच्या बोअर युद्धांतहि सरकारानें त्यांना असेंच एक पदक दिलें होतें. त्याचप्रमाणें दक्षिण आफ्रिकेंत त्यांनीं केलेल्या दयेच्या कामगिरीबद्दल हिंदुस्थान सरकारानेंहि केसर-इ-हिंद सुवर्णपदक दिलें होतें. सरकाराला अडचण पडली असतां त्यांत जोखमीचीं कामें अंगावर घेऊन तीं उत्तम रीतीनें पार पाडण्याची शक्ति हिंदी लोकांस आहे, असें प्रत्यक्ष सिद्ध केलें असतां, आपल्या हिंदी बांधवांबद्दल गोरकायांच्या मनांत थोडा तरी आदरभाव उत्पन्न होईल, असा गांधी यांस भरंवसा वाटत होता; पण पुढें साराच मनु बदलला. युरोपीय महायुद्धाच्या समाप्तीनंतर तुर्काबरोबर होऊं घातलेला तह आणि अमृतसर येथें शेंकडों निरपराध लोकांची ज्यांनीं कत्तल केली, त्यांनीं पुढेंहि दाखविलेली अत्यंत अनुदारबुद्धि; या गोष्टींचा विपरीत परिणाम गांधी यांच्या चित्तावर इतका झाला कीं, हीं दोन्हीं सुवर्णपदकें ब्रिटिश सरकारास त्यांनीं तावडतोब परत केलीं. ब्रिटिश लोक हाडाचे न्यायी आहेत आणि यामुळें आपणास अखेरीस तरी न्याय मिळेल, असा भरंवसा, गांधी यांस परवां परवांपर्यंत वाटत होता; पण हा आपला भरंवसा अगदीं अनाठायीं आहे, असा त्यांच्या बुद्धीचा निश्चय आतां झाला आहे.

संतपणाचें पांघरूण घेऊन आपलें कार्य साधणारा गांधी हा एक इतरांप्रमाणेंच सामान्य राजकारणी मनुष्य आहे, असा हिंदुस्थानांतील पुष्कळ इंग्रज गृहस्थांचा समज आहे. संतपण खरें नसून लोकांना भुलविण्याकरतां तें एक सोंग आहे, असें त्यांस वाटतें. हिंदुस्थानांतील अनेक जाती आणि पंथ एकत्र करून स्वराज्य मिळविण्याची आकांक्षा सर्वांच्या मनांत एक सारखी उत्पन्न करण्याची जी गोष्ट हिंदुस्थानांतील कोणाहि राजकारणी पुरुषास साध्य करतां आली नाहीं, ती गांधी यांनीं आज प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविली आहे. अलीकडच्या काळांत

नामदार गोखले हे हिंदुस्थानांत एक मोठे नामांकित राजकारणी पुरुष होऊन गेले. गोखले याजसंबंधीं गांधी यांच्या ठिकाणींहि मोठी पूज्यबुद्धि आहे. गोखले हे नमुनेदार राजकारणी पुरुष होते, असें खुद्द गांधी म्हणतात; पण एवंगुण विशिष्ट गोखल्यांना सुद्धां हें एकीकरणाचें कार्य करतां आलें नाहीं. याचें कारण हेंच कीं गोखले यांची दृष्टि केवळ तात्पुरत्या फलाकडेच खिळून रहात असे आपल्या कृतीचे अगदीं दूरवरचे परिणाम काय होतील, हें पाहण्याकडे त्यांचें लक्ष नसे. यामुळेंच त्यांची राजनीति तात्कालिक फलदायक झाल्यासारखी दिसली, तरी तिचे कोणतेहि परिणाम चिरस्थायी स्वरूपाचे झाले नाहींत आणि त्यांच्या मागें त्यांचें अवघें कार्य केवळ स्मृतिशेष होऊन राहिलें. गांधी यांचा मार्ग याच्या अगदीं उलट आहे. त्यांचें लक्ष तात्कालिक फलाकडे नसतें. यामुळें अंतिम फलावरून त्यांची दृष्टि कधींहि ढळत नाहीं आणि आज प्राप्त होणाऱ्या फलाच्या मोहानें अंतिम सिद्धीच्या अखेरीस आड येणारी कोणतीहि गोष्ट ते करावयाचे नाहींत.

'इंग्लंडचा विस्तार' या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथांत सर जॉन सीली यांनीं हिंदुस्थानासंबंधानें पुढील उद्गार काढले आहेत. 'आपलें राष्ट्र स्वतंत्र करण्याकरतां सर्व धार्मिक आणि सामाजिक भेद विसरून इटलींतील प्रजा जशी एक झाली, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतहि कधीं काळीं अशाप्रकारची एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली, तर इटलीशीं आष्ट्रियानें जितपत टक्कर दिली, तितपतहि इंग्रजांना हिंदुस्थानास देतां येणार नाहीं. आष्ट्रियानें जेवढा काळ तग काढला, तेवढाहि इंग्रजांस न निघतां त्यांना तत्काळच आपली धुरा खालीं ठेवावी लागेल.'

सर जॉन सीली यांचें हें भविष्य आज खरें होण्याच्या मार्गास लागल्यासारखें दिसतें. हिंदुस्थानांतील नानाविध धर्मांचें, पंथांचें आणि जातींचें एकीकरण करून त्यांच्या मनांत एकराष्ट्रीयत्वाची भावना गांधी यांनीं आज उत्पन्न केली आहे.

एकदम प्रचंड क्रांति न होतां उत्क्रांतीच्या मार्गानें हळू हळू पुढें पाऊल टाकून हिंदुस्थानानें अखेरीस स्वराज्य प्राप्त करून घ्यावें, असें गांधी यांचें पुष्कळ वर्षेंपर्यंत म्हणणें होतें; आणि याच दृष्टीनें बनेतोंपर्यंत ब्रिटिश नोकरशाहीशीं त्यांनीं सहकार्य केलें; पण कालांतरानें या मतांत बदल होत जाऊन आज अधिक प्रखर धाराचा अंगिकार त्यांनीं केला आहे. परकीय सत्तेच्या अमलाखालीं असणें, ही गोष्ट अत्यंत लाजीरवाणी आहे, ही भावना हिंदुस्थानांतील सामान्य जनतेच्या मनांत त्यांनीं उत्पन्न केली आहे. सर जॉन सीली म्हणतो,

"हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची भावना अगदीं मंद स्वरूपाची उत्पन्न झालेली असली आणि परकी सत्ता झुगारून देण्याइतकी तीव्रता तिच्या ठिकाणीं नसली तथापि परकी अम्मल लज्जास्पद आहे, असें हिंदी लोकांस ज्या क्षणीं वाटूं लागेल, त्याच क्षणीं आमचें साम्राज्य संपुष्टांत येईल. परकीय सत्ता कायम राखण्याच्या कामांत परकीयांना आपणच मदत करणें नामर्दपणाचें आहे, असें हिंदी लोकांस ज्या क्षणीं वाटेल, तो क्षण हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याचा अखेरचा होय."

लंडन येथील फार्ट नाइटली नांवाच्या मासिकांतील एका लेखांत सर मायकेल ओडवायर म्हणतात, "बंडाच्या काळानंतर हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्ता सध्यां इतकी केव्हांहि दुर्बळ झाली नव्हती आणि आजच्या प्रमाणें तिचा आब पूर्वी केव्हांहि इतका कमी झाला नव्हता. हिंदुस्थानांतील आमचा सुरक्षितपणा आधींच वेताबाताचा आणि सध्यांच्या अत्यंत काळजीच्या आणि संकटाच्या दिवसांत तर तेवढाहि सुरक्षितपणा जवळ जवळ नाहींसा होण्याच्या मार्गास लागला आहे. ही काळजीची आणि संकटाची लाट साऱ्याच जगावर आज पसरली आहे."

परकीय सत्तेचें अधिष्ठान स्वतःच्या खांद्यावर नेऊन धरणें हें नामुष्कीचें आहे. ही भावना गांधी यांनी आज हिंदुस्थानांत सर्वत्र उत्पन्न केली आहे; पण या भावनेचा परिपोष करण्याजोगी परिस्थिति बाहेरून उत्पन्न झाली नसती, तर ही गोष्ट गांधी यांस केव्हांहि साध्य झाली नसती. परकीय अम्मल पुढें चालूं देणें असह्य आहे, या कल्पनेची पहिली प्रेरणा बाह्य परिस्थितीनें हिंदी लोकांच्या मनांत प्रथम उत्पन्न करून दिली. आपल्या देशांतील राज्यकारभारांत आपल्या हातीं बरीच सत्ता असावी, ही आकांक्षा हिंदी लोकांच्या मनांत आज वीस वर्षे वाढत गेली आहे आणि ती सिद्ध करण्याकरतां अनेक प्रकारचे मार्ग हिंदी लोकांनीं चोखाळून पाहिले आहेत. वर्षानुवर्षे राष्ट्रीय सभेच्या बैठकी होऊन तेथें पुष्कळसा शब्दच्छळ झाला. बंगाल प्रांतानें स्वदेशीची कास धरून पाहिली. सारे बंगाली लोक एकमुखानें नको नको म्हणत असतां लॉर्ड कर्झन यांनीं बंगालची फाळणी करण्याचा यत्न केल्यानंतर त्यांच्या या कियेला प्रतिक्रिया म्हणून स्वदेशीची लाट उद्भवली आणि साऱ्या बंगाल प्रांतानें अत्यंत उत्साहानें ही लाट अगदीं कळसापर्यंत चढवण्याचा यत्न केला. त्याच प्रमाणें पंजाबांत आर्य समाज आणि बंगाल्यांत रामकृष्ण सेवासमिति या धर्मसंस्था उत्पन्न होऊन आर्य समा-

जाच्या प्रचारकांनीं आणि स्वामी विवेकानंदांच्या शिष्यवर्गानीं लोकांना स्वतःच्या हक्कांची जाणीव उत्पन्न करून दिली; तथापि गांधी यांनीं जो कार्यभाग आज केला आहे, तेथपर्यंतची मजल पूर्वी कोणासहि गांठतां आली नाहीं. गांधी यांच्या असहकारितेचा उपदेश यापूर्वी कोणीहि केला नव्हता. अनंत प्रकारच्या बारीकसारीक मार्गांनीं नोकरशाहीशीं सहकार्य करून हिंदी जनतेनें तिचें आयुष्य लांबविलें आहे, ही गोष्ट गांधी यांनींच लोकांच्या लक्षांत प्रथम आणून दिली. लोकांचें सहाय्य आणि सहकार्य नसेल, तर कोणतीहि राजशासन संस्था टिकून राहणें शक्य नाहीं, हा मुद्दा प्रथम गांधी यांनींच लोकांच्या ध्यानीं ठसविला.

सीली यांची ती भविष्यवाणी आज खरी होऊं पहात आहे आणि याचें कारण केवळ गांधी हेच होत. इंडिया पत्रांत नुकत्याच आलेल्या एका लेखांत तो लेखक म्हणतो,

" हिंदुस्थानाला जडलेल्या रोगाच्या मुळावरच महात्मागांधी हे कुऱ्हाड घालीत आहेत. केवळ बाह्योपचार करून तात्पुरता थंडावा आणणाऱ्या भिषग्वर्यांचा उपचार गांधी करीत नसून शस्त्रवैद्याच्या तीक्ष्ण शस्त्राचा अवलंब त्यांनीं केला आहे. आणि हें शस्त्र जों जों खोल जात आहे, तों तों रोगाचें निर्मूलन होत असून रोगी सुधारणेच्या पंथाला लागला असल्याचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं आहेत. स्वाभिमान, पौरुष आणि स्वावलंबन या गुणांचा प्रत्यय हिंदुस्थानास आतां अधिक प्रमाणानें येऊं लागला आहे.''

पूर्वी कोणासहि साध्य न झालेलें कार्य गांधी यांनीं प्रत्यक्ष आज सिद्ध करून दाखविलें आहे. पूर्वी कधीहि न घडून आलेली एकी आज त्यांनीं प्रत्यक्ष घडवून आणली आहे. याला गांधी यांची अव्यभिचारी तपोनिष्ठा आणि अत्यंत कडक तपाचरण हीं कारणें तर आहेतच; पण यांतच ब्रिटिशनोकरशाहीनें लोकांच्या मनांत उद्भवलेल्या ज्वाळांत अधिक तेल ओतून त्या भडकविल्या आहेत, हेंहि दुसरें कारण आहे. आज जगांतील साऱ्या साम्राज्यांत बलिष्ठ असें साम्राज्य एकीकडे आणि त्याच्या उलट गांधी हे एकाकी गृहस्थ एकीकडे असा विलक्षण देखावा दुनियेला दिसत आहे. गांधी यांना स्वतःसाठीं म्हणून कांहींहि साध्य करावयाचें उरलेलें नाहीं. आपला जीवनक्रम कसा चालला आहे, हें पाहण्यापुरताहि स्वार्थ त्यांजपाशीं नाहीं. जीं तत्वें एकदां आपलीशीं म्हटलीं, त्याजबद्दल अत्यंत कडक निष्ठा ते बाळगतात. त्यांत कसलीहि सवलत अथवा कसलीहि भेसळ ते कबूल करीत नाहींत आणि त्यांचा प्रसार अगदीं निर्भय-

चित्तानें ते करतात. ज्या नोकरशाहीनें लोकांच्या आधारावरील, आदरावरील आणि श्रद्धेवरील आपला सारा हक्क गमाविला आहे, असें त्यांना वाटतें, त्या नोकरशाहीकडून कसलीहि कृपा संपादन करणें अथवा तिजपाशीं कसलीहि याचना करणें हे मार्ग त्यांना आतां अत्यंत तिरस्करणीय वाटतात. प्रेमानें आपण द्वेष जिंकूं, दंडुक्यावर न्यायाचा पगडा बसवूं आणि अखेरीस यशस्वी होऊं, असा त्यांचा पूर्ण भरंवसा आहे आणि याच दिशेनें आपलें कार्य करून त्याजकडे हिंदी जनतेचीं मनें वळविण्याचा यत्न ते करीत आहेत.

—डब्ल्यू. डब्ल्यू. पियरसन.
( एशियन रिव्ह्यु )

३

कालचा दिवस गांधी यांजबरोबर अगदी मनमोकळेपणें संभाषण करण्यांत माझा गेला आणि या अवधींत ज्या चळवळीला त्यांनीं आपगास सर्वतोपरी वाहून घेतलें आहे, तिच्यासंबंधीं त्यांचें स्वतःचें काय म्हणणें आहे, हें मीं समजावून घेतलें. आतां या चळवळीचें पूर्णस्वरूप माझ्या लक्षांत आलें आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ही चळवळ वस्तुतः केवढ्या मोठ्या विस्तृत स्वरूपाची आहे, हें सांगितलें, तर तें कोणास खरेंसुद्धां वाटावयाचें नाहीं. किंबहुना तिचें हें जगव्यापी स्वरूप आरंभीं माझ्याहि लक्षांत आलें नव्हतें. गांधी यांच्या मनोभूमिकेची ओळख झाल्यावांचून त्यांच्या या धर्मयुद्धाचें स्वरूप कोणाच्याहि लक्षांत यावयाचें नाहीं, असे उद्गार पूर्वी एका सहाव्या मनुष्यानें मजपाशीं काढले होते. यामुळेंच गांधी यांच्या-मनोभूमिकेची ओळख नसेल, त्यांना या लेखांतील गोष्टी बहुधा अशक्य कोटींतील वाटतील अशी मला भीति आहे. गांधी यांचें अंतःस्वरूप किती चकित करून सोडणारें, किती भयावह आणि किती विस्तृत आहे, हें त्यांच्याशीं प्रत्यक्ष ओळख पटल्यावांचून समजण्यासारखें नाहीं. आपल्या एकांत जागीं बसून विश्व-रूप पुरुषाप्रमाणें हिंदी राजकीय रणांगणाच्या साऱ्या भागावर ते प्रकाश पाडीत असतात. वस्तुतः गांधी हे अगदीं एकाकी आहेत. त्यांच्या भाजूबाजूला मित्र मंडळींचा अथवा दरबारांचा गराडा नसतो. किंबहुना असे पायर्यांचे पसारे मला-मसलतदार आपणाभोंवतीं नसावेत, असेंच त्यांची इच्छा असल्यासारखी दिसते. कारण गांधी यांच्या कल्पना साम्राज्याच्या स्वरूपानें भेसाटी मागें जशी गोंध-

कून जातात, त्याचप्रमाणें शुद्ध संसारी माणसांच्या व्यावहारिक सूचनांनीं गांधी यांच्या चित्ताचाहि घोंटाळा उडण्याचा संभव आहे. यामुळें अशा प्रकारचा लोक-समूह असला अथवा नसला, तरी सारखाच. त्यांच्या असण्यानें अथवा नसण्यानें गांधी यांच्या मार्गांत कांहीं चढउतार होण्याचा संभव नाहीं. आपलीं मतें केवळ बुद्धिमतांपुढें मांडावींत अशी गांधी यांची इच्छा नाहीं. तीं जनतेच्या तळापर्यंत पोहोंचावींत हाच त्यांचा उद्देश आहे आणि त्यांच्या या साऱ्या चळवळीचा पाया विश्वव्यापी प्रेम आणि त्याच्या आधारें झालेली समाजरचना हाच अस-ल्यामुळें त्यांना एवढें अतुल सामर्थ्य प्राप्त झालें आहे. पुराणांतरीं सुवर्ण युगाच्या ज्या कल्पना आपण ऐकतों, त्याच आतां खऱ्या करून दाखवा, इत-काच गांधी यांचा उपदेश आहे. हें सुवर्ण युग पृथ्वीवर अवतरूं नये, असें कोण म्हणेल ? आणि असा प्रयत्न करणाऱ्या मनुष्याच्या मार्गांत आड तरी कोण येईल ? कोणाशीं बुद्धिवाद करून आपलीं मतें गांधी त्याला पटवीत नाहींत. बुद्धीचें समाधान व्हावें असा यत्नच ते करीत नाहींत, तर आपलें म्हणणें श्रो-त्याच्या अंतःकरणाला ते नेऊन भिडवितात. सध्यांचें युग बुद्धिमार्गाचें आहे. तुम्ही कोठेंहि गेलां, तरी चोहोंकडे, बुद्धिवादाची गर्जना तुम्हास ऐकूं येईल. अंतःकरण म्हणून कांहीं चीज आहे, ही आठवणच जणूं काय सध्यां कोणास रा-हिली नाहीं. यामुळेंच राजकारणाच्या बाबतींतहि गांधीच्या जोडीनें बसवितां येईल, असा दुसरा कोणीहि मनुष्य आपणास आढळत नाहीं. जवळ जवळ अव-तारी पुरुषाइतकी त्यांची छाप साऱ्या सामान्य जनतेवर बसली आहे. या बाबींत त्यांची बरोबरी करणारा जगांत आज कोण आहे ? आज गांधी हे जणूं काय अर्धेमुर्धे ईश्वरच बनले आहेत. जगांत अनेक राजकारणी पुरुष आज वाव-रत आहेत. मानवजातीच्या इतिहासास वेगळें वळण लावावें या हेतूनें आपा-पल्या परी ते खटपटहि करीत आहेत; पण गांधी यांची चळवळ यशस्वी झाली, तर अखिल मानवजातीच्या इतिहासांत जी प्रचंड क्रांति होईल, तिचें विराट स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे जगांतले हे सारे राजकारणी पुरुष वामन-मूर्तीसारखे दिसूं लागतात.

महात्माजींची भेट मीं घेतली, तेव्हां जाडेंभरडें हातानें विणलेलें खादीचें वस्त्र अंगाला सरासरी लपेटून त्यांची स्वारी एका लहानशा खोलींत जमिनीवरच बसली होती. या खोलीचा शृंगार म्हणाल तर तो अवर्णनीय होता. कारण वर्णन करण्यासारखी कांहीं वस्तूच तेथें नव्हती. महात्माजींनीं हास्य मुद्रेनें माझें स्वागत

केलें. त्यांचें मस्तक रमणियाकृति असून त्यांच्या उच्च कल्पनाविवशतेची साक्ष पटवीत होतें. त्याचप्रमाणें त्यांचा चेहराहि गंभीर असून हनुवटीच्या भागाकडे निमुळता होत गेला होता. त्यांचे डोळे खोल आणि सकरुण आहेत. त्यांचें चित्तस्थैर्य त्यांच्या डोळ्यांवरूनच लक्षांत येण्यासारखें आहे. त्यांच्या कपाळाच्या भागाकडील केस आतां दद्रुदक्रू करडे होत चालले आहेत. त्यांची संभाषणपद्धति अगदीं नाजुक, तथापि स्पष्ट आहे. ते भाषण करतात, तेव्हां मनानें ते कोठें दुसरीकडेच असावेत, अशी भावना मंदपणें तरी श्रोत्याच्या मनावर उमटल्यावांचून रहात नाहीं. यामुळेंच त्यांच्या संभाषणाला एकप्रकारची अलौकिकता प्राप्त होते. सामान्य जगांतल्या सामान्य मनुष्यांशीं आपण बोलत आहों, असे श्रोत्याला वाटत नसल्यामुळें आपणापुढें बसलेली मूर्ति चालू व्यवहारप्रदेशाच्या बाहेरून कोठून तरी आली असावी, असें वाटूं लागतें. ज्या मतांच्या प्रसारांत सारें आयुष्य वेंचण्याचा गांधी यांचा निश्चय आहे, त्यांना विशेष सामर्थ्य प्राप्त होण्याचें कारणहि अलौकिकपणाची अथवा असामान्यतेची भावना हेंच होय. महात्माजी स्थितप्रज्ञ झालेले आहेत. त्यांना पाहून या गृहस्थाची चलबिचल कधीं काळीं तरी होत असेल, अशी कल्पनासुद्धां मनांत यावयाची नाहीं. यांच्या हातून अविचाराचें काम होईल, अथवा द्वेषानें भरून कांहीं क्रिया ते करतील, अशी कल्पनासुद्धां कोणाच्या चित्ताला स्पर्श करावयाची नाहीं. यामुळेंच आज त्यांची इतकी विलक्षण छाप सर्वांवर बसली आहे. त्यांच्या एका गालावर कोणी चापट मारली, तर आपला दुसरा गाल ते खचित त्याजपुढें करतील, अशी प्रत्येकाची वालंबाल खात्री आहे. येशुख्रिस्तानें केलेला उपदेश जर कोणाच्या चित्तावर खरोखर बिंबला असेल, तर तो या गृहस्थाच्या चित्तावरच होय. आणि तोच प्राचीन उपदेश महात्माजी आज पुन्हां करीत आहेत. त्यांची अंतःसृष्टि ज्याप्रमाणें येशुख्रिस्ताची प्रतिमा बनली आहे, त्याचप्रमाणें त्यांचें प्रत्यक्ष कार्यहि येशुख्रिस्ताच्याच कार्याबरहुकूम चाललें आहे. आमचें संभाषण सुरू असतां ख्रिस्ताची गोष्ट निघाली, तेव्हां बोलतांना जे कांहीं शब्द त्यांनीं सहजासहजीं उच्चारले, त्यावरून ख्रिस्ताच्या आदेशाचा अर्थ ते काय करतात याचा थोडा बहुत उलगडा होण्यासारखा आहे. राजकारणांत केव्हांहि ख्रिस्तानें लक्ष घातलें नाहीं, असें मी त्यांना म्हटलें. तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें, "मला तसें वाटत नाहीं; पण तुमचें म्हणणें खरें असेल, तर तेवढ्याच बाबींत त्याच्यात ख्रिस्तपणाची (जगदोद्धाराची) उणीव होती."

स्वार्थत्याग आणि प्रेम याच मूलभूत पायावर जगाची उभारणी करण्याचें ध्येय खिस्तानुयायी राष्ट्रांना आजपर्यंत साध्य झालेलें नाहीं; पण हें ध्येय इतकें माधें आणि सुसाध्य आहे कीं, त्याजबद्दल वादविवाद अथवा चर्चादेखील करण्याचें कारण नाहीं; असें गांधी यांना वाटतें. गांधी यांची चळवळ यशस्वी झाली, तर हिंदुस्थानांत तो एक मोठा उत्पात होईल. गांधी यांचें कल्पनासाम्राज्य अशा स्वरूपाचें आहे कीं, पौर्वात्यांच्या मनाला, तें तावडतोब पटतें. पौर्वात्य जनता सामान्यतःच अधिक कल्पनाविवश आहे. आणि ब्रिटिश साम्राज्याला मोठी धोक्याची गोष्ट ती हीच. आपली तरवार म्यानांत सदोदित खुळखुळत ठेवण्याइतकी चिकाटी इंग्लंडच्या अंगांत उरली नाहीं, तर अंतर्गत रक्तपातास आणि विघटनेस सुरवात होईल. अशा स्थितीचा अखेर परिणाम म्हटला म्हणजे इंग्लंडाशिवाय दुसऱ्या एखाद्या अधिक रुधिरप्रिय राष्ट्राचें साम्राज्य हिंदुस्थानांत होणें हें होय. याच दृष्टीनें गांधी हे स्वबांधवांचे मोठे भयंकर शत्रु आहेत, असें मला वाटतें.

आपल्या अत्यंत विनयशील संभाषणपद्धतीनें आणि सुसंस्कृतपणें गांधी मजपाशीं बोलत होते. ते कितीहि विनयशील असले, तरी दुसऱ्या कोणासाठी आपलीं मतें अंशतः सुद्धां सोडावयाचे नाहींत. या कामीं त्यांची चिकाटी विलक्षण आहे. संभाषणाच्या भरांत त्यांच्या मतांचें आविष्करण जों जों अधिक होऊं लागलें, तों तों सरकार आणि गांधी यांजमध्यें समेट होण्याची माझी आशा कमी कमी होत चालली. इंग्लंडची संस्कृति आणि इंग्लंडचें आधिराज्य या दोहोंनींहि हद्दपार झालेंच पाहिजे, असा गांधी यांचा कृतनिश्चय झाला असल्याचें माझ्या लक्षांत आलें. या दोन्ही वस्तु त्यांच्या दृष्टीनें अगदीं तिरस्करणीय ठरल्या आहेत. आज हिंदुस्थान असंरक्षित स्थितींत आहे आणि अशा स्थितींत त्याजवरून इंग्लंडचें छत्र नाहींसें झालें, तर काय होईल? अशी पृच्छा मीं केली, तेव्हां ते म्हणाले,

"नोकरशाहीला नामशेष करण्याइतकें ऐक्य हिंदी लोकांत झालें, तर त्याचा एकीच्या बळावर परचक्रापासून आपलें संरक्षण ते करूं शकतील. कोणावरोबरहि तरवारीचे दोन हात करण्याची आमची इच्छा नाहीं. दुसऱ्याला जिंकावें अशी कल्पनाहि आमच्या मनांत येत नाहीं. सर्वांबरोबर प्रेमभावानें रहावें, अशीच आमची मनःपूर्वक इच्छा आहे. या अत्यंत शुद्ध, पवित्र आणि सात्त्विक इच्छेपासून उद्भवलेलें चैतन्यबळ आमचें संरक्षण करील. हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर

दुसऱ्या कोणाचें पाऊलहि पडावयाचें नाहीं. स्वसंरक्षणासाठीं दारूगोळ्यांचीं कोठारें भरणें युक्त नव्हे. शस्त्रास्त्रांनीं सिद्ध होणें म्हणजे युद्धाला बोलून चालून पाचारण करणें होय."

"पण हिंदु आणि मुसलमान यांत स्वभावतःच जें वैर आहे, त्याची वाट काय ?"

"त्याबद्दल मला मुळींच काळजी वाटत नाहीं. त्यापासून शांतीला धोका येण्याचा संभव नाहीं."

या वेळीं गांधी यांच्याच एका मुसलमान अनुयायाची आठवण मला झाली. हा पंजाबचा रहिवासी होता आणि तेथें त्याची गणना पुढाऱ्यांत होत होती. या गृहस्थाशीं माझा संभाषणाचा योग आला, तेव्हां हिंदूंना जिंकून हा देश महंमदी साम्राज्याच्या शिरोभागीं स्थापण्याची आपली कशी इच्छा आहे, हें या गृहस्थानें मजजवळ सांगितलें होतें. हें वर्णन करीत असतां उत्साहानें खुलून गेलेल्या चेहऱ्याची आठवण मला झाली आणि तोच प्रश्न गांधी यांस मीं पुन्हां केला. त्यावर त्यांनीं उत्तर दिलें,

"अशी भयंकर आपत्ति हिंदुस्थानावर कोसळली, तर तिचेंहि स्वागत करण्याची माझी तयारी आहे. या झटापटींत हिंदुस्थान देश नामशेष झाला, तर तो खरोखरच अशक्त आणि नामशेष होण्याच्या लायकीचाच होता, असें सिद्ध होईल आणि तसें झाल्यानें जगाचा फायदाच होईल." गांधी यांचें हें उत्तर ऐकून स्वाभाविकपणेंच मला लेनीन यांची आठवण झाली आणि त्याजबद्दल गांधी यांचें मत काय आहे, हें जाणण्याकरतां तसा प्रश्न मीं त्यांना केला. तेव्हां ते म्हणाले, "लेनीनच्या संबंधीं स्पष्ट मत देण्याइतकी त्यांची माहिती मला नाहीं; पण कसेंहि असलें, तरी सांप्रतच्या नोकरशाही अमलापेक्षां लेनीनचा बोलशेविझम मला अधिक आदरणीय वाटतो." गांधी यांचें ध्येय स्वार्थी अथवा ऐहिक स्वरूपाचें नसून तें उच्च दर्जाचें आहे, ही गोष्ट ध्यानांत न घेतां त्याच्या या उत्तराचा विचार केला, तर त्याजविरुद्ध येणारे सगळे आक्षेप यथार्थ आहेत, असा भ्रम उत्पन्न होण्याचा संभव आहे; पण गांधी यांच्या मतांत अतिरेक दिसला, तरी त्याचा उगमहि या शुद्ध ध्येयांत आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. आपल्या ध्येयाला व्यवहाराची लगाम गांधी घालीत नाहींत आणि आतां ती घालणें शक्यहि नाहीं; म्हणूनच त्यांचें ध्येय पुष्कळ वेळां बेफामपणें उधळून आपली चकभूल करतें. याकरतां यांतील मूळमुद्दा नेहमीं लक्षांत ठेवला पाहिजे.

पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृतींच्या उत्क्रांतीची दिशा भिन्न असल्यामुळें त्यांचें एकीकरण होणें शक्य नाहीं, हें गांधी यांचें मत मला पटलें; पण इंग्रजलोक आणि सारी इंग्रजी संस्कृति अगदीं सद्गुणशून्य आणि सर्वथा त्याज्य आहे काय ? असा प्रश्न मीं केला असतां गांधी म्हणाले, " इंग्रजलोकांविरुद्ध अथवा कोणाहि एका व्यक्तीविरुद्ध म्हणून ही चळवळ मीं हातीं घेतलेली नाहीं. हिंदुस्थानचें कल्याण व्हावें, या एकाच हेतूनें पुष्कळ इंग्रजांनीं निःस्वार्थ बुद्धीनें खटपट केली आहे, हेंहि मी प्रांजलपणें कबूल करतों. ब्राडला, जार्डिन, वेडरबर्न, मांटेग्यु इत्यादि नावें आमच्या नजरेसमोर नेहमीं आहेत."

" असें आहे, तर सध्यांच्या सुधारणांना तुम्ही विरोध कां करतां ?"

"आमच्या विरोधाचें कारण हेंच कीं, या सुधारणांचा व्यवहार करण्याचें कार्य ज्यांच्या हातीं सोपविण्यांत आलें, त्यांनीं त्यांचा मूळ हेतु नाहींसा करून टाकला आहे. यामुळें त्यांच्यापासून मिळणारा न्याय आतां मिळणें अशक्य आहे. कौन्सिलांत शिरून आणि तेथें अन्यायास विरोध करूनहि न्यायाची मोहीम चालवितां आली असती, असें तुमचें म्हणणें असेल, तर या मार्गांत कांहीं तथ्य नाहीं. अशी माझी पक्की खात्री झाली आहे. कायदेमंडळांत शिरल्यानंतर त्याच्याबाहेर कांहीं खरें कार्य करणें शक्य आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं."

तथापि या विषयासंबंधीं गांधी यांचें मत खरोखरच ठाम झालें असेल, असें मला दिसलें नाहीं. कौन्सिलांत असहकारवादी प्रतिनेधी शिरल्यानें आपली चळवळ थंडावेल, असें कदाचित त्यांस वाटत असेल, किंवा नेमस्त पक्षाबरोबर आजच हातघाई करणें त्यांना कदाचित युक्त वाटत नसेल. केवळ पाश्चात्य म्हणून एकाद्या गोष्टीचा त्याग गांधी करीत नाहींत. जुनें तें सोनें असेंहि तें म्हणत नाहींत. आपल्या चळवळीला उपयोगी पडतील अशा आगगाड्या आणि टपालकचेऱ्या इतक्या पाश्चात्य साधनांचा उपयोग ते उघडपणें करतात आणि असें करणें योग्य आहे, असेंहि तें म्हणतात. तेव्हां सांप्रतचीं कौन्सीलें केवळ पाश्चात्य चळणाचीं म्हणून त्याज्य अशी त्यांची दृष्टि नाहीं, हें उघड आहे. तेथें शिरून आपल्या पक्षाची पुरी छाप पाडतां येण्याची त्याची खात्री असती, तर तेथें शिरण्यास त्यांनीं कमी केलें नसतें, असा माझा समज आहे. कौन्सिलांवर त्यांनीं बहिष्कार घातला, याचें कारण तीं मूलतः त्याज्य हें नसून स्वरक्षणाच्या दुबळेपणाची जाण व हें असावें, असें मला वाटतें. यावरून असहकारी पक्षांत जितकी सुसंबद्ध संघटना असावी, तितकी तो नाहीं, असाहि माझा समज झाला.

अर्वाचीन सुधारणे संबंधी गांधी यांचा जो पक्का ग्रह आहे, तोच एका अर्थी त्यांच्या चळवळीला पुष्टीकारक असून उलटपक्षीं त्यामुळेंच तिला अंशतः कमीपणाहि येतो. पाश्चात्य सुधारणा हें शुद्ध तमोमय कलीयुग असून त्याविरुद्ध ही चळवळ आहे, अशा स्वरूपानें हिंदी लोकांपुढें ती आली म्हणजे देशांतील खेडवळ बहुजन समाजाच्या अंतःकरणाला ती तावडतोब पटते. सामान्यतः शहरांतील राहणीबद्दल हिंदुस्थानांतील खेडवळ लोकांच्या मनांत बराच वैरभाव उत्पन्न झालेला आहे आणि शहरांतील सांप्रतची राहणी म्हणजे पाश्चात्य संस्कृतीचें जीवंत प्रदर्शनच होय. यामुळें गांधींची चळवळ म्हणजे या राक्षसीपासून आपणास मुक्त करणारें दिव्यशस्त्रच आहे, असें खेडवळांस वाटूं लागलें आहे. यामुळें खेडोपाड्यांतून गांधी यांच्या चळवळीला विलक्षण पाठबळ मिळालें आहे. हिंदुस्थानांतील सांप्रतच्या परिस्थितीचा विचार करणारे लोक खेडवळांची ही मनःस्थिति बहुधा ध्यानांत आणीत नाहींत. अर्वाचीन सुधारणेच्या अनेक अंगांपैकीं आरोग्यपरिचर्या आणि घटना हीं दोनच अंगें गांधी यांच्या पसंतीस उतरलीं आहेत. या दोन बाबींत ब्रिटिश राज्यपद्धति त्यांना पसंत आहे; पण हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याची घटना किती सुसंबद्ध आहे आणि तिच्याच पायावर हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्य मुख्यतः कसें उभें आहे, ही गोष्ट गांधी यांच्या लक्षांत आलेली दिसत नाहीं. पौर्वात्य आणि पाश्चात्य पद्धति यांत जी विषमता आहे, तीवरच गांधी यांच्या मतांची उभारणी झाली आहे; पण शुद्ध त्यागाच्या पायावर समाजाची आणि राज्याची घटना करण्याचा प्रयत्न गांधी यांजपूर्वी भरतभूमीनें केला असून तो अयशस्वी ठरलेला आहे, ही गोष्ट गांधी यांच्या लक्षांत आलेली दिसत नाहीं. स्वर्गातील राज्य पृथ्वीवर आणणें अशक्यप्राय आहे. हा अनुभव हिंदुस्थानाला पूर्वी एकदां येऊन चुकला आहे. गांधी यांचें संभाषण कोणी ऐकूं लागला, तर अडीच हजार वर्षांपूर्वी गौतमबुद्धानें केलेल्या उपदेशाची आठवण त्याला झाल्यावांचून रहात नाहीं; पण गौतमबुद्धाचा हा सुंदर उपदेश कल्पनासृष्टींतच राहिला आणि त्याला अनुरूप अशी सामाजिक स्थिति हिंदुस्थानच्या वांट्याला येऊंच शकली नाहीं. या उपदेशामुळें मानवी मनाच्या प्रवृत्तींत काडीइतकाहि फरक झालेला नाहीं.

गांधी यांच्या चळवळींतील मतांधपणाबद्दल कांहींतरी बाजूस ठेविलें तरी या चळवळीचें पर्यवसान अखेरीस रक्तपातांत होणार नाहीं काय ? असा एक प्रश्न गांधी यांस कोणी विचारला. ही चळवळ निरुपद्रवी प्रतिकाराची असून गांधी यांनी

कितीहि केला, तरी अखेरीस ती तशीच निरुपद्रवी राहणें अशक्य आहे आणि या साऱ्या अपेशाचें खापर गांधी यांच्या शिरावर राहील.

माझा प्रश्न ऐकून घेऊन गांधी म्हणाले, "नौकरशाहीकडून आगळिक झाल्याशिवाय कांहीं अनर्थाचा प्रसंग ओढवेल असें मला वाटत नाहीं." महायुद्ध सुरू झालें, तेव्हां पहिली आगळिक फ्रान्सनें केली, या जर्मनीच्या हकाटीचा आठवण हें उत्तर ऐकून मला झाली. 'बिहार सरकारनें आपण होऊन आगळिक केली, असें तुम्ही म्हणत असल्याचें माझ्या कानीं आलें. तुम्हाला असें वाटतें काय?' हा माझा प्रश्न ऐकून आणि थोडीशी हास्यमुद्रा करून गांधी म्हणाले, "मी कधींच न बोललेल्या अशा पुष्कळ गोष्टी माझ्या गळीं बांधल्या जातात."

आमचें संभाषण संपेपर्यंत गांधी यांनीं आपली शालीनता आणि सभ्यपणा हीं केव्हांहि ढळूं दिलीं नाहींत. वादविवादाच्या भरांत विरोध उत्पन्न झाला असतांहि त्यांची शांति ढळली नाहीं; पण आपल्या मतांची चिकाटीहि त्यांनीं सोडली नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. माझ्या भेटीचें एकंदर सार थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, गांधी हे शुद्ध कल्पनाविवश गृहस्थ असून त्यांच्या या उच्च गुणामुळें हिंदुस्थानच्या लोकांच्या हृदयांत त्यांनीं अढळपद मिळविलें आहे आणि अखेरीस त्यांच्या अव्यवहार्यपणामुळेंच हिंदुस्थानांत रक्ताचे पूर वाहून त्यांजवर दुःखाचे डोंगर कोसळतील, इतकेंच मला म्हणता येईल.

—पर्सीव्हल लँन्डन.

( डेली टेलीग्राफ. )

४

हिंदुस्थान देश हळूहळू अराजकतेच्या मार्गानें वहावत चालला आहे. हिंदुस्थानांत आज काय घडत आहे, हें ज्याला बरोबर समजून घ्यावयाचें असेल, त्यानें प्रथम महात्मा गांधी यांजबद्दल माहिती करून घेणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें ज्या मातींतून महात्मा गांधी हें नवें चित्र निर्माण करीत आहेत, त्या मातीचीहि माहिती त्यांनीं मिळविली पाहिजे. सारा हिंदुस्थान देश महात्माजींच्या चरणसंपुटावर आज लोळत आहे. कांहीं अर्वाचीन काळातील 'सुशिक्षित' त्यांच्याहून वेगळ्या मताचे आहेत; पण आपलें हें मत ते गुलदस्तांत ठेवतात. त्याचा उच्चार ते फक्त खाजगी रीतीनें करतात आणि त्याचें प्रतिपादन सार्वजनिक रीत्या ते बहुधा करीत नाहींत, असें म्हटलें तरी चालेल. खिशांत पुंजी बाळगणारे लोकहि गांधींपासून विभक्त आहेत आणि त्यांना भिऊन ते वागत

आहेत. सरकारचें मत अर्थातच त्यांच्या बाजूचें नाहीं आणि गांधी यांचीं राजशासनविषयक मतें सामान्यतः त्या संस्थेच्या मुळावरच कुऱ्हाड घालणारीं असल्यामुळें कोणतेंहि सरकार झालें तरी तें त्याजविरुद्धच असणार. हिंदुस्थान सरकार गांधींच्या विरुद्ध आहे; तथापि अद्यापि कांहीं प्रत्यक्ष क्रिया न करतां तें नुसतेंच वाट पहात बसलें आहे.

गांधी यांच्या भेटीस मी गेलों, तेव्हां त्यांची स्वारी जमिनीवर आंथरलेल्या चटईवर बसली होती. समोर एक भाताची थाळी होती आणि त्यांचा शिष्यपरिवार त्यांज भोंवतीं कोंडाळें करून बसला होता. अंगावर पोषाक म्हणाल, तर डोक्यावर कैद्याच्या टोपीसारखी एक लहानशी पांढरी जाडीभरडी टोपी आणि तशाच जाडयाभरड्या कापडाचा एक पायजमा, इतकाच होता. नमस्कार चमत्कार झाल्यावर ते मला म्हणाले, 'वेजवुड बाईंना को आणलें नाहीं ?' त्यांच्या या प्रश्नाला मी तावडतोब उत्तर दिलें नाहीं; तथापि माझ्या पत्नीला मीं बरोबर नेलें नव्हतें, हें एका अर्थी बरेंच झालें असें मला वाटलें. कारण बाकीची सारी मंडळी मुकवृत्तीनें जमिनीवर बसली असतां स्वतः मात्र पायांत बूट घेऊन खुर्चीवर थाटांत बसणें तिला खास बरें वाटलें नसतें.

गांधींचा महत्त्वाचा कार्यक्रम म्हटला तर आपल्या गरजा कमी करणें हा होय. आपणास कोणकोणत्या वस्तू सोडतां येतील, याची मीमांसा ते सदोदित करतात. उपास हा त्यांचा एक करमणुकीचा प्रकार आहे. स्वतः उपास करणें आणि शिष्याकडून तो करविणें यांत त्यांना मोठी मौज वाटते. त्यांची शरीरयष्टी इतकी लुकडी, नाजुक आणि क्षुद्र दिसते कीं लहान मुलांप्रमाणें त्यांना सहज उचलून इकडेतिकडे फिरवितां येईल, अशी कल्पना प्रेक्षकाच्या मनांत उभी राहते. आणि त्यांची वृत्तीहि इतकी बालभावाची आहे कीं, प्रेक्षकाच्या या वृत्तीचा अधिक परिपोष तिजमुळें होतो. एखाद्या बालकाप्रमाणेंच ते खरोखर निष्पाप आणि पवित्र आहेत. लहान मुलाला ज्याप्रमाणें आंत एक आणि बाहेर एक अशी वृत्ति राखतां येत नाहीं, त्याचप्रमाणें महात्माजीहि अंतर्बाह्य एकरूप आहेत. ज्या आळ्यांत आज सारें हिंदुस्थान गुंतून पडलें आहे, तें त्यांचें मोहक जाळें हेंच. ख्रिस्ताशीं त्यांची तुलना करण्यास कोणालाहि दिक्कत वाटावयाची नाहीं अथवा असें करण्यांत आपण कांहीं पाप करीत आहों, असेंहि त्याच्या मनांत यावयाचें नाहीं. बुद्धिवादी आणि सभ्य अशा आपल्या शिर्यांस ख्रिस्तानेंहि किती तरी त्रास दिला नव्हता काय ? ख्रिस्ताचें एकंदर चरित्र पाहिलें म्हणजे आपल्या

शिष्यांस त्यानें अनंत वेळां असेंच गूढांत टाकलें असावें, अशी शंका मनांत आल्यावांचून रहात नाहीं. गांधी हे शुद्ध तत्वदर्शी समाजरचनाविध्वंसक आहेत. जुन्यापुराण्या वस्तू त्यांच्या दृष्टीनें आदरणीय दिसत नाहींत. गांधी म्हणजे टॉलस्टॉय यांची नवी आवृत्तीच म्हटली तरी चालेल. फरक इतकाच कीं गांधी यांचें पूर्वचरित्र टॉलस्टॉय यांच्या पूर्व चरित्रासारखें नाहीं. त्याच प्रमाणें आपल्या पूर्व स्वभावावर आधिराज्य मिळविण्यास टॉलस्टॉय यांजप्रमाणें गांधी यांना इतकी दीर्घकाळ धडपडहि करावी लागली नाहीं. आपली प्रकृति त्यांनीं आपल्या मुठींत आणण्याला आज दीर्घकाळ लोटला असून आतां साधेपणाची पलीकडची सीमा त्यांजपाशीं दिसते.

गांधीजींची स्वारी लंडनांत प्रथमच आली, तेव्हां वरच्या वर्गाच्या राहणीला योग्य असें सामाजिक शिक्षण पैदा करण्याचा मोह तिला झाला होता. वक्तृत्व आणि नृत्य या दोन कलांचा अभ्यास आपण लंडनमध्यें सुरू केला होता, असें त्यांनीं स्वतःच मला सांगितलें; पण जात्या ते जैन (?) असल्यामुळें आहिंसाचा विचार इतका सूक्ष्मपणें करणें त्यांच्या स्वभावाविरुद्ध होतें. अप्रतिकाराचें तत्व बाल्यापासूनच त्यांच्या चित्तावर आरूढ झालें होतें. पुढें हळूहळू रस्किन यांचे ग्रंथ त्यांच्या अवलोकनांत आले आणि त्याबरोबरच त्यांच्या नृत्य विषयीची इतिश्री झाली. सामान्यतः चालू संस्कृतीबद्दल आणि विशेषतः पाश्चात्य संस्कृतीबद्दल त्यांना विषाद वाटूं लागला. हळूहळू या विषादाला शुद्ध तिरस्काराचें स्वरूप प्राप्त झालें. 'स्वर्गाचें राज्य तुझ्या अंतरंगांत आहे !' हा टॉलस्टॉय यांचा ग्रंथ त्यांनीं वाचला आणि तावडतोब त्याला आपल्या हृदयसंपुटांत त्यांनीं सांठविलें. दक्षिण आफ्रिकेंत चालू शतकाच्या आरंभ काळांत वकिलीचा धंदा ते करीत होते; पण तो धंदा नांवाचाच होता. तेथील हिंदी वसाहतवाल्यांचें पुढारीपण त्यांजकडे आलें आणि त्याजबरोबर हा धंदा कायमचाच सुटला. हळूहळू ट्रान्सवाल आणि नाताळ येथील तुरुंग त्यांच्या शिष्य मंडळींनीं भरून जाऊं लागले. सरकारनें कांहीं केलें तरी त्याच्या कृतीची उपेक्षा करावयाची नाहीं, हाच सरकारला शुद्धीवर आणण्याचा त्यांचा मार्ग आहे. कायद्याची ओळख ठेवायाची नाहीं आणि सरकारशीं सहकारिता करावयाची नाहीं, या दोन तत्वांचा जन्म दक्षिण आफ्रिकेंत झाला. हें शस्त्र वज्रासारखें अभेद्य आहे; पण आपलें सर्वस्व गमाविण्यादतकी ज्याची कडेकोट छाती असेल, त्याच्याच हातांत त्याचा योग्य उपयोग होतो. हा महत्वाचा मुद्दा हिंदी स्वराज्यवाद्यांच्या लक्षांत आतां

न्यालयाच्या रक्षणाकरितां त्याच्या पितृस्थानीं असलेल्या पंडित मालवियांना यासाठीं केवढें तरी युद्ध करावें लागलें. पार्लमेंट आणि कौन्सिलें हीं साधनें पाश्चात्य असल्यामुळें गांधींना तीं नकोत. कौन्सिलांत जाऊं नका एवढें त्यांनीं म्हटल्या-बरोबर हिंदुस्थानांतील राजकारणीलोक त्याच्या बाहेर राहिले. पंजावप्रकरणा-मुळें लोकमत अधिक क्षुब्ध झालें होतें. तेव्हां हिंदी जनता पाश्चात्यांविरुद्ध असलेल्या गांधींच्या मार्गें सहजच धांवली. कौन्सिलांतील साऱ्या जागा एकजात मवाळांनीं भरून निघाल्या. कांहीं राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांना गांधी यांचें हें मत आवडत नसलें, तरी त्यांची आज्ञा त्यांनीं निमूटपणें पाळली आहे. पाश्चात्यांचा लोकसत्तावाद अथवा राजसत्तावाद हे दोघेहि भाऊ भाऊ असल्या-मुळें लोकसत्तावादसुद्धां गांधी नको म्हणूं लागतील की काय अशी भीति मला वाटते. अद्यापि वकिलोवर आणि सरकारी नोकरांवर ताबा चालविण्या-इतकें सामर्थ्य गांधी यांस प्राप्त झालेलें नाहीं. त्याचप्रमाणें गांधी केवढे मोठे असले तरी पाश्चात्य संस्कृतीचा नाश करण्याइतकें बळ त्यांच्या आंगीं नाहीं. ' महात्मा गांधीकी जय ' अशी प्रचंड गर्जना करून त्यांच्या मार्गें धांवत सुट-णाऱ्या जनतेवर त्यांचें प्रभुत्व केवढेंहि मोठें असलें, तरी साऱ्या पाश्चात्य वस्तू नेस्तनाबूत करण्याचें सामर्थ्य गांधी यांजपाशीं नाहीं. गांधी यांच्या तत्वांचा विजय झाला तर आपल्या हातीं अखेरीस काय पडणार याची कल्पना या भक्त-समूहाला नाहीं. आणि हा भक्तसमूह केवढाहि मोठा झाला; तथापि हिंदुस्थानांत शुद्ध अराजकता माजविण्याचें सामर्थ्यहि गांधी यांजपाशीं नाहीं. कडवी मुसल-मान प्रजा गांधी यांच्या बाजूस गेली आहे. पंजाब प्रकरणासारख्या आपल्या कृतींचा परिणाम जनतेवर काय झाला आहे, याची जाणीव हिंदुस्थान सरकारास पूर्ण झाली असतांहि इभ्रत जाईल या भीतीनें क्षमस्व म्हणण्याचें धैर्य त्याला होत नाहीं.

—कर्नेल वेजवूड, एम्. पी.

( नेशन. )

५

" महात्मागांधी यांजबद्दल तुमचें काय मत आहे ?"

माझा हा प्रश्न ऐकून हा मोठा तत्ववेत्ता कवि म्हणाला, "काय ! माझे मत ? हा प्रश्नसुद्धां विचारावयास नको. गांधी यांजबद्दल मला फार आदर वाटतो. ते एक फार-थोर गृहस्थ आहेत."

" आज हिंदुस्थानांतील असंख्य जनतेवर गांधी यांची विलक्षण छाप पडली आहे, याचें काय कारण असावें बरें ?"

" याचें रहस्य हेंच कीं, गांधी यांची चैतन्यशक्ति सुप्तावस्थेंत नसून तिच्यांत प्रेरणेचें सामर्थ्य आहे. दुसऱ्याच्या अंतरंगांतील चैतन्य ती जागृत करते, त्याचप्रमाणें गांधी यांच्या त्यागीवृत्तीमुळें त्यांना विलक्षण तेज प्राप्त झालें आहे. त्यांचा त्याग विशिष्ट काळापुरता अथवा विशिष्ट वस्तूपुरता नसून त्यांची वृत्ति स्थितप्रज्ञाची झाली आहे. पुष्कळ पुढारी लोक अनेक वेळां स्वार्थत्याग करीत असल्याचें आपणास आढळतें; पण त्या त्यागाच्या देखाव्याच्या पोटांत कसली तरी भोगेच्छा लपून बसलेली असते. त्यांचा त्यागहि हेतुमूलक असतो. एकादा सराफ कोणाला द्रव्य देत असतां ज्याप्रमाणें त्याचें पुष्कळ व्याज मिळण्याची आशा करीत असतो, त्याचप्रमाणें हे पुढारीहि आपला त्याग व्याजीं लावीत असतात. गांधींच्या त्यागाचा प्रकार याहूनसर्वथा भिन्न आहे. त्याच्या उदार चारित्र्याच्या मुळाशीं कोणताहि हेतु नाहीं. यामुळें या त्यागी पुढाऱ्यांपैकीं त्यांच्या जोडीला बसविण्याची योग्यता एकाच्याहि अंगीं नाहीं. प्रत्यक्ष यज्ञपुरुषाचें दर्शन कोणास करावयाचें असेल, तर त्यानें गांधी यांस भेटावें. यज्ञाला स्वतः मनुष्याचें रूप घ्यावेंसें वाटलें आणि गांधी यांच्या रूपानें तो अवतरला, असें मला वाटतें."

" त्यांना नांवाची इच्छा नाहीं. सामाजिक परंपरेंत महत्वाचें स्थान त्यांना नको. पैशाची पर्वा ते करीत नाहींत आणि आपल्या हातीं कांहीं सत्ता असावी, अशीहि त्यांची इच्छा नाहीं. भरतभूमीचें सिंहासन तुम्ही त्यांना देऊं केलें, तर त्याच्या जडावांतील रत्नें मोकळीं करून आणि तीं विकून टाकून तो सारा पैसा गरीब दुबळ्यांना ते वांटून देतील. धनाढ्य अमेरिकेनें उद्यां आपला सारा पैसा गांधी यांस देऊं केला, तर मानवकुलाच्या उन्नतीसाठीं एकाद्या कारणीं त्यांना तो लावतां न आला तर त्यांतल्या एकाद्या फुटक्या कवडीला देखील ते शिवावयाचे नाहींत."

" आपल्या जवळील कोणती वस्तु लोकांना देतां येण्यासारखी आहे, याचाच विचार त्यांचें चित्त सदोदित करीत असतें. त्याच्या मोबदल्याचा विचार तेथें उपजतच नाहीं. फार काय; पण 'उपकार झाले' एवढे शब्दसुद्धां ऐकण्याची त्यांची इच्छा नाहीं."

" माझें हें लांब लचक वर्णन ऐकून तुम्ही भांबावून जाऊं नका. यांत अवास्तव वर्णनाचें एक अक्षरसुद्धां नाहीं. गांधी यांची पुरी ओळख मला पटली आहे. आमच्या बोलपूर येथील शाळागृहांत गांधी कांहीं दिवस येऊन राहिले होते, तेव्हां त्यांची अंतरबाह्य ओळख करून घेण्याची पुरी संधी मला मिळाली होती. गांधी यांचें चित्त अत्यंत निर्भय असल्यामुळें त्यांच्या आत्मगज्ञाला अतुल सामर्थ्य प्राप्त झालें आहे. मोठे चक्रवर्ती सत्ताधीश, प्रचंड तोफा, लखलखीत शस्त्रास्त्रें, भयंकर अंधारकोठड्या, तुरुंगांतील नानाविध मनुष्यसंहारक साधनें; अपमान, अथवा शरीराघात यांपैकीं कोणापुढेंहि गांधींचा दिव्य जीवात्मा मान वांकविणार नाहीं. फार काय; पण प्रत्यक्ष मृत्यु आपल्या कराळरूपानें त्यांजसमोर येऊन उभा राहिला, तरी गांधी यांचें चित्त लवभरहि कंपायमान होणार नाहीं. गांधी हा जीवन्मुक्त आत्मा आहे. मला उद्यां कोणी गळफांस लावला तर 'धांवा हो धांवा' असा टाहो मी फोडीन; पण अशा स्थितींत गांधी यांच्या मुखावाटे दुःखाचा उच्छ्वासहि निघणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. उलट गळफांस लावणाऱ्याकडे पाहून त्यांना खरोखरच हंसूं येईल. मरतांना सुद्धां अगदीं हंसत मुखानें ते प्राण सोडतील."

" एकादें लहान मूल जितकें साधें आणि अहेतुक असतें, तितकेच गांधी हेहि साध्या वृत्तीचे गृहस्थ आहेत. त्याचप्रमाणें त्यांची सत्यनिष्ठाहि अद्वितीय आहे. मनुष्यजातीबद्दल त्यांच्या चित्तांत जिवंत प्रेम आहे, इतकेंच नव्हे तर तें जागृत असून व्यक्त दशेला येण्याकरतां एकसारखें धडपडत असतें. गुहेंत राहणाऱ्या तत्ववेत्त्याप्रमाणें त्यांचें प्रेम गुप्त दशेंत राहूं इच्छित नाहीं. मानवजातीचें कल्याण करावें या एकाच इच्छेनें प्रेरित होऊन त्याच खटपटींत सुळीं जाणाऱ्या ख्रिस्ताची वृत्ति गांधी यांच्या ठिकाणीं आहे. गांधी यांची ओळख जों जों अधिक पटत जाते, तों तों त्यांजबद्दलची आपली भक्ति अधिकाधिक वाढत जाते. भविष्यत्काळीं जगाला नवें वळण लावण्याच्या कार्यांत गांधी यांजकडे मोठी महत्वाची भूमिका येणार, हें सांगावयास पाहिजे काय ?"

" आपण केलेलें हें वर्णन ऐकून अशा गृहस्थाची ओळख जगाला अधिक पटली पाहिजे, असें मला वाटतें. आपण स्वतः आज जगविख्यात गृहस्थ आहां, मग गांधी यांची अधीक ओळख जगाला आपण कां पटवित नाहीं ?"

" काय ? गांधी यांची ओळख मी पटविणार ? आणि तें मला साधणार तरी कसें ! या प्रभावान दिव्य आत्म्यापुढें मी कःपदार्थ आहें आणि खरें पाहतां

जो उपजतच मोठा, त्याला दुसऱ्यानें मोठेपण तरी काय द्यावें? अशा पुण्यात्म्यांचा मोठेपणा स्वयंभु असतो. त्यांची प्रभा आत्मतेजानेंच सर्वत्र फाकत असते. त्यांचा प्रकाश ग्रहण करण्या इतकी जगाची तयारी झाली म्हणजे ते आपोआपच प्रगट होतात. अशी वेळ आली म्हणजे गांधीहि प्रगट होतील. जगालाहि शुद्ध प्रेमपूर्ण स्वातंत्र्य आणि सर्वत्र बंधुभाव या वस्तूंची जरूर आहे; पण त्यांचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य आज त्याच्या ठिकाणी नाहीं. तें सामर्थ्य त्याला आलें म्हणजे गांधी यांचा संदेश ऐकण्यास तें पात्र होईल आणि त्याच वेळीं तें गांधी यांस ओळखील."

"आमच्या पौर्वात्य संस्कृतीचें अखेरचें ध्येय गांधी यांच्या रूपानें अवतरलें आहे. मनुष्य हा स्वभावतः शुद्ध चैतन्यरूप आहे. ही पूर्वीनें सांगितलेली खूणगांठ आपल्या प्रत्यक्ष चरितानें साऱ्या जगाला गांधी आज पटवीत आहेत. मनुष्यप्राण्यांचें हें खरें स्वरूप नीतिमय आणि प्रेममय परिस्थितींतच वाढीस लागतें, हें गांधी आज सिद्ध करून दाखवीत आहेत. त्याच प्रमाणें परस्पर द्वेष आणि बंदुकीच्या दारूचा धूर या वस्तूंनीं या स्वरूपाचा नाश होतो, हें आपण पहात आलोंच. उल्हाटयंत्रांच्या धूम्रमय वातावरणांत मानवी चैतन्य जीव धरूं शकत नाहीं."

"हिंदुस्थानाला एका वर्षाच्या अवधींत स्वराज्याची प्राप्ती होईल, असें थोड्याच दिवसांपूर्वी गांधी बोलले होते. या बांधलेल्या मुदतींत हिंदुस्थानाला स्वराज्य कदाचित् मिळणार नाहीं; तथापि या बाबींत गांधी यांची आत्मश्रद्धा पक्की आहे, यांत मात्र संदेह नाहीं. आपलें हें साध्य वस्तुस्थींत आणण्याकरितां हवे ते हाल ते सोसतील. हवा तेवढा त्याग ते करतील आणि कोणत्याहि दुःखाला भिऊन ते मागें सरणार नाहींत, यांत मात्र संदेह नाहीं."

"दक्षिण आफ्रिकेंत आठ वर्षेपर्यंत शांततेचें युद्ध करून गांधी यांनीं अखेरीस यश मिळविलें. पाशवी शक्तीच्या बळावर कांहीं काळपर्यंत सत्य दडपून टाकतां येईल; पण अखेरीस सत्याचाच जय होणार हें निश्चित आहे."

"सध्यां चालू असलेल्या असहकारितेच्या चळवळीबद्दल आपलें खरें मत काय आहे?"

"ही चळवळ अत्यंत महत्वाची आहे. कल्पनासृष्टि आणि जडवादाची दंडनीति यांजमध्यें हें युद्ध आहे. शुद्ध जडात्मक दंडनीति आणि कल्पनासृष्टींतील चैतन्यशक्ति यांच्या युद्धांत चैतन्यशक्तीचाच जय अखेरीस होईल, असें मला

वाटतें. ही प्रचंड चळवळ गांधी यांजसारख्या योग्य पुरुषाच्या हातीं आहे, हें खरोखर मोठें नशीबच म्हटलें पाहिजे. गांधी यांच्या सदाचरणामुळें आज सारी भरतभूमि त्यांच्या पायीं लागली आहे. हिंदनौकेचें सुकाणूं गांधी यांच्या हातीं असेपर्यंत हें जहाज भलत्या मार्गाला लागेल अथवा खडकावर जाईल अशी धास्ती मला वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर अखेरीस आपल्या नेमलेल्या बंदरांत तें सुखरूप पोहोंचेल याबद्दलहि मला शंका वाटत नाहीं."

डॉ. टागोर—

( एका अमेरिकन पत्राच्या प्रतिनिधीशीं मुलाखत. )

६

लॉर्ड रेडींग यांनीं हिंदुस्थानाच्या व्हाईसरायाच्या पदाचा स्वीकार केला आणि हिंदुस्थानांत त्यांनीं प्रथम पाऊल ठेवलें, तेव्हां गांधी यांची मुलाखत घेण्याची आपली मनीषा त्यांनीं प्रथम प्रगट केली. यावेळीं हिंदुस्थान सरकारच्या पुष्कळ मोठमोठ्या अधिकाऱ्यांस सुखाची झोंपहि येईनाशी झाली होती. गांधी यांची चळवळ रात्रीं बेरात्रीं त्यांना भेडसावूं लागली होती. रेडींग आणि गांधी यांच्या भेटींत उभयपक्षीं काय भाषणें झालीं हें बाहेर आलें नाहीं; तथापि परस्पर परस्परांस उमजले; असें गांधी यांनीं म्हटल्याचें मात्र जाहीर झालें होतें. एकमेकांतील हा उमज कोणत्याहि स्वरूपाचा असला, तरी त्यामुळें गांधी पक्षाची चळवळ थंडावली नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. गांधी यांच्या चळवळीमुळें परदेशी कापडावर बहिष्कार घालून लक्षावधी लोक खादी वापरूं लागले आहेत. 'चरख्याच्या पोटांत स्वराज्य गुप्त राहिलें आहे' या गांधींच्या सूत्राचा प्रसार एका वर्षाच्या अवधींत कोटयवधि लोकांत झाला आहे. नव्या राष्ट्रीय निशाणावरहि मुख्य चिन्ह चरख्याचेंच आहे.

गेल्या सात महिन्यांच्या अवधींत हिंदुस्थानच्या इतिहासाचा जो भाग लिहिला गेला आहे, त्याला अर्वाचीनकाळांत कोठेंहि तोड सांपडावयाची नाहीं. गांधी यांच्या असहकारितेच्या चळवळीविरुद्ध कांहीं खटपट प्रथम झाली आणि असें होणें अपरिहार्य होतें. कोणतीहि चळवळ प्रथमच सुरू झाली म्हणजे जुन्या पुढ्यांतील लोक तिच्याविरुद्ध असावयाचे, हा प्रकार सर्वत्र आढळून येतो. अठराव्या शतकांत स्वातंत्र्याची चळवळ अमेरिकेंत सुरू झाली, तेव्हां तेथें जसा जुना पुढा अस्तित्वांत होता, त्याचप्रमाणें आज विसाव्या शतकांत हिंदुस्थानांतहि तो अस्ति-

स्वांत आहे; पण अमेरिकेंतील शहात्तर पुढाऱ्यांचें चैतन्यहि त्याबरोबरच हिंदुस्थानच्या भूमींत जन्मास आलें आहे. जें साध्य अमेरिकन देशभक्तांनीं आपणापुढें ठेवलें होतें आणि ज्याच्या सिद्धीसाठीं हॅंगकॉक आणि अॅडॅम्स जीवापाड मेहनत करीत होते, तेंच साध्य आज हिंदी जनतेपुढें आहे. अमेरिकेची तेव्हांची स्थिति आणि हिंदुस्थानाची आजची स्थिति यांत जो फरक आहे, तो फक्त साधनांचा आहे. स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं अमेरिकन जनतेनें लष्कराची जमवाजमव केली आणि त्याबद्दल हिंदीजनतेनें आज असहकारितेचें शस्त्र हातीं घरलें आहे. राज्यकर्त्यांना आपणाकडून कोणतीहि मदत होऊं द्यावयाची नाहीं, असा निश्चय हिंदी जनता आज करीत आहे आणि याच निश्चयाबरोबर शांततार्भंग न होऊं देण्याची शपथ ती घेत आहे. यामुळें अमेरिकन जनतेप्रमाणें ती शस्त्र ग्रहण करणार नाहीं, हें उघड आहे. त्या काळीं अमेरिकन जनता द्वेषाग्नीनें धुमसत होती; पण आजच्या काळीं हिंदी जनतेनें द्वेषाग्नीऐवजीं प्रेमनिर्झराचा स्वीकार केला आहे. गांधी म्हणतात, "माझ्यांत सामर्थ्य असतें तरी मुद्दां तुम्हांवर मी हात उगारला नसता. केवळ कष्ट भोगानें तुम्हांस जिंकण्याची माझी इच्छा आहे रणांगणावर समोरासमोर दोन हात करणें आम्हांस अशक्य आहे. ही वीरवृत्ति दाखविणें आज आमच्या हातीं नसलें; तथापि जीवात्म्याची सात्विक वीरवृत्ति प्रकट करण्याचा मार्ग आम्हांस खुला आहे. हें सात्विक वीर्य प्रकट व्हावें, याच उद्योगांत मी आज गुंतलों आहे."

गांधी यांनीं हा मार्ग आखून दिल्याबरोबर हिंदी जनता त्या मार्गानें एवढ्या उत्साहानें जाऊं लागली, याची खरी कल्पना पाश्चात्य लोकांस होणें कठिण आहे. तीन हजार लोकांचा समुदाय दंडादंडीवर आला असतां, केवळ दोनच स्वामींनीं त्याला शांत करें केलें त्याची विश्वसनीय हकीकत प्रसिद्ध झाली आहे. आपण अनत्याचारी राहूं अशी शपथ तुम्ही घाहिली आहे, इतकें स्मरण या स्वामींनीं करून दिल्याबरोबर हा सारा जमाव शांत होऊन आपल्या मार्गाला लागला. कोणाहि असहकारितावाद्याला सरकारी अधिकाऱ्यानें पकडलें, तर त्या गोष्टीस कसल्याहि प्रकारचा अडथळा तो करीत नाहीं. सत्याग्रह म्हणजे नित्य सत्य तत्त्वाला कोणत्याहि प्रसंगीं चिकटून राहाणें, हा गांधी यांचा मार्ग आहे. हिंदी लोकांच्या अंगांत जें बळ आज संचारत आहे, त्याच्या मुळाशीं हेंच सत्याग्रहाचें तत्त्व आहे. आणि दंडुकेशाही कितीहि प्रबळ झाली, तरी या आध्यात्मिक बळाचा संपूर्ण नाश तिला कधींहि करतां येणार नाहीं.

अशा रीतीनें परकीयसत्तेबरोबर असहकारिता एका बाजूनें सुरू असतां, दुसऱ्या बाजूनें नव्या राष्ट्रीय घटनेचें कार्यहि सुरू आहे. परकीयांचा त्याग आणि स्वकीयांचें एकीकरण असें गांधी यांच्या या नीतीचें द्विधा स्वरूप आहे. हिंदी राष्ट्राच्या दीर्घपरंपरेंत असलेल्या चांगल्या वस्तूंचें पुनरुज्जीवन करण्याचा यत्न सुरू झाला आहे. गांधी यांची नीति एकापक्षीं जशी विघटनात्मक आहे, तशीच दुसऱ्यापक्षीं ती संघटनात्मकहि पण आहे. बाहेरून परकीय सत्ता आणि संस्कृति मोडकळीस आणण्याचा प्रयत्न करीत असतां आंतून नवी शासनसंस्था निर्माण करण्याचा यत्नहि त्याबरोबरच चालू आहे. सध्यांची परावलंबी स्थिति नाहींशी करून तिच्या जागीं स्वावलंबी संस्था जन्मास घालण्याचा यत्न सुरू आहे. तीस कोटी लोकांना एकाच वेळीं दास्यांत जखडून टाकणाऱ्या ज्या ज्या वस्तु सांप्रत अस्तित्वांत आहेत, त्यांच्या संपूर्ण नाशाचा उद्योग एका बाजूनें चालू असतां दुसऱ्या बाजूनें नवी अंतर्गत कर्मदृष्टि उदय पावत आहे. हिंदी लोकांच्या मनोभूमिकेंत स्वतंत्र वृत्तीचें आणि स्वावलंबी जीविताच्या इच्छेचें बीजारोपण करण्याचा यत्न दुसऱ्या बाजूनें सुरू आहे. लवाद कचेऱ्या स्थापन करणें; गांव पंचायती निर्माण करणें, नवीं शाळागृहें उघडणें, जुने धंदे उद्योग पुन्हां सुरू करणें, इत्यादि गोष्टी पुनरुज्जीवनाच्या दर्शक आहेत. लक्षावधि लोकांना नवा जन्म देण्याचें कार्य अशा रीतीनें सुरू झालें आहे.

परकीय शासनसत्तेबरोबर असहकार करणें हा मार्ग एकाच शब्दानें सांगावयाचा म्हटलं, तर तो नेति नेति अथवा त्याग या शब्दानें सांगतां येईल; पण सांप्रतच्या दुःखपरिणामी मार्गांच्या त्यागाबरोबर नव्या सुपरिणामी मार्गांचा अवलंब आपोआपच होत आहे. जुना मार्ग राष्ट्राला मृत्यूच्या पंथाकडे नेत होता आणि नवा मार्ग त्याला आतां जीवनोन्मुख करीत आहे. मृतप्राय झालेल्या हिंदी राष्ट्रांत नवजीवनाचा संचार अशा रीतीनें होत आहे. असहकारितेच्या मार्गाची संघटनेची बाजू हीच आहे; आणि गांधी यांनीं आंखून दिलेल्या मार्गाचें अखेरचें साध्य हेंच आहे.

अशा प्रकारें जी क्रांति हिंदुस्थानांत आज घडून येत आहे, ती साऱ्या जगांत खरोखरच अद्वितीय आहे. असा विलक्षण देखावा यापूर्वी जगानें केव्हांहि पाहिलेला नाहीं. हा देखावा नजरेसमोर आला म्हणजे एकंदर मानवकुलाच्या मनांत विचार परंपरेची विलक्षण खळबळ उडून जाईल, यांत शंका नाहीं. दंड-नीति बेकायदेशीर ठरून तिला नीतिनिर्बंधाच्या बाहेर हद्दपार करणें आणि

त्याबरोबरच नवा सलोख्याचा मनु जन्मास आणणें हें कार्य लहान म्हणतां येईल काय ? 'तुझ्या एका गालावर कोणीं मारलें, तर दुसराहि गाल पुढें कर' अशी आज्ञा खिस्तानें केली; पण या आज्ञेचा वास्तविक अर्थ आज दोन हजार वर्षांच्या अवधींत कोणामहि समजला नाहीं आणि ही आज्ञा नुसती दप्तरीं दाखल होऊन स्मृतिशेष झाली. आतां हीच आज्ञा हिंदुस्थानांत पुन्हां जन्म घेत आहे, एवढेंच नव्हें तर प्रत्यक्ष व्यवहारांतहि ती स्पष्ट दृष्टोस येत आहे. हा प्रचंड उद्योग सिद्धीस गेला, तर जग युद्धदेवतांच्या तडाक्यांतून कायमचें सुटेल. साऱ्या जगभर वणवा पेटून मनुष्यजातींतील शेलक्या रत्नांचा निःपात करून आणि एक मात्र पिढी पुरता नव्हे तर पुढच्या दोन तीन पिढ्यांपर्यंतहि युद्धाग्नीची आंच जीवंत ठेवणारी ही रुधिरप्रिय युद्धदेवता कायमची निजधामास जाईल.

इंग्रजलोकांच्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील त्यांच्या साम्राज्याला गांधी हाच सर्वांत मोठा शत्रु आहे. हिंदुस्थानांतील नोकरशाहीची सत्ता उलथून पाडणें, हेंच आपलें कार्य आहे, असें गांधी स्पष्ट म्हणत असल्यामुळें चालू कायद्याच्या दृष्टीनें ते राजद्रोही ठरतात, असें आहे. तथापि रक्तपाताची क्रांति आणि ब्रिटिश सत्ता यांच्या मध्यें तडजोड करणारी जर कोणी व्यक्ति असेल, तर ती गांधी हीच होय. हिंदुस्थानाचें नेतृत्व आज गांधी यांजकडे नसतें, तर तेथें क्रांतीची वावटळ उठून रक्तपातास सुरवात झाली असती. हिंदुस्थानांतील बातम्या बाहेर जाऊं नयेत, म्हणून तेथील सरकारी अधिकारी दक्षता बाळगीत असतांहि लोकक्षोभ झाल्याच्या बातम्या थोड्याबहुत तरी बाहेर पडल्यावांचून रहात नाहींत. अशा प्रकारचे स्फोट अगदीं सामान्य स्वरूपाचे नव्हत हें उघड आहे. त्यांचें जेवढें स्वरूप बाह्यतः दिसतें, त्याहून त्यांत अधिक अर्थ आहे. अशा स्थितींत लोकांचें नेतृत्व पत्करून गांधी यांनीं युद्धाची भेरी वाजविली आहे; पण त्यांचा मार्ग मात्र वेगळा आहे. एका बाजूनें कांहीं लोक शीखरला गुरुस्थानी मानून हातीं तरवार धरीत आहेत आणि त्यांच्या उलट बाजूला खिस्ताचें अधिष्ठान ठेवून शांततामय युद्ध पुकारीत आहेत. अशा रीतीनें या परस्परविरोधि शक्तीमध्यें हिंदुस्थान देश आज हेलकावे खात आहे.

येशू खिस्ताचीं तत्वें खरोखर व्यवहार्य आहेत, हें प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविण्याचा मान हिंदी लोकांनीं आज आपणाकडे घेतला असून पाश्चात्य जनता त्यांजकडे मोठ्या उत्सुकतेनें टक लावून बसली आहे. लोकांचें नेतृत्व पत्करावें अशी योग्यता गांधींच्या ठिकाणीं स्वयंभु आहे. यामुळेंच नाना मतांचे नाना

पंथांचे आणि नाना परिस्थितींतील लोक त्यांच्या शब्दाला आज मान देत आहेत. हीं कोट्यवधी स्त्रीपुरुषें स्वातंत्र्याच्या युद्धासाठीं उत्सुक होऊन पुढें निघालीं आहेत. आणि जड सृष्टींतील जड साधनांचा त्याग करून अंतःसृष्टींतील सूक्ष्म शस्त्रास्त्रांचा अवलंब त्यांनीं केला आहे. हिंदुस्थानाचें स्वातंत्र्य हें त्यांचें अखेरचें ध्येय आहे आणि या मार्गानें जाऊन हिंदुस्थान स्वतंत्र झाला, म्हणजे सारें जगच स्वतंत्र होईल, यांत शंका नाहीं.

–ब्लांच वाटसन.
( न्यूयार्क–सिनफिनर. )

७

हा गांधी आहे तरी कोण ? याच्या साऱ्याच कल्पना मोठ्या विचित्र भासतात. आणि या वेडगळ भासणाऱ्या कल्पनांचा प्रचार हा गृहस्थ मोठ्या मनःपूर्वकतेनें करीत आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिशसत्ता नमवून हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन करावें, हा या गृहस्थाचा उद्देश आहे. एका बाजूनें हिंदी लोक उत्साहपूर्वक याच्या कृतीकडे डोळे लावून बसले आहेत आणि उलट पक्षीं हा गृहस्थ युरोपीयन लोकांच्या थट्टेचा विषय होऊन बसला आहे. असा हा विचित्र प्राणी आहे तरी कोण ?

हिंदुस्थानांत ज्या क्रांतीला आज सुरवात झाली आहे, तिचा जीवात्मा महात्मा गांधी हेच होत. हिंदुस्थानांत माजलेल्या असंतोषाचें सूक्ष्मरूप म्हणजे गांधी. पश्चिम आणि पूर्व हे दोन्ही भाग समान दर्जाचे आहेत, अशी खूणगांठ पटविणारे गृहस्थ गांधी हेच. हिंदुस्थानांत आज गांधी अत्यंत शक्तिमान होऊन बसले आहेत. आणि त्याच प्रमाणें त्यांच्या प्रतिपक्षांना ते एकाद्या कोड्याप्रमाणें झाले आहेत. देहाच्या दृष्टीनें पहातां ते इतके क्षुद्र आहेत कीं, त्यांचें स्वरूप डोळ्यांतहि नीटसें भरत नाहीं. सुमारें पांचसाडेपाच फूट उंची, जीर्ण झालेला देह आणि त्यावर भिकारसा पोषाक, हें त्यांचें बाह्य वर्णन आहे. ते मोठे रुबाबदार दिसतात, असेंहि नाहीं. हा गृहस्थ मोठा कर्तृत्ववान असावा, असें त्याजकडे पाहून कोणासहि वाटावयाचें नाहीं. एकंदरीनें त्यांची बाह्य आकृति कोणत्याहि विशिष्ट गुणाची दर्शक नाहीं. तथापि डोळ्यांतील तेज आणि चालण्याची ढब यांत मात्र जें विशिष्टत्व आहे, त्यावरूनच सामान्य खिलारांतून त्याना वेगळें निवडतां येतें. त्यांचा जन्म थोर कुळांत झाला आहे, असें नाहीं. त्याचप्रमाणें त्यांची जातहि सर्वांत वरिष्ठ नाहीं. त्याचे वडील हिंदुस्थानांतील नेटिव्ह संस्थानांत एक-

लहानसे कामगार होते. ते स्वतः एका वेळीं वकिली करीत होते; पण ती सोडून दिल्याला आतां पुष्कळ वर्षांचा काळ लोटून गेला आहे. ब्राह्मण अथवा क्षत्रीय या श्रेष्ठ वर्णांत त्यांचा जन्म झालेला नाहीं. ते वैश्य आहेत. त्यांनीं इंग्लंडांत सात वर्षें काढलीं आणि दक्षिण आफ्रिकेंत वीस वर्षें ते राहिले होते. यामुळें त्यांची दृष्टि विशाल झाली असून एकंदर जगाचें अवलोकन करण्याची संवय तिला लागली आहे. जगांतील विशिष्ट देश आणि तेथील प्रमुख व्यक्ति कोणत्या उद्योगांत आहेत, यांतील जाणीव गांधी यांस असते. इंग्लंडांत बराच काळ घालविल्यामुळें इंग्रजी भाषेचें असें मार्मिकज्ञान गांधी यांस आहे कीं त्यांत त्यांच्या देशबांधवां-पैकीं फारच थोडीं माणसे त्यांची बरोबरी करूं शकतील. गांधी मोठेसे वक्ते नाहींत; तथापि ते बोलूं लागले म्हणजे साऱ्या हिंदुस्थानचे कान त्यांच्याकडे वळतात. ते जाडे पंडित आहेत असेंहि नाहीं आणि चिर कीर्तीचा लाभ होईल अशा एकादा ग्रंथहि त्यांनीं निर्माण केलेला नाहीं. हिंदुस्थानांत अमुक एका पक्षाचे ते पुढारी आहेत, असें नाहीं. एकंदरीनें अशा प्रकारच्या या मनुष्याला आपल्या देशबांधवांवर इतकी अभूतपूर्व छाप कशी बसवितां आली, याचें एकादास मोठें नवल वाटेल; पण असें नवल वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. या कोड्याचा अगदीं थोडक्यांत उलगडा म्हटला, तर हाच कीं या साडेतीन हात देहाच्या मागें जें विभूति-मत्त्व आहे, त्यांतच ही शक्ति सांठविली आहे. जन्मानें सामान्य कुटुंबांतील; पण स्वतःच्या दानतीनें संतांच्या पदवीला पावलेले गांधी आज राजकारणी पुरुष बनले आहेत. टॉलस्टॉय आणि रस्कीन यांचीं मतें आपलीशीं करून दक्षिण आफ्रिकेंतून स्वदेशीं आल्यानंतर हिंदुस्थान देशाचें पुढारीपण स्वीकारून आज तेथें ते सर्वश्रेष्ठ पुरुष होऊन बसले आहेत. विलायतेंत यांच्या जोडीला बस-विण्यासारखा पुरुष शोधूं गेलें, तर या कामीं आपली निराशाच होणार आहे. जनरल बूथ किंवा रेव्हरंड रॉयस्माईल हे राजकारणांत पडले असते, तर त्यांची तुलना गांधी यांशीं कदाचित् झाली असती; तथापि तेहि पुष्कळ बाबतींत गांधींच्या बरोबरीचे ठरले नसते. त्यांना पाहून गांधी यांच्याबद्दल खरी कल्पना आपणास झाला नसती. गांधी यांचें वर्गीकरण अशा रीतीनें करणें अथवा ते अमुक एकासारखे आहेत, असें निश्चयानें म्हणणें शक्य नाहीं. त्यांच्याबद्दलचें लोकमत काय आहे, याचा अंदाज काढूं गेलें, तर किती तरी विलक्षण मतें आपणास ऐकूं येतील. माझा स्वतःचाच अनुभव ऐका. एक बंगाली स्टेशन मा-स्तर म्हणाला, "अहो, गांधी म्हणजे एक देवच आहे." दुसरा एक अक्षरशत्रु

खेडवळ म्हणाला, 'सांप्रतच्या विलक्षण स्थितींत परमेश्वरानें एकच गांधी साहेब निर्माण केला आहे !' एका विद्यार्थ्यानें म्हटलें, 'गांधी हे महात्मा आहेत. ते अतिमानुष पुरुष आहेत !' एक सरकारी कामगार म्हणाला, 'गांधी यांना पाहून मला पॉल प्रेषिताची आठवण होते !' माझा एक मित्र म्हणाला, 'सावध रहा. गांधी हा एक भयंकर क्रांतिकारक चळवळ्या आहे.' याशिवाय गांधी यांजसंबंधीं 'ढोंगी,' 'वेडा,' 'कल्पनाप्रिय' इत्यादि अनेक विशेषणें माझ्या कानीं आलीं आहेत. त्याचप्रमाणें 'भोळसरपणाचें पांघरूण घेऊन आणि त्याखालीं आपले खरे बेत लपवून गांधी हा ब्रिटिश सत्ता उलथून पाडणारा एक पक्का चळवळ्या आहे, ' असें म्हणणारे लोकहि मला भेटले आहेत. 'गांधी हा एक बेजबाबदार आणि आपल्या मार्गांत नीति अनीतीची चाड न बाळगणारा असा हा गृहस्थ आहे!' असेंहि कांहीं म्हणतात. उलटपक्षीं 'गांधी हेच एकच आपल्या देशाचा उद्धार करणारे पुरुष आहेत !' असेंहि म्हणणारे लोक मला आढळले. या एकंदर मतांचा विचार केला, म्हणजे गांधी हे सामान्य कोटींतील पुरुष नव्हत, हे कोणासहि दिसून येईल. ते क्रांतिप्रिय असोत अथवा उत्क्रांतिवादी असोत, पुण्यशील असोत अथवा पापी असोत, खरे राजकारणी असोत अथवा शुद्ध चळवळे असोत. वेडे असोत अथवा शहाणे असोत, स्वदेश रक्षक असोत अथवा भक्षक असोत, मानुषी असोत अथवा अतिमानुषी असोत, कांहीं झालें, तरी ही एक अद्वितीय व्यक्ति आहे, यांत मात्र शंका नाहीं. गांधींचे शब्द आणि त्यांची कृति हीं, आज हिशेबांत घेणें, अवश्य झालें आहे. त्यांची नुसती टर उडवून भागावयाचें नाहीं. वर्तमानपत्रांत एकादा रकाना मजकूर लिहून त्यांची पुष्कळशी स्तुति करण्यांत जसा मतलब नाहीं, त्याचप्रमाणें त्यांची थट्टा उडविण्यांतहि अर्थ नाहीं. अनेक कारणांमुळें हिंदुस्थानांत जो असंतोष माजला आहे, तोच गांधींच्या मुखानें आज बाहेर पडत आहे अप्रिय कायदे, शेतकऱ्यांची आणि धंदेवाल्यांचीं गाऱ्हाणीं, गोऱ्या काळ्यांतील स्पष्ट दिसणारा भेद, युद्धांत झालेल्या धडामोडीचे परिणाम आणि पंजाबांतील लष्करी कायद्याच्या अमलानंतर मागें शिल्लक उरलेल्या तीव्र मनोभावना, या साऱ्यां गांधींच्या मुखावाटे बाहेर पडत आहेत. हीं सारीं कारणें निर्मूळ झाल्यावांचून अथवा त्यांचा खरा उपशम झाल्यावांचून गांधींचें तोंड बंद पाडणें शक्य नाहीं.

आतां गांधी यांच्या अंतःदृष्टीकडेहि थोडीशी नजर टाकली पाहिजे. गांधी हे अस्सल स्वदेशभक्त आहेत. हिंदुत्वाचा खरा आत्मा गांधींच्या ठिकाणीं जसा

दिसतो, तितका निर्मळ प्रकार इतरत्र तुम्हांस आढळणार नाहीं. याशिवाय गांधी यांचा दुसराहि एक विशेष ध्यानांत टेवण्यासारखा आहे. गांधी हे पुढारी असतांहि सामान्य जनतेपासून विभक्त झालेले नाहींत. अगदीं खालच्या प्रतीच्या लोकांनाहि ते आपल्यांतलेच वाटतात. दारिद्र्याची तर त्यांनीं शपथच घेतली आहे. ती त्यांच्या ह्रदयाची निशाणी आहे. अंगावरचा जाडा भरडा पोशाख कदाचित त्यांच्या स्वतःच्या विणकरीचाच असूं शकेल. हातमागाचें त्यांच्या डोक्यांत एक वेडच शिरून बसलें आहे. देहपरिचर्येकरितां फारशा गरजा त्यांनीं बाळगलेल्या नाहींत. अल्प फळफळावळ आणि कांहीं कोरडा मेवा, एवढ्यावरच आपल्या पोटाची गुजराण ते करतात. आगगाडीच्या तिसऱ्या वर्गांतून ते प्रवास करतात. असा प्रवास ही त्यांच्या लीनतेची खरी कसोटी समजली जाते; तथापि अशा स्थितींतहि महत्वाच्या बाबींत हानिकारक लोकरीतीस ते मान देत नाहींत. हडोचा कोट फोडून भेहमहाराबरोबर अन्नव्यवहार करण्याइतकें धैर्य गांधी यांच्या अंगीं आहे. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या पंक्तीसहि बसण्यांत त्यांना अधर्म वाटत नाहीं. राजकारणांत पडल्यामुळें कित्येक वेळां विचित्र प्रकारच्या भोजनसमारंभासहि त्यांना हजर रहावें लागतें. ते संत आहेत; तथापि या संत पदवीच्या शृंखलांत ते गुंतून पडलेले नाहींत. केवळ संत म्हणून स्तोम माजवून कांहीं न करतां, लोकांकडून पूजा करून घ्यावी, अशी त्यांची वृत्ति नाहीं. ते संत असले, तरी आपलें सामान्य मनुष्यत्व ते विसरलेले नाहींत मोजकें बोलावें आणि मोजक्या पद्धतीनें आढ्यताखोर शिष्टासारखें वागावें, हे त्यांच्या गांवींहि नाहीं. सामान्य जनाप्रमाणेंच ते सर्वांत मिसळतात, सर्वांबरोबर बोलतात आणि सामान्याप्रमाणेंच थट्टामस्करीहि करतात. ते खरे त्यागी पुरुष आहेत आणि निस्सीम त्यागी बुद्धीचीं स्पष्ट चिन्हें त्यांच्या देहयष्टीवर सुद्धां उघड दिसून येणारी आहेत. आणि गांधी यांच्या सामर्थ्याचें रहस्य काय? या कोड्याचा उलगडा होण्याचेंहि स्थल हेंच आहे. निस्सीम हिंदी देशभक्त बनण्याकरतांच विलक्षण हालअपेष्टा या गृहस्थाला सोसाव्या लागल्या आहेत. गांधी यांची देशभक्ति वारंवार कसोटीला लागली आहे. दक्षिण आफ्रिकेंत तर देशबांधवांच्या दुःखांत अंशभागी होण्याकरितां, त्यांनीं आपल्या वकिलीवरहि पाणी सोडलें. या वेळीं द्रव्यसंपादनाचा विचारहि त्यांच्या चित्तला शिवला नाहीं. या अंगीकृत कार्यांत त्यांना वारंवार तुरुंगवास सोसावा लागला आणि एकदांतर मरणाच्या द्वारापर्यंत त्यांना जावें लागलें.

या साऱ्या गोष्टींचा विचार केला म्हणजे गांधी यांजबद्दल कोणालाहि आदर वाटावा, यांत नवल नाहीं. स्वकार्यसिद्धीसाठीं ज्यांनीं देहहि सांडले, त्याच पुरुषांच्या हाडामांसांतून गांधी यांची मूर्ति निर्माण झाली आहे, यात संशय नाहीं.

राजकारणी बाबतींत आपल्या मताला गांधी पक्के चिकटून बसत असले तरी धर्मांच्या बाबींत ते असे हट्टी नाहींत. ते स्वतःस हिंदु म्हणवितात; तथापि त्यांची हिंदुत्वाची व्याख्या अत्यंत विस्तृत आहे, आणि कित्येक बाबींत ख्रिस्ती आणि मुसलमानी धर्ममतांसही ते मान देतात; किंबहुना, मुसलमानी धर्माबद्दल त्यांच्या चित्तांत अत्यंत आदर असल्यामुळेंच खिलाफत प्रकरणांत त्यांनीं इतका पुढाकार घेतला, आणि त्यांच्यामुळेंच या प्रश्नाला इतकें गंभीर स्वरूप प्राप्त झालें आहे. टॉलस्टॉय आणि रस्किन यांचीं मतें त्यांना पटलीं आहेत. ख्रिस्ताबद्दल गांधी यांच्या मनांत पूर्ण आदरभाव असून गीतावचनांप्रमाणेंच बायबलांतील वचनेंही त्यांच्या संभाषणांत पुष्कळ वेळां येत असतात. पॉलप्रेषितानें गाइलेल्या प्रेम-महतीच्या पोटीं स्वतःचीं तत्वें गांधी यांस दिसतात. आणि ज्या क्षेत्रावर येशूला सुळीं दिलें तें क्षेत्र आत्मयज्ञाचें श्रेष्ठ निदर्शक या नात्यानें त्यांना अत्यंत पवित्र वाटतें. ख्रिस्ती धर्मशास्त्राशीं गांधी यांचा दृढ परिचय आहे ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. मनःपूर्वकता हा गांधी यांचा विशेष गुण असल्यामुळें त्याच्या साहचर्यानें राहाणारें धैर्यही त्यांजपाशीं पुरें आहे शत्रु अथवा मित्र यांपैकीं कोणाचीही भीति ते बाळगीत नाहींत. आपलीं मतें इतक्या उघडपणें ते बोलून दाखवितात कीं श्रोत्याला त्यांचें खरोखर कौतुकच वाटतें. मनमोकळेपणा हा हिंदी लोकांचा स्वभावधर्म नाहीं. सत्य कटु असलें तर तें स्पष्टपणें ते बोलून दाखवावयाचे नाहींत. आपल्या मनांत काय आहे याचा थांग हिंदी लोक सहसा लागूं द्यावयाचे नाहींत. या बाबींत गांधी मात्र सर्वांहून वेगळे आहेत. त्यांच्या चित्ताला आड पडदा ठाऊक नाहीं. आपलीं मतें बोलून दाखवितांना श्रोत्याला त्यांबद्दल विषाद वाटेल कीं आनंद होईल याचा विचार ते करीत नाहींत. दृढ निश्चय हा गांधींचा आणखी एक मोठा गुण आहे. तथापि दृढनिश्चयाला पुष्कळवेळां हठवादीपणाचें स्वरूप येत असल्यामुळें गांधी यांच्या निश्चयाला पुष्कळ वेळां मोठें भयंकर स्वरूप प्राप्त होत असतें हेंही कबूल करणें भाग आहे. अमुक गोष्ट करावयाची असा निश्चय त्यांनीं एकवार केला कीं त्या गोष्टीचा कडेलोट होईपर्यंत मध्यें कोठेंच ते मुक्काम करावयाचे नाहींत. उदाहरणादाखल पंजाबाकडे बोट दाखवितां येईल. 'निष्क्रिय प्रतिकार' अमलांत आण-

ण्यास त्यांनीं सुरवात करतांच पंजाबांत लोकक्षोभाची लाट उसळली. लोक-क्षोभ व्हावा असा त्यांचा हेतु नव्हता; तथापि त्यांचा निष्क्रिय प्रतिकार अंशतः तरी या अनर्थास कारण झाला, आणि या स्फोटामुळेंच वेताळाचें साम्राज्य पंजाबांत सुरू झालें.

गांधी हट्टवादी असले तरी तडजोडीचें महत्त्व त्यांस समजत नाहीं असें नाहीं. कोणत्या ठिकाणीं तडजोड केली असतां आपला मार्ग सुकर होईल हें समजण्याइतकी दूरदृष्टि आणि इतकें व्यवहारज्ञानही गांधी यांस आहे. बावन वर्षांच्या वयांत गांधी यांनीं जितक्या गोष्टींस हात घातला आणि त्यांपैकीं जितक्यांत त्यांनीं यश मिळविलें तितकें यश पदरीं पाडून घेण्याचें भाग्य सामान्य व्यवहारी राजकारणी पुरुषांपैकीं क्वचित् कोणाच्या वांट्यास आलें असेल. दक्षिणआफ्रिकेंतील त्यांच्या कार्याचें परीक्षण कितीही कसून कोणी केलें तरी त्यांत नांव ठेवण्यास त्याला जागा आढळावयाची नाहीं. या कार्याची माहिती जो कोणी करून घेईल त्याला गांधी यांची सावधान बुद्धि आणि त्यांची देशभक्ति या गुणांबद्दल मोठ्या कष्टानें कां होईना, त्यांची तारीफ करावी लागेल.

दक्षिण आफ्रिकेंतून गांधी हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांचा तारुण्याचा काल संपून उतारवयांत त्यांनीं प्रवेश केला होता. हिंदुस्थानांत येतांच तेथील राजकारणांत लक्ष्य घालून तें कार्य मोठ्या उत्साहानें त्यांनीं हातीं घेतलें. आतां गोखल्यांच्या पाठीमागें त्यांची जागा गांधी महत्त्व काढतील असें पुष्कळांस वाटलें. आरंभीं सामाजिक आणि सांपत्तिक परिस्थितीचा प्रश्न गांधी यांनीं हातीं घेतला. चंपारण्य आणि खेडा या दोन जिल्ह्यांत उत्पन्न झालेला तीव्र असंतोष कमी करण्याकरितां त्यांनीं खटपट केली व मजूरवर्गाच्या अडचणी कमी करण्याच्या कामीं आपली योग्यता या वेळीं त्यांनीं चांगल्याच प्रकारें सिद्ध केली. घरबसल्या होण्यासारखे लहान लहान उद्योग धंदे त्यांनीं सुरू केले. विशेषतः सूत कांतणें आणि हातमाग यांचा प्रसार जारीनें व्हावा यासाठीं त्यांनीं फार खटपट केली. याबरोबरच लोकांत स्वाभिमानाची जागृति व्हावी यासाठींही त्यांनीं कसून मेहनत घेतली. स्त्रीशिक्षण आणि विशेषतः राष्ट्रीय शिक्षण या बाबीही त्यांच्या धोरणांतून सुटल्या नव्हत्या. मुलांचें शिक्षण पाश्चात्य वळणावर न जातां त्याला राष्ट्रीय वळण मिळालें पाहिजे असें त्यांचें मत आहे. राजकारणाच्या गुंतागुंतींत लक्ष्य घालण्याची इच्छा गांधी यांस आरंभीं फारशी असेल असें वाटत नाहीं. तथापि त्यांची जाज्वल्य देशभक्ति त्यांना स्वस्थ बसूं देईना. यामुळें या बाबींत-

ही लक्ष्य देणें त्यांना भाग पडलें, आणि सांप्रत राजकीय चळवळींत त्यांना अग्र-पूजेचा अधिकार प्राप्त झाला आहे. हिंदुस्थानांतील राष्ट्रीय पक्षाचें अध्वर्युत्व त्यांजकडे असून असहकारितेच्या चळवळीचे ते आद्यजनक आहेत. स्पष्ट भाषेंत बोलावयाचें म्हणजे ही असहकारितेची चळवळ म्हणजे बहिष्कारच होय. चालू शासनपद्धतीनें राज्याचा गाडा हांकणें अशक्य करावयाचें हा या चळवळीचा स्पष्ट हेतु आहे. चालू पद्धति निकामी करणें हाच स्वराज्यसंपादनाचा मार्ग होय. आरंभीं या चळवळीचें उद्दिष्ट दोनच हेतूपुरतें होतें. पंजाबप्रकरणीं झालेल्या अन्यायाचें निराकरण आणि तुर्की तह एवढ्या दोनच गोष्टी गांधी यांस साधावयाच्या होत्या; पण कालांतरानें या अल्प हेतूंचा समावेश एकाच मोठ्या हेतूच्या पोटीं करण्यांत आला. हा मोठा हेतु म्हणजे स्वराज्यसंपादन हाच होय.

आज हिंदुस्थानांत असहकारयोग इतका बळावला आहे याचें कारण गांधी यांजसारख्या सामर्थ्यवान् पुरुषाचें पाठबळ त्याला आहे हें एकच नसून याशिवाय दुसऱ्याही अनेक कारणांनीं तो जोरावला आहे. (१) रौलट कायदा.—देशांतून राजद्रोहाचें उच्चाटन लवकर आणि समूळ करावें या उद्देशानें हा कायदा अस्तित्वांत आला. पण सुशिक्षित लोकमत या कायद्याविरुद्ध अत्यंत अट्टाहासानें ओरड करीत असतांही तो पसार करण्यांत आला. (२) तुर्की तह.—यांतील अटी तुर्की सुलतान आणि तुर्की साम्राज्य या दोहोंस अपायकारक आहेत आणि त्या अन्याय्य आहेत असा समज झाल्यामुळें हिंदुस्थानांतील मुसलमान प्रजा बेदिल झाली. (३) पंजाब प्रकरण.—इ. स. १९१९ सालच्या एप्रिल महिन्यांत पंजाबांत अत्यंत शोचनीय प्रकार घडून आला. विशेष आणीबाणीच्या प्रसंगीं शांतता प्रस्थापित करण्यासाठीं लष्करी कायद्याचा उपयोग कदाचित् चांगला होत असेल, पण पंजाबांत त्याचा खरा उपयोग काय झाला हें सांगतां येणें कठिण आहे. पंजाबांत होऊं घातलेलें बंड त्यामुळें मुळांतच उपटलें गेलें, असें त्या कायद्याचे जनक म्हणतात. पण तें खरें असलें तरी पंजाबी लोकांत तीव्र असंतोष पसरून त्यांच्या हृदयावर झालेला व्रण अद्यापि मागें राहिला आहे. (४) दक्षिण आफ्रिका आणि साम्राज्यांतील इतर भाग यांत हिंदी वसाहतवाल्यांची परिस्थिति.—हिंदी राष्ट्रपुरुषांत आतां चैतन्य वावरूं लागलें आहे. हिंदी लोकांचा स्वाभिमान आतां जागृत झाल्यामुळें त्यांजवर वसाहतींत वसणारा हीनत्वाचा शिक्का त्यांना असह्य होऊं लागला आहे. (५) युद्धकालीन परिस्थितीमुळें उत्पन्न झालेल्या

सांपत्तिक घडामोडी.—आर्थिक घोंटाळ्यांचे परिणाम सामान्य जनतेपर्यंत पोंहोंचले असून त्यांचें निराकरण करण्यास सरकार असमर्थ आहे असें सर्वांस वाटूं लागलें आहे. (६) शेतकरी आणि मजूर वर्ग यांतील असंतोष.—या दोन वर्गांत असंतोषाचीं कारणें वारंवार उत्पन्न होतात आणि तीं खरीं असल्यामुळें तीं राजकीय चळवळींच्या पथ्यावर पडून त्यांचा उपयोग ते सहज रीतीनें करून घेतात. (७) सामान्यपणें चालू परिस्थितीविरुद्ध जगांत पसरलेला असंतोष.—चालू स्थितीसंबंधीं तीव्र असंतोष सार्‍या जगभर पसरला आहे. आणि हिंदुस्थान देशही त्याच लाटेंत सांपडला असून तिच्या गर्जनेचे ध्वनि आणि प्रतिध्वनि सर्वत्र उमटत आहेत.

या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे गांधी यांजसारख्या लोकहितासाठीं तळमळणाऱ्या पुरुषाच्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्ता नालायक कां ठरते हें समजण्यासारखें आहे. स्वराज्य कितीही वाईट झालें तरी सांप्रतच्या ब्रिटिश राज्याहून तें अधिक वाईट होणें शक्य नाहीं असें ते म्हणतात. त्यांचें मत चुकीचें असलें तरी लोकांना तें चुकीचें वाटत नाहीं. यामुळें त्याच्या फोलपणाचा इष्ट परिणाम लोकांच्या मनावर होत नाहीं. गांधी यांस आतां स्वराज्य पाहिजे आणि तें मिळविण्यासाठीं लोक आतां तडफडूं लागले आहेत. साम्राज्यांतर्गत स्वराज्य हें ध्येय सुशिक्षित वर्गानें आजपर्यंत पुढें ठेवलें होतें, पण त्याऐवजीं आतां 'कायदेशीर आणि शांततेच्या सर्व उपायांनीं स्वराज्य मिळविणें' हें त्यांचें ध्येय झालें. 'साम्राज्यांतर्गत' हे पूर्वीचे शब्द आतां वजा झाले आहेत. साम्राज्यांतून हिंदुस्थान देश फुटून वेगळा होण्याचा संभव आतां उत्पन्न झाला आहे हें आतां ध्यानीं घेणें भाग आहे. आणि अखेरचें ध्येय सिद्ध होईपर्यंत जो काळ जाईल त्यांत हिंदुस्थान हें एक प्रचंड आयर्लंड बनून जाण्याचा संभव आहे.

पण हा असहकारयोग सद्यःफलदायी होणार नाहीं असें माझें मत आहे; आणि हें माझें मत दोन कारणांमुळें बनलें आहे. एक कारण असें कीं हा मार्ग मानवी स्वभावाविरुद्ध आहे. वकिलांनीं वकिली सोडावी, व्यापाऱ्यांनीं हिंदी मालाशिवाय इतर परक्या मालाला हात लावूं नये, पुढाऱ्यांनीं कौंसिलांत शिरूं नये, पदवीवाल्यांनीं पदव्या सोडल्या, विद्यार्थ्यांनीं सरकारी शाळा सोडाव्या आणि प्रजाजनांचें कार्यही स्वराज्यप्राप्तीपर्यंत तहकूब व्हावें अशा प्रकारचा हा कार्यक्रम आहे. हा कार्यक्रम उच्च दर्जाचा आहे हें खरें, पण सामान्य हिंदी जनतेला न झेपेल असें ओझें तिच्या शिरावर त्यानें ठेवलें आहे. आजची हिंदी समाजाची

परिस्थिति अजमावतो या गोष्टी त्यांच्या हातून पार पडतील असें दिसत नाहीं. दुसरें असें कीं एवढा प्रचंड आणि अस्वाभाविक कार्यक्रम पार पाडण्याची खटपट हिंदी जनतेनें करावी इतकी कोणती मोठी निकड तिच्यामागें काय आहे? हिंदुस्थानांत शेतकरी वर्ग हाच समाजाचा अत्यंत महत्त्वाचा घटक आहे. खरी राजकीय सत्ता अखेरीस याच वर्गाच्या हातीं जावयाची आहे; आणि हा वर्ग या बाबींत अद्यापि उदासीन आहे. चालू जीवनक्रम सोडून स्वराज्यप्राप्तीच्या मागे कां लागावें याचें रहस्य त्याला अद्यापि समजलेलें नाहीं; आणि स्वराज्याची प्राप्ति आजच होणें अवश्य आहे असेंही त्याला अद्यापि पटलेलें नाहीं.

पण असहकारयोग अखेरीस यशस्वी झाला नाहीं तरी व्यक्तिशः गांधींचें नांव चिरस्मरणीय होऊन राहील यांत संशय नाहीं. कारण हिंदी राष्ट्रपुरुषाचें आत्मरूप गांधी यांच्या ठिकाणीं स्पष्ट दशेला आलें आहे. त्यांचे मार्ग पूर्ण कसोटीला न उतरले तरी त्यामुळें त्यांना स्वतःला कमीपणा येतो असें नाहीं. असो. जातां जातां गांधी यांजबद्दल आम्हांस एवढेंच सांगावयाचें कीं त्यांनीं सांप्रत जी चळवळ चालविली आहे, ती इंग्लंडच्या द्वेषामुळें नसून स्वभूमीच्या प्रेमामुळें आहे. अमुक एक मनुष्य अमुक जातीचा म्हणून त्याचा द्वेष गांधी कधींच करीत नाहींत. या बाबींत गांधी यांची वर्तणूक खरोखर असामान्य आहे. जर्मनीशीं इंग्लंडचें युद्ध सुरू झालें तेव्हां गांधी यांनीं कायावाचामनानें इंग्लंडला मदत केली. त्याचप्रमाणें बोअर युद्धांतहि त्यांनीं ब्रिटिश सरकारला फार मदत केली. परलोकवासी लॉर्ड रॉबर्टस् हे त्यांच्या सेही वर्गापैकींच एक होते. आतां लॉर्ड रेडिंग यांचीहि गणना त्याच वर्गांत होईल, असें आम्हास वाटतें. 'हिंदुस्थानचीं स्वतंत्र संस्थानें' भविष्यत्काळीं अस्तित्वांत येतील तेव्हां गांधी यांचें कार्य आणि त्यांची दानत आणि ब्रिटिश मुत्सद्देगिरी या दोहोंच्या मिलाफानें हें कार्य निर्माण झालें, असा अभिप्राय इतिहास प्रकट करील, असें आमचें मत आहे.

ग्लासगो हेरल्ड.

---

८

लंडनच्या व्हाईट हालमध्यें असलेले इंडिया ऑफिसांतील कित्येक सरकारी कामगार, हिंदुस्थानांतील शेंकडों इंग्रज नोकर आणि लंडन, मुंबई आणि कलकत्ता, येथील हजारों व्यापारी महात्मा गांधी यांस ओळखतात आणि त्यांची भीतीहि त्यांना वाटते. शेंकडों क्रांतिकारक चळवळे अथवा बोलशेविक यांजपेक्षां

प्रकरणामुळें बहुधा सान्या राष्ट्राचें मन दुःखमग्न होऊन गेल्यामुळेंच या कार्य-क्रमाचा स्वीकार त्यानें केला, असें लंडन टाइम्सच्या हिंदुस्थानांतील बातमी-दाराचें मत आहे. पण समर्थ यांचें मत याहून वेगळें आहे. त्यांच्या मतें रौलाट कायदा पास झाल्यावरोबरच हिंदी राष्ट्रपुरुषाची मनोभूमिका अशा प्रकारच्या कार्यक्रमाला अनुकूल झाली होती. सारें लोकमत या कायद्याविरुद्ध खवळून उठलें असतांहि हिंदी सरकारानें तें मत पायाखालीं तुडवून हा कायदा पास केला. आपल्या मताची अशा प्रकारें अवहेलना झाली, हें पाहून हिंदी राष्ट्राचें मन उद्विग्न झालें. अशा स्थितींत पंजाबांतील प्रकार घडून आला असता अथवा नसता तरी गांधी यांच्या कार्यक्रमावर त्याचा परिणाम मुळीच झाला नसता, असें राजश्री समर्थ यांचें म्हणणें आहे.

यानंतर खिलाफत प्रकरण उपस्थित झालें. संयुक्त राष्ट्रांनीं तुर्की साम्राज्याशीं केलेलें वर्तन हिंदी मुसल्मानांना न पटून इंग्रजांविरुद्ध त्यांचीहि मनें कलुषित झालीं. यामुळें हाहि मोठा वर्ग गांधी यांच्या पचनीं पडला. गांधी यांची चळवळ 'न भूतो न भविष्यति' अशा रीतीनें सान्या हिंदुस्थानांत वणव्याप्रमाणें कां पसरली, याचीं कारणें या माहितीवरून लक्षांत येतील. तुर्की तहाच्या प्रसंगीं हिंदी मुसलमानांचें मत मोठ्या अट्टाहासानें आपण संयुक्त राष्ट्रांपुढें मांडलें असें हिंदी सरकारानें कानीं कपाळीं ओरडून सांगितलें, तथापि मुसलमानांची खात्री पटेना. आपल्या धर्मांत आणि सुलतानाच्या गादीच्या व खलीफाच्या हक्कांत ब्रिटिश सरकार ढवळाढवळ करीत आहे, असें हिंदी मुसल्मानांस अद्यापीहि वाटतें.

गांधी याजसंबंधीं मेदान पत्रांत एक लेख प्रसिद्ध झाला आहे, त्यांत तो लेखक म्हणतो, "गांधी हे अत्यंत साधे गृहस्थ असून केवळ हातानें तयार झालेला कपडा वापरतात. त्यांचें अन्नहि अगदीं जाडयाभरडया प्रतीचें असतें."

[1] "या जन्मीं नाहीं, तरी पुढच्या जन्मीं तरी सुखाची प्राप्ती तुम्हांला होईल, असें गांधी आपल्या देशबांधवांस म्हणत नाहींत. ऐहिकाचा त्याग करून पार-लौकिक मार्ग मोकळा करण्यास सांगणारा मोहेंजचा धर्म गांधी यांस मान्य नाहीं. याच क्षणीं आणि यांच लोकीं दुःखमुक्त व्हा, असा उपदेश आपल्या अनुयायांस ते करतात. पाश्चात्य संस्कृतीची, सुधारणांची अथवा संपत्तीची आवड गांधी यांस मुळींच नाहीं. त्यांच्या चित्ताला या वस्तूंचा मोह शिवलेलासुद्धां नाहीं."

"जुन्याचें पुनरुज्जीवन हें गांधी यांच्या मतांचें थोडक्यांत सार आहे. हिंदुस्थानच्या गतवैभवाचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें आहे. हिंदुस्थानची पूर्वपरंपरा, संस्कृति अथवा तत्वज्ञान यांत अशी कोणती उणीव आहे कीं जी पाश्चात्य वस्तूंनीं भरून निघेल. ज्या समाजरचनेंतून साधुसंतांच्या, तत्वज्ञांच्या आणि वीर पुरुषांच्या पंक्तीच्यापंक्ती बाहेर निघाल्या, ती सारी समाजरचना पाश्चात्य वस्तूंच्या संकरानें तुम्ही भ्रष्ट करणार की काय, असा प्रश्न गांधी आपल्या अनुयायांस करतात. अर्वाचीन संस्कृतीच्या अभावामुळें नव्हे तर आपली प्राचीन परंपरा आणि आपलें प्राचीन श्रुतिज्ञान यांपासून हिंदी राष्ट्र पराङ्मुख झाल्यामुळेंच सांप्रतच्या अवनत स्थितीस तें प्राप्त झालें आहे, असें गांधी याचें म्हणणें आहे."

"गांधी यांचें वजन हिंदी जनतेवर इतकें पडतें याचें मुख्य कारण हेंच आहे. मध्ययुगीन काळांत सामान्य युरोपीय जनता ज्याप्रमाणें धर्मसुधारणेच्या आणि समाजसुधारणेच्या विरुद्ध होती, त्याचप्रमाणें हिंदी जनताहि आजच्या काळीं या सुधारणांविरुद्ध आहे."

"धर्म हें गांधी यांचें सर्वस्व आहे. त्यांचें राजकारण झालें तरी तेंहि धर्माच्या ओघानें चालतें. किंबहुना धर्मरक्षणासाठींच ते राजकारणांत पडले आहेत. यूरोपांतील मुत्सद्यांनीं धर्म आणि राजकारण या वस्तू ज्याप्रमाणें परस्परांपासून पूर्ण विभक्त केल्या आहेत, तसें गांधी यांनीं केलेलें नाहीं. या बाबतींत यूरोपीय मुत्सद्यांचा अनुभव गांधी यांस अद्यापि यावयाचा आहे."

गांधीं यांचीं मतें अग्राह्य मानणारा जो एक पक्ष हिंदुस्थानांत आहे, त्यालाहि हें धर्म आणि राजकारणाचें मिश्रण पसंत नाहीं. हिंदुस्थान आतां बऱ्याच अंशानें पाश्चात्य वळणावर गेला असून पाश्चात्य संस्कृतीची छाया त्याजवर पूर्णपणें पडली आहे; आणि आतां येथून मागें पाऊल घेण्यांत आपली पीछेहाट होईल असें या पक्षास वाटतें. पाश्चात्य सुधारणांचा मोह या पक्षावर बराच पडला असल्यामुळें गांधी यांचीं वेदकालीन मतें त्याच्या पसंतीस उतरत नाहींत यांत नवल नाहीं.

ब्रिटिश सरकारला अनेक प्रकारचीं कोडीं उलगडण्याचे प्रसंग आजवर आले आहेत आणि नानाप्रकारच्या शत्रूंशीहि त्याला झुंजावें लागलें आहे. आयर्लंडचा पुढारी डी व्हॅलेरा हा कांहीं कमी प्रतीचा शत्रू नव्हे. तथापि त्याच्या शस्त्रास्त्रांत कांहीं नवीनपणा अथवा अपूर्वता नाहीं. सेनापति स्मट्स् आणि बोथा हेहि मोठे चिवट शत्रू होते. वीस वर्षांपूर्वी ब्रिटिश साम्राज्याला यांनीं सळो का पळो केलें होतें; पण त्यांचे मार्गहि जुनेपुराणेच होते. लेनीन आणि ट्रोस्की यांनीं कांहीं

हा एकच गृहस्थ हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्ता डळमळीत करील, असें त्यांस वाटतें.

हा गांधी आहे तरी कोण, या गृहस्थाची माहिती ऐशियाटिक रिव्ह्यु नांवाच्या मासिकाच्या आक्टोबरच्या अंकांत राजश्री समर्थ यांनीं पुढीलप्रमाणें दिली आहे. समर्थ हे एक नाणावलेले वकील असून हिंदुस्थानांतील नेमस्त पक्षाचे एक प्रमुख पुढारीहि आहेत. समर्थ म्हणतात---

" हिंदी राजकारणांत जहाल या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या पक्षासंबंधीं सामान्यतः जो समज सर्वत्र आहे, त्याच्या अनुरोधानें पाहतां गांधी हे जहाल आहेत, असें म्हणवत नाहीं. जहाल पक्ष म्हणजे क्रोधानें खवळलेला देशाभिमान्यांच्या पक्ष होय. या पक्षाचें मस्तक तप्त असल्यामुळें शांतपणाचा अभाव त्याच्या कृतींत असणार हें उघड आहे.

उलट पक्षीं गांधी हे अत्यंत शांतवृत्तीचे गृहस्थ आहेत. ते इतके शांत आहेत कीं त्यांच्या शांतीला सीमा नाहीं. गांधी हें कल्पनासाम्राज्यांत दंग होऊन राहणारे गृहस्थ आहेत. जड शक्तीवर आध्यात्मिक शक्तीनें मात करतां येईल, या कल्पनेवर त्यांचा अढळ विश्वास आहे. दंडनीतीच्या आधारावर चालणारें सरकार कितीहि निष्ठुर आणि कितीहि ताठर असलें, तरी त्याला आपल्या आत्मिक शक्तीनें आपल्या पुढें गुडघे टेकावयास लावूं, अशी गांधी यांच्या चित्ताची खात्री आहे."

गांधी सध्यां अतुल सामर्थ्यवान् पुरुष होऊन बसले आहेत. ध्येयाची शुद्धता आणि पूर्ण मनःपूर्वकता हे दोन गुण या सामर्थ्याच्या मुळाशीं आहेत. आपण तोंडानें जें बोललों, तें प्रत्यक्ष कृतींत वठविण्यास लागणारें धैर्य आणि निश्चय हे गुण गांधींच्या ठिकाणीं आहेत. कसलेंहि संकट प्राप्त झालें, तरी या कार्यांत त्यांचा निश्चय एका केंसाइतकाहि ढळावयाचा नाहीं.

हिंदुस्थानासंबंधीं जे अनेक लेख इंग्लंडांत प्रसिद्ध होतात, त्या बहुतेकांत गांधी यांचें नांव तुम्हांस अवश्य आढळून येईल. या बहुतेक लेखांत हिंदी सरकारच्याच मतांचें प्रतिपादन केलेलें असतें. यांतील विचारसरणी कमीअधिक प्रमाणानें सरकारी बाजूची असते; तथापि नीतिदृष्ट्या गांधी यांजबद्दल एकहि आक्षेप घेतल्याचें अथवा एकाद्या क्षुल्लक लोभाला गांधी बळी पडले, असें कोणी म्हणत असल्याचें तुम्हास आढळून यावयाचें नाहीं. स्वतःच्या नांवाची टिमकी वाजविण्याकरतां अथवा कांहीं आर्थिक लाभाच्या हेतूनें ही चळवळ गांधी

करीत आहेत, असें त्यांचे शत्रूहि म्हणावयाचे नाहीत. महात्मा गांधी हे वशीकरणाच्या प्रांताबाहेरचे गृहस्थ आहेत. वाटेल तें मोल तुम्हीं दिलें तरी तुम्हाला त्यांना विकत घेतां येणार नाहीं.

या अद्वितीय गृहस्थाच्या ठिकाणीं मोठ्या मुत्सद्याचें शहाणपण, सामान्य राजकारणी पुरुषाची चतुराई आणि अगदीं भिकारड्या शेतकऱ्याचा साधेपणा, हे गुण एकवटले आहेत. ते अजातशत्रु आहेत. त्यांचे देशबांधव त्यांना देवताप्रमाणें पूज्य मानतात; पुष्कळ लोक त्यांना भितात, पण त्यांचा द्वेष कोणीहि करीत नाहीं. कलकत्त्याच्या राष्ट्रीय महासभेंत गांधी यांचा असहकारयोगाचा जो कार्यक्रम बहुमतानें पसार झाला, त्या एवढा विस्तृत प्रमाणाचा बहिष्कार जगाच्या इतिहासांत दुसऱ्या कोठेंहि तुम्हास आढळावयाचा नाहीं.

वकिलांनीं न्यायकचेऱ्या सोडाव्या आणि सामान्य जनतेनें परदेशी मालावर बहिष्कार घालावा, त्याचप्रमाणें मुलांमुलींनीं शाळा व कॉलेजें सोडावीं, आणि पुढाऱ्यांनीं कौन्सिलांचा त्याग करावा, असा ठराव महात्माजींनीं पास करून घेतला. हिंदुस्थानांतील असंतोष दूर व्हावा म्हणून कौन्सिलांची सुधारणा ब्रिटिश सरकारांनीं नुकतीच केली होती; पण या सुधारलेल्या कौन्सिलांतहि कोणीं शिरूं नये असें गांधी यांनीं ठरविलें.

अशा प्रकारच्या सर्व व्यापी बहिष्काराला हिंदी सरकार भितें, यांत नवल नाहीं. हिंदुस्थानांतील इंग्लंडच्या सत्तेला हें महाभयाचें स्थान आहे, यांत शंका नाहीं. तथापि या बहिष्काराच्या कार्यक्रमांत गांधी यांनीं दंडनीतीला कोठेंहि स्थान दिलेलें नाहीं. दंडाचा आश्रय आपल्या अनुयायांनीं केव्हांहि करूं नये असा उपदेश मोठ्या कळवळ्यानें गांधी करीत असतात. प्रचंड अट्टाहासानें तुम्ही स्तब्ध बसून रहा, असा त्यांचा उपदेश आहे; आणि क्रांतीकारकांच्या प्रचंड दंडेमार्गापेक्षांहि हा मार्ग दमन करण्यास कठिण आहे, हें उघड आहे, दंडादंडीच्या प्रसंगीं परपक्षापेक्षां अधिक मोठ्या दंडेलीचा आश्रय कोणालाहि करतां येईल; पण निःशस्त्र प्रतिपक्षाच्या निष्क्रिय प्रतिकाराला तोंड कसें द्यावयाचें, हा मोठाच प्रश्न आहे.

पंजाबांत घडलेल्या भयंकर गोष्टीची आठवण ताजी असतां हा आपला असहकारितेचा कार्यक्रम हिंदी राष्ट्रीय सभेपुढें गांधी यांनीं मांडला. पंजाबांत घडलेला प्रकार त्या वेळीं न घडता तर गांधी यांच्या कार्यक्रमाला राष्ट्राच्या बहुतेक प्रतिनिधींचें पाठबळ मिळतें कीं नाहीं, याची शंकाच आहे; पण पंजाब

नव्या हालचाली प्रचारांत आणल्या हें खरें; तथापि सामान्य युद्धकला नवी नाहीं. सारे मुख्य डाव जुनेच आहेत. महात्मा गांधी हे या सार्‍यांहून वेगळे आहेत. यांची पद्धति आमूलाग्र नवी आहे. हिंदी राष्ट्राच्या कल्याणासाठीं अगदीं नवी युद्धपद्धति त्यांनीं अस्तित्वांत आणली. या पद्धतींत पाश्चात्य हालचालींचा वासहि नाहीं. लेनीन आणि डी व्हॅलेरा यांच्या उलट बाजूंच्या टोंकास गांधी अधिष्ठित झाले आहेत. गांधी यांचें कोडें आपणास अगम्य होऊन बसलें आहे, ही गोष्ट ब्रिटिश लोक प्रांजलपणें कबूल करतात.

आर्थर ड्रेप.

---

९

कॉंग्रेसमध्यें मध्यवर्ती आणि अधिष्ठात्री देवता म्हटलें, तर महात्मा गांधी हेच होत. ज्यांच्याबद्दल त्यांच्या शत्रूंनाहि नांवें ठेवण्यास जागा सांपडत नाहीं, असे हे गृहस्थ आहेत तरी कोण? त्यांची मनःपूर्वकता, त्यांचें विशाल नीतिधैर्य आणि त्यांची तीव्र धर्मपरायणता या गुणत्रयाबद्दल त्यांचे कट्टे शत्रूहि त्यांचीं स्तोत्रें गात असतात. आतां यालाहि अगदींच अपवाद नाहींत, असें नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटांतील कांहीं विशिष्ट सभासद 'या गांधीला फांशी द्या' म्हणून ओरड करीत असतात; पण पूर्वग्रहांनीं त्यांची विवेकबुद्धि इतकी अभ्राच्छादित झाली असते कीं खरें काईट ओळखण्याचें यत्किंचितहि सामर्थ्य तिला नसतें. एकादा अत्यंत कर्मठ आपलेंच तें खरें म्हणून घेऊन बसला, म्हणजे त्याची स्थिति जशी आपणास करुणास्पद वाटते, त्याचप्रमाणें हे हेकट सभासद केवळ करुणास्पद मात्र होत. सर व्हॅलेंटाइन चिरोल यांच्यासारख्या कट्या साम्राज्य-वाद्यालाहि गांधींच्या ठिकाणीं तीव्र धर्मपरायणता दिसून आली. गांधी यांची बुद्धि बेताल झाली आहे, असें म्हणत असतांहि ते पूर्ण नीतिमान आणि धैर्य-शाली आहेत, अशी कबुली चिरोल यांनें दिली आहे. महात्माजी भ्रमिष्ट आहेत असें म्हणणारेहि कांहीं लोक आहेत; तथापि त्यांचा भ्रमिष्टपणाहि सदाचार पोषक आहे, असेंहि तेच म्हणतात. जग सांप्रत इतकें उलटें झालें आहे कीं खरें आणि काईट या वस्तूहि ओळखतां येईनातशा झाल्या आहेत. सदाचार आणि प्रामा-णिकपणा यांचें भ्रमिष्टपणाशीं इतकें सान्निध्य आहे कीं जगाच्या सांप्रतच्या विप-रीत अवस्थेंत त्यांतील भेद कळेनासा झाला आहे. शुद्ध मायावी बाजारांत गाल्याच वस्तूंचें मोल मायावी झालें म्हणजे गल्याची किंमत तरी तेथें कशी

कळणार ? जेथें खोटें सिंहासनावर बसतें, आणि खरें सुळीं जातें, तेथें माणसांची आणि त्यांच्या कृतींची खरी किंमत होईल ही आशा धरणेंच फुकट होय. तथापि गांधी यांच्याशीं ज्यांची प्रत्यक्ष मुलाखत झाली असेल, त्यांच्याशीं चार शब्द बोलण्याची संधी मिळाली असेल, लहानशा खाजगी बैठकींत अथवा हजारों लोकांच्या प्रचंड मेळ्यांतहि सामान्य जनावर त्यांची छाप कशी असते, हें ज्यानें प्रत्यक्ष पाहिलें असेल, त्याला गांधींच्या अत्युच सामर्थ्याबद्दल खात्री पटल्यावांचून राहिली नसेल. गांधी वेडे आहेत, असें म्हणावयाचें असेल, तर खुशाल म्हणा, तथापि त्या वाळून कोळ झालेल्या देहांत विलक्षण सामर्थ्याचा वास आहे, हें तुम्हास नाकबूल करतां यावयाचें नाहीं. गांधी चार शब्द बोलले म्हणजे हजारों लोकांवर जी छाप पडते, ती मोठ्या वक्त्यालाहि पाडतां यावयाची नाहीं. त्यांच्याशीं खाजगी बैठकींत बसण्याचा प्रसंग आम्हांला आला होता आणि त्यांच्या पादरजांना स्पर्श करण्याची इच्छा करणाऱ्या हजारों लोकांच्या समुदायांतहि आम्हीं त्यांस पाहिलें. आणि या दोन्हीहि प्रसंगीं त्यांच्या सामर्थ्याची एकरूपता आमच्या प्रत्ययास आली. अत्यंत व्यवस्थित आणि सुसंघटित अशा राजकारणी संस्थांनीं केवढयाहि अट्टाहासानें निकराचे हल्ले गांधी यांजवर केले, तरी त्यांच्या तटबंदीचा एक खडाहि उखडावयाचा नाहीं, असें सामर्थ्य त्यांच्या त्या दुबळ्या देहांत आहे. जगांतील कोणाहि पुढाऱ्यामागें एवढा प्रचंड अनुयायी वर्ग नसेल. यांच्या अनुयायांत नुसते निशाणी नांगर अक्षरशत्रू आहेत, असेंहि नाहीं. हिंदुस्थानांतील प्रसिद्ध विद्वान पुरुषहि त्यांच्या नेतृत्वाखालीं त्यांच्या भोंवतीं गोळा झाले आहेत. हे बुद्धिमंत पुरुषहि गांधी यांस 'महात्मा' या नांवानेंच संबोधितात. शुद्ध दानतीमुळें जो खरा अधिकार प्राप्त होत असतो, आणि ज्यापुढें साऱ्यांनाच मान वांकवावी लागते, तो अधिकार गांधी यांना प्राप्त झाला आहे, ही गोष्ट मोठमोठया सरकारी अधिकाऱ्यांनाहि पटली आहे. पश्चिमेनें लेनीनला जन्म दिला. याच्या ठिकाणीं सामर्थ्य आहे, अकुतोभयता आहे, शुद्ध तर्कशास्त्र आहे, आणि पूर्ण दृढ निश्चयहि याच्या ठिकाणीं आहे. पूर्वेच्या उदरीं जन्मलेल्या गांधीच्या ठिकाणींहि हेच गुण तितक्याच प्रमाणानें आहेत; पण लेनीनचा दृढ विश्वास पाशवी शक्तीवर आहे आणि गांधी हे निष्क्रिय प्रतिकाराचे भक्त आहेत. लेनीनला तरवारीचा जितका भरंवसा वाटतो, तितकाच गांधी यांना चैतन्यशक्तीचा वाटतो. आज सत्या जगभर पाहिलें तर दोन शक्ती परस्परांशीं युद्ध करीत आहेत, असें आपणास आढळून येईल. या दोन शक्ती परस्परांपासून भिन्न स्वरू-

पाच्या थाहेत. या परस्परविरोधी आहेत आणि जगावर आधिपत्य मिळविण्याकरितां साऱ्या जगाचें रणांगण करून त्यावर त्या धुमाकूळ घालीत आहेत, असें म्हणावयास काय हरकत आहे ?

वेन स्पूर, एम्. पी.

---

१०

महात्मा गांधी यांजवर निरतिशय प्रेम करणारे जसे लोक आहेत, त्यांचप्रमाणें त्यांच्या प्रत्येक कृतीकडे साशंकपणें पाहणारे लोकहि आहेत. एकाच वेळीं या परस्परविरोधी भावना उत्पन्न करणारे हे गृहस्थ कशा प्रकारचे थाहेत, हें जाणण्याची उत्कंठा पुष्कळांस व्हावी, यांत नवल नाहीं. अर्वाचीन सुधारणा गांधी यांना नको. पाश्चात्य संस्कृतीचे ते द्वेष्टे आहेत. मोठमोठे कारखाने, आगगाड्या, टेलीफोन, इस्पितळें इत्यादि अर्वाचीन वस्तू त्यांच्या दृष्टीनें केवळ निरुपयोगीच नव्हेत तर अनर्थमूलकहि आहेत.

मोहनदास करमचंद गांधी हे सांप्रत एकावन वर्षांचे असून त्यांची शरीरयष्टि बारीक आहे. त्यांच्या मेळ्यांत दृढ सत्यनिष्ठेचें पाणी चमकत असतें. त्यांची बोलण्याची पद्धति अगदीं हळू आणि केवळ एकतारी आहे. भावनांच्या कमी अधिकपणावरोबर त्यांच्या आवाजांत चढउतार होत नाहीं. इंग्रजी अथवा गुजराथी भाषेंतहि ते अशाच रीतीनें बोलतात; तथापि त्यांची भाषापद्धति मनोरंजक वाटते, हेंहि खरें आहे.

मृतवस्तूंचें पुनरुज्जीवन करणें हा गांधी यांच्या बुद्धीचा विशेष आहे. सत्पुरुषाला योग्य अशा प्रकारची माधुरी त्यांच्या भाषणांत असल्यामुळें आपल्या प्रतिपक्षाचा अर्धा अधिक आवेश ते थार्धीच नाहींसा करून टाकतात. आणि या माधुरीबरोबरच शुद्ध बुद्धिवाद आणि तर्कशास्त्र यांची जोड पाहून एकाद्या कसलेल्या कायदेपंडिताप्रमाणें आपल्या पक्षाची मांडणी ते करतात. दक्षिण आफ्रिकेंत जनरल स्मट्स् यांजवरोबर गांधी यांचें वाग्युद्ध पुष्कळ वर्षें चाललें होतें, आणि या युद्धांत त्यांची मुत्सद्देगिरी स्मट्स् यांच्या तोडीचीच आहे असें त्यांनीं सिद्ध केलें. हें युद्ध दीर्घकाळ चालू असतांहि या दोन पुरुषांतील बुद्धिवाद तंटा होण्याइतका विकोपास

केन्द्रांच गेला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. गांधी आणि गांधीपंथ यांचें सार एकाच सूत्रांत सांगावयाचें म्हटलें, तर तें खुद्द गांधी यांच्या पुढील शब्दांत व्यक्त होईल. 'मला भेटलेले आजपर्यंतचे बाह्यतः धर्मजिज्ञासू म्हणून दिसणारे पुरुष अंतर्यामीं राजकारणी होते; पण मी बाह्यतः राजकारणाचा अंगीकार केला असला, तरी अंतर्यामीं धर्मजिज्ञासू आहें!'

डेली मेल.

---

११

हिंदुस्थानदेश आपणापासून फार लांबच्या पल्ल्यावर असल्यामुळें त्यासंबंधी फारशी माहिती मिळविण्याची इच्छा आपणास होत नाहीं. तेथील लोकांची रीतभात, त्यांच्या चालीरीती आणि त्यांचे विचार वगैरे एकंदर बाबींसंबंधीं कांहीं माहिती मिळवावी, अशी जिज्ञासाच आपणास होत नाहीं. महात्मा गांधी हे हिंदुस्थानचे रहिवाशी आहेत; तथापि इतक्या दूर अंतरावर असतांहि त्यांच्यासंबंधी माहिती करून घेणें आपणास अवश्य झालें आहे. त्यांची कर्तबगारी अशा प्रकारची आहे कीं जगाच्या नजरे समोर यापुढें ती लपून राहणें शक्य नाहीं. रशियांत टॉलस्टॉय यांचें जें महत्व होतें, तेंच आज गांधी यांचें हिंदुस्थानांत आहे. प्राचीन काळापासून हिंदुस्थान देश धर्मपरायणतेबद्दल प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानांत तत्वज्ञानाचा उदय झाल्याला आज पुष्कळ काळ लोटून गेला आहे. अशा प्रकारच्या दीर्घ परंपरेमुळें हिंदु राष्ट्रपुरुषाची मनोभूमिका सामान्यतः कल्पनावश बनली आहे; आणि ही धर्मपरायणता आज गांधी यांच्या रूपानें अवतरली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. गांधी यांची चळवळ आपणा पाश्चात्यांच्या मनास विषाद उत्पन्न करीत असली, आणि हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेला ती अभेद्य कोड्यासारखी होऊन बसली असली, तरी ही चळवळ शुष्क नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एखादा पाश्चात्य राजकारणी पुरुष एखाद्या चळवळींत पडला, म्हणजे तिचा हेतु आणि त्याच्या पूर्तीचीं साधनें यांचा विचार सामान्य व्यवहाराच्या अनुभवावरून करीत असतो. चालू व्यवहार आणि त्यांत प्रत्यहीं येणारे अनुभव यांपलीकडे त्याच्या हेतूची अथवा साधनांची उडी जात नाहीं. ऐर्लंडांतील सिनफिन पक्ष आणि हिंदुस्थानांतील असहकारयोगी यांच्यांत कांहीं अंशीं साम्य आहे, हें खरें; पण ऐरिश लोक झाले, तरी आपणाप्रमाणेंच पाश्चात्य वंशाचे आहेत, यामुळें त्यांच्या पद्धतींत

गौप्य असें कांहीं नाहीं. त्यांची पद्धत आपणास भांवावून टाकीत नाहीं. त्यांचीं साधनें जड सृष्टि सोडून चैतन्याकडे धांव घेत नाहींत.

सिनफिन पक्षानें स्वराज्यप्राप्तीकरतां आरंभीं जशा प्रकारची चळवळ केली, तशाच प्रकारच्या कल्पना गांधी यांच्या चित्तांत असाव्या असें वरवर पाहणारास कदाचित वाटेल. हिंदुस्थानांत ब्रिटिशसत्ता चालविणाऱ्या साऱ्या यंत्राला गांधी यांनीं आरंभीं बहिष्कार घातला. विशेषतः कौन्सिलांच्या निवडणुकीस त्यांनीं हरकत घेतली. असामांतील मळ्यांवरून तेथील मजूर परत आणले, इंग्लिश माल आणि विशेषतः इंग्लिश कापड यांजवर त्यांनीं कडक बहिष्कार घातला. सरकारमार्फत अथवा इतरांमार्फत युरोपीयन पद्धतीनें चालणाऱ्या शाळा आणि विद्यालयें, यांतील विद्यार्थी त्यांनीं परत बोलाविले. स्वतःच्या गरजेस लागणारें कापड हातानें कांतून आणि विणून तयार करण्यास त्यांनीं सुरुवात केली. साऱ्या विद्यार्थीवर्गानें आणि इतर उत्साही तरुण स्त्रीपुरुषांनीं चरका हातीं घ्यावा आणि अशा रीतीनें या बाबींतल्या आपल्या साऱ्या गरजा आपणच भागवून घ्याव्या, असा ठराव त्यांनीं केला. याच रीतीनें हिंदुस्थान स्वावलंबी झालें, म्हणजे दास्यांतून तें मुक्त होईल, असें गांधी म्हणतात. अशा रीतीनें अखेरीस आपण पूर्ण यश मिळवूं, अशी खात्री गांधी यांस वाटत आहे. आपला सारा कार्यक्रम पुरा झाला तर एक वर्ष पुरें होण्याच्या अवधींत आपण स्वराज्य मिळवूं असें गांधी म्हणतात. आतां अशा प्रकारच्या कार्यक्रमानें सारी साम्राज्यसत्ता नष्ट होईल, इतकी ती कमकुवत आहे, असें आम्हाला तरी वाटत नाहीं. आजमितीला साम्राज्यवाद किती प्रबळ झाला आहे, याची खरी कल्पना गांधी यांस झालीच नाहीं, असें आम्हांस वाटतें. आतां राजकीय चळवळीच्या दृष्टीनें त्यांच्या चळवळीचीही दिशा कदाचित् योग्य ठरण्यासारखी असेल आणि शुद्ध बुद्धिवादालाहि ती पटेल. अर्वाचीनकाळच्या साऱ्या साम्राज्यसत्तेचा पाया संपत्ति हा आहे. अर्थशास्त्राच्या अनुरोधानें चालणाऱ्या परंपरेवरच ही सारी इमारत उभी आहे. आणि अशा स्थितींत हिंदुस्थानचे बाजार आमच्या धंदेवाल्यांना खरोखरच कायमचे बंद झाले, तर वसाहतीच्या स्वराज्याचें दान यापुढें लांबणीवर टाकण्यांत शहाणपणाचें आहे कीं काय याचा विचार आपणास अवश्य करावा लागेल. एकादें राष्ट्र खरोखरच जागें झालें आणि आपले हक्क आपणास आजच मिळाले पाहिजेत, अशी मागणी दृढ निश्चयानें त्यानें सुरू केली म्हणजे स्वराज्यसत्तेचे लहान लहान तुकडे त्याच्या पुढें दीर्घकाळपर्यंत टाकीत बसणें अतीं हितावह होतें असें आम्हांस तरी वाटत नाहीं.

तथापि या असहकाराच्या चळवळींत एक भीतीचेंहि स्थान आहे. असहकार-योगाचा सारा कार्यक्रम पार पडला, तर हिंदुस्थानाचें खरोखरच कल्याण होईल कीं नाहीं, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आपला युरोपांतील प्रवास संपवून रवींद्रनाथ टागोर हिंदुस्थानांत परत गेले, आणि त्यांनीच हा प्रश्न तेथें प्रथम उपस्थित केला. असहकारयोगाचा कार्यक्रम आपणास पसंत नाहीं, असें त्यांनीं जाहीर केलें. देशभक्त या नात्यानें या गोष्टीबद्दल आपणास फार वाईट वाटत आहे, असेंहि ते म्हणाले. इतर देशभक्तांप्रमाणेंच रवींद्रनाथ स्वभूमीवर एकनिष्ठ प्रेम करतात. पंजाबांत ब्रिटिश सत्तेनें जो अमानुष अत्याचार केला, त्याचा धिक्कार करण्याच्या हेतूनें आपली पदवीहि त्यांनीं सोडली; तथापि गांधी यांच्या चळवळीशीं त्यांची सहानुकंपा नाहीं, असेंहि ते म्हणतात. पाश्चात्य आधिभौतिक शास्त्रांनीं उदार हस्तानें दिलेल्या देणग्यांचा धिःकार करणें हें पूर्वेच्या अभिमानाचें द्योतक असेल; पण ही प्रकृति भावी अभ्युदयाला पोषक नसून विध्वंसक मात्र आहे; आणि अशा कृतीचा परिणाम बुद्धानें सांगितलेल्या सर्वपरित्यागाच्या मार्गांत होणार आहे. अनंत वस्तूशीं एकरूप व्हावयाचें असेल, तर 'नेति नेति' या मार्गाचा स्वीकार करून सर्वसंगपरित्याग केला पाहिजे, असें पौर्वात्यशास्त्राचें म्हणणें आहे. वस्तूंचें विशिष्टत्व आपल्या नजरेसमोरून गेलें, म्हणजे सर्वव्यापी सामान्यत्व मात्र उरेल, असें पौर्वात्यतत्वशास्त्राचें म्हणणें आहे. अशा रीतीनें अनंताशीं साधर्म्य पावण्यांत उच्च दर्जाच्या बुद्धीला मोठा लाभ होत असेल, हें खरें; तथापि अशा मार्गाचा स्वीकार सामान्य जनतेनें करणें म्हणजे जगाबद्दल विषाद, तमोगुणी व्यापारशून्यता आणि शुद्ध आळस यांतच तिचें पर्यवसान होईल, यांत शंका नाहीं. पाश्चात्यांचा मार्ग याच्या उलट आहे. वस्तूंच्या विशिष्ट गुणांचे शोध लावून त्यांत अखेरीस सामान्यधर्म कोणते उरतात, याचा शोध लावणें, ही पाश्चात्य पद्धत आहे. तथापि पाश्चात्य जनताहि अद्यापि अर्ध्याच मुक्कामावर थांबली असून वस्तुजाताच्या विशिष्टत्वांतच गुरफटली आहे. सामान्याकडे ती अद्यापि धांव घेऊं लागली नाहीं. तिचे पाय जगाच्या व्यापारांत गुंतून बसले आहेत. हें खरें असलें तरी युरोपीय जनता अद्यापि उद्योगशील आणि कर्मप्रवण आहे. कर्मयोगांत मन घालावें, अशी तिची इच्छा आहे. अशा-प्रकारच्या या दोन वेगवेगळ्या पद्धतींचें एक विश्वरूप बनवावें, असें म्हणणाऱ्या व्यक्तींत टागोर यांचा अंतर्भाव होतो. पाश्चात्यांच्या पद्धतीनें चालून पूर्वेनें अनंताचा शोध लावावा आणि बाह्यविषमतेच्या पोटीं खरी समता कशी आहे,

हें पटवून घ्यावें, असे टागोर म्हणतात; तथापि या पाश्चात्य पद्धतीचा अंगिकार करतांना जडवस्तूंत बुडून जाणें आणि ग्राम्य सुखाच्या मागें लागणें या पाश्चात्य दोषांचा त्याग करावा, अशीहि सूचना करण्यास टागोर विसरले नाहींत. ग्राम्य-सुखाच्या कल्पनांत पाश्चात्य लोक इतके बुडून गेले आहेत की अनंत अस्तित्वाची कल्पनाहि ते विसरले आहेत, असे टागोर म्हणतात.

मानसशास्त्राचे हे सिद्धांत आपल्या विशिष्ट परिस्थितीलाहि लागू करण्यासारखे आहेत. आयर्लंडांतील सिनफिन पक्ष आणि हिंदुस्थानांतील असहकारयोगी यांचा विचार तुलनात्मक दृष्टया पुन्हां एकवार आपण करून पाहूं. सिनफिन पक्षानें व्यापाऱ्यांतील इंग्रजांची मध्यस्थी दूर करण्याचा उद्योग सुरू केला. आयर्लंडांत खपणारा माल इंग्रज दलालांच्या मध्यस्थीशिवाय आयरीश गिऱ्हाइकांच्या पदरांत पडावा, अशी व्यवस्था सिनफिन पक्षानें केली. शेतकऱ्यांत परस्पर सहाय्यकारी मंडळ्या स्थापन केल्या आणि अशा रीतीनें इंग्रज सावकारांचे पाय स्वदेशांतून उठविण्याची खटपट त्यांनीं सुरू केली. चार चौघांनी एकत्र होऊन आपल्या फायद्याचा कांहीं उद्योग करावा, अशी संवय आयरीश शेतकऱ्यांना नव्हती. ज्यानें त्यानें आपापल्यापुरतें पहावें, ही आकुंचित दृष्टि आयरिश शेतकऱ्यांच्या नुकसानीला कारण झाली. सिनफेन पक्षानें चळवळ करून संघटनात्मक क्रियाशक्ति त्यांच्यांत उत्पन्न केली. यामुळें परदेशी सावकारांची लूट हळूहळू बंद पडत चालली.

आतां हिंदुस्थानांतील असहकारयोग्यांचा मार्ग पहा. वाफेनें चालणाऱ्या घाण्यांवर मात करण्याच्या उद्देशानें पुरातन काळचा हातचरखा त्यांनीं सुरू केला. अर्वाचीन काळच्या यंत्रशक्तीला प्राचीन काळच्या ओबडधोबड हस्तशक्तीनें जिंकण्याचा हा यत्न आहे. आतां पाश्चात्य देशांतील यांत्रिक शक्तीमुळें मनुष्यें हीं यंत्रासारखीच बनलीं असून त्यांच्यांत खरा जीवपणाहि उरला नाहीं, ही गोष्ट खरी; तथापि हजारों मजुरांच्या संघटित क्रियाशक्तीनें श्रमविभाग अधिक चांगला वांटला जाऊन थोड्या श्रमानें पुष्कळ काम करतां येतें, हें कोणालाहि कबूल करावें लागेल.

अशा स्थितींत विश्वविद्यालयांत विद्यार्जनांत ज्यांचा काळ जावयाचा, अशा तरुण मुलांना वेधून काढून आणि त्यांच्या हातीं चरखा देऊन एका तासांत दीडपावशेर सूत काढण्याचा हा असहकारयोग्यांचा उद्योग पाहिला म्हणजे, या तरुणांबद्दल आम्हांस कींव येते. आणि असहकारवाद्यांच्या या विचित्र उद्योगाबद्दल हंसूंहि येतें; अर्वाचीन काळचीं आधिभौतिक शास्त्रें

आणि यांत्रिक कला, यांजपासून पराङ्मुख होण्याची इच्छा हिंदुस्थानाला खरो-खरच झाली आहे काय ? हिंदुस्थानाला परकीय सत्तेपासून मुक्त होऊन स्वयं-सत्ताक होण्याची इच्छा असेल, तर पाश्चात्यांच्या अर्वाचीन शास्त्रांचा आणि कलांचा अभ्यास उलट अधिक नेटानें त्यानें केला पाहिजे, असें आम्हांस वाटतें. हिंदुस्थानांतील खऱ्या देशभक्तांनीं हा भलताच नाद सोडून देऊन यंत्रकला, रसायन, अथवा अर्वाचीन शेतकी विद्या, यांचा अभ्यास दुप्पट जोरानें सुरू करणें अवश्य होतें.

अशा प्रकारें हा सल्ला देण्यांत जडवादाचा सल्ला देण्याचा उपदेश आम्ही करीत आहों, असें कोणीं समजूं नये. मुलांच्या हातीं चरखा देण्यापेक्षां गांधी यांनीं आपलें लक्ष शेतकी सुधारण्याकडे लावलें असतें, तर हिंदुस्थानाला तें अधिक फायद्याचें झालें असतें. आयर्लंडांत रसेल यानें जें कार्य केलें, तेंच हिंदुस्थानांत गांधी यांनीं केलें असतें, तर प्रगतीच्या मार्गांत त्या देशाचें पाऊल हळूहळू पण निश्चयानें पुढें पडलें असतें. देशाचें कल्याण साधणें ही गोष्ट महिन्या दोन महि-न्यांच्या अवधींत साधण्यासारखी नसून त्यासाठीं सबंध पिढीचे श्रम खर्ची घालावे लागतात; पण या दीर्घ परिश्रमाचा फायदाहि असाच चक्रव्याड व्याजानें भरपूर मिळत असतो. जमिनीच्या सुपीकपणाबरोबर शेतकऱ्यांचीं मनेंहि अधिक सुपीक होतात आणि उच्चतर कल्पनांना अवकाश मिळण्याइतकीं तीं विस्तृत होतात. शेतकऱ्यांना सावकारांच्या मगरमिठींतून मुक्त करून त्यांना गांधी यांनीं या खऱ्या मार्गाला लावलें, तर हिंदुस्थानाची नैतिक आणि सांपत्तिक सुधारणा अवश्य होईल. आतां हिंदुस्थानानें पाश्चात्य लोकांच्या कांहीं दोषांपासून अलिप्त रहावें, हेंहि उचित आहे. पाश्चात्य लोक शुद्ध वाणी बनले आहेत. प्रत्येक गोष्टीचा विचार केवळ आर्थिक नफ्यातोट्याच्या दृष्टीनें करण्याची दुष्ट संवय त्यांना लागली आहे. यामुळें त्यांचें चित्त लोभानें ग्रासून टाकलें आहे. ही व्यापारी दृष्टि आणि हा लोभीपणा दीर्घकाळ आंगीं जडल्यामुळें पाश्चात्यांची मनोभूमिका केवळ जडरूप होऊन बसली आहे. पाश्चात्यांचा हा दोष आपल्या आंगीं जडूं न देण्याचा यत्न हिंदुस्थानानें करावा; पण पाश्चात्यांची शास्त्रविद्या आणि त्यांची यंत्रकला यांपा-सून पराङ्मुख होण्यांत हिंदुस्थानचा कांहीं फायदा आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. शुद्ध कल्पनाकाशात उंच उंच भराऱ्या मारून वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटेल असें आम्हांस वाटत नाहीं. हा प्रश्न हिंदुस्थानांत आणि चिनांत सांप्रत अत्यंत अगत्याचा होऊन बसला आहे. हा प्रश्न सोडवि-

प्रत्यक्ष आचरण यांत कोणत्याहि प्रकारचा परस्पर संबंध नसतो, हा अनुभव सर्वांस आहेच. संधी सांपडली तेव्हां पूर्वयुरोपांतील खिस्त्यांनी अन्यधर्मीयांच्या कत्तली दिवसाढवळ्या केल्या ही गोष्ट कोणास ठाऊक नाहीं ? एका खिस्त्याला दुसऱ्या खिस्त्यांचें साहाय्य करण्याची इच्छा व्हावी, हें स्वाभाविक असलें, तरी तें नेहमींच नीतिमार्गाला धरून असतें, असें नाहीं आणि हें शुद्ध राजकारणहि नव्हे. यामुळें सारींच पौर्वात्यराष्ट्रें आपणाविरुद्ध एकजुटीनें उभीं राहण्याचा संभव उत्पन्न होतो. अल्पसंख्याक आर्मेनियन लोकांचें संरक्षण करणें हें ब्रिटिश सरकारचें काम आहे, आणि आपल्या या कर्तव्याची हेळसांड त्यानें केली आहे, हेंहि खरें; तथापि ही कर्तव्यदृष्टि बाजूला ठेवून या झगडयाला धर्मयुद्धाचें स्वरूप आणणें आणि दोन मानववंशांत वैर उत्पन्न करणें ही मोठी भयंकर चूक आहे. या चुकीमुळेंच हिंदुस्थानांतील सांप्रतची परिस्थिति इंग्लंडनें उत्पन्न केली आहे. तुर्क आणि ग्रीक या उभयपक्षांत न्यायाचा कांटा समतोल धरून आणि दोघांचेहि हितसंबंध लक्षांत घेऊन हा तह आम्ही घडवून आणला नाहीं, तर हिंदुस्थानांतील अस्वस्थता अशीच कायम राहण्याचा संभव आहे.

**एक इंग्रज.**

---

## १२

आज मितीला या जगांत एक अपूर्व युद्ध चालू आहे. जीवात्म्याची चैतन्यशक्ति आणि राजशासनाची पाशवी शक्ति असे या युद्धाचे दोन पक्ष आहेत. या युद्धाच्या आरंभीं वस्तुस्थिति काय होती, याची खरी माहिती असल्याशिवाय यांत सत्य कोणत्या पक्षाला आहे, हें सांगतां येणें कठिण आहे. इंग्लंडांतील बहुतेक लोकांना या वस्तुस्थितीचें खरें ज्ञान नाहीं, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

इ. स. १८८९ सालाच्या सुमारास मोहनदास करमचंद गांधी या नांवाचा एक हिंदी विद्यार्थी इंग्लंडांत कायद्याच्या अभ्यासासाठीं आला. याचा जन्म एका श्रीमंत आणि सुसंस्कृत कुटुंबांत झाला होता. स्वतः हा विद्यार्थी मोठा हुशार आणि विनीत स्वभावाचा होता. त्याचें चालणें बोलणें आणि कपडालत्ता हे बाह्य प्रकार इतर लोकांसारखेच होते. मद्यमांसाचा त्याग आणि ब्रह्मचर्याचें पालन यांची शपथ या विद्यार्थ्यानें घेतली असेल, असें त्याच्या बाह्य परिचर्येवरून कोणासहि कळण्यासारखें नव्हतें.

टीका करण्याचा अथवा तीं खरीं खोटीं ठरविण्याचा माझा उद्देश आहे, असें कोणीं समजूं नये.

कोठेंहि साधुत्व आढळून आलें, तर तेथें जाऊन लोळण घ्यावी, असा पौर्वात्योंचा देहस्वभाव आहे, आणि त्यांची संस्कृतिपरंपरा पाहिली, म्हणजे त्यांच्या ठिकाणीं हा स्वभाव कां उत्पन्न झाला, याचें कोणास गूढहि वाटण्याचें कारण नाहीं. कोणा-लाहि साधु म्हणण्यापूर्वी त्याची कांहीं तरी कसोटी पहावी, हा अज्ञजनसमूहाचा सामान्य स्वभाव आहे; आणि साधुत्व व भोंदूपणा यांचीं जीं कांहीं चिन्हें आपल्या मनाशीं या अज्ञजनतेनें ठरविलेलीं असतात, त्यांच्या अनुरोधानें कोणा-चीहि परीक्षा ते पहात असतात. हिंदुस्थानांत ही कसोटी पाहण्याचें साधन त्याग हें आहे. सर्वसंगपरित्याग करून जाडयाभरडया आणि फाटक्या तुटक्या अन्नव-स्त्रावर तुम्ही राहिलां तर हिंदी लोक तुमचें म्हणणें ऐकून घेतील. खिस्ती धर्मोप-देशकांनाहि हिंदुस्थानांत हाच अनुभव आला आहे. नानाप्रकारांचें जेवण जेऊन वर आकंठ मदिरापान करून आणि थाटामाटाच्या युरोपीयन पोषाकांत हिंदी जनतेसमोर तुम्ही गेलां तर तुमचा सदुपदेशहि ते ऐकून घेणार नाहींत. आतां त्यांची ही कसोटी सर्व दृष्टीनें आणि सर्वथैव खरी असतेच असें नाहीं, तथापि तिच्यांतहि कांहीं तथ्य आहे, हें कबूल केलें पाहिजे. कसेहि असलें, तथापि हिंदी जनतेवर गांधी यांची अपूर्व छाप आज बसली आहे, यांत शंका नाहीं.

आतां इतका पूर्वेतिहास सांगितल्यानंतर वर सांगितलेल्या युद्धाच्या इतिहा-सास आरंभ करण्यास हरकत नाहीं. दक्षिण आफ्रिकेंत आणि विशेषतः नाताळ प्रांतीं सुमारें दीड लाख हिंदी लोकांची वस्ती आहे. दक्षिण आफ्रिकेंत वर्णभेदा-मुळें उत्पन्न झालेल्या असंतोषाची तीव्रता आधींच पुष्कळशी असल्यामुळें यापुढें अधिक हिंदी लोकांचा प्रवेश तेथें होऊं द्यावयाचा नाहीं, असा निश्चय आफ्रिकन सरकारानें केला; आणि त्याबरोबरच अगोदरच्या रहिवाशांची हकालपट्टीहि हळूहळू करण्याचें धोरण त्यानें स्वीकारलें; पण हें दुसरें धोरण पूर्वीच्या तहास विपरीत असल्यामुळें तें उघडपणें अमलांत आणणें शक्य नव्हतें. याशिवाय नाताळांतील पुष्कळसे उद्योगधंदे हिंदी मजूरवर्गावर अवलंबून असल्यामुळें त्यांच्या हकालपट्टीला नाताळांतील गोऱ्या वसाहतवाल्यांनींहि हरकत घेतली. याशिवाय या धोरणाला हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश सरकार यांनीं हरकत घेतली ती वेगळीच.

यानंतर तेथील दीर्घ कालीन युद्धास सुरुवात झाली. शुद्ध मजुरांचा वर्ग सोडून इतर पांढरपेशांना दक्षिण आफ्रिकेंतील आपलें जिणें असह्य होईल, अशा रीतीनें त्यांना वागविण्याचा उपक्रम तेथील गोऱ्या रहिवाशांनीं सुरू केला. वस्तुतः कसल्याहि प्रकारचे हिंदी लोक त्यांना नको होते. पण त्यांतल्यात्यांत मजुरवर्ग त्यांना उपयोगी असल्यामुळें त्याजवर त्यांचा तितका कटाक्ष नव्हता. हिंदी लोकांवर आफ्रिकन सरकारनें कांहीं विशेष जादा कर बसविले. त्यांचा उपमर्द होईल अशा रीतीची एक नोंदणीपद्धत सुरू केली. हिंदी लोकांच्या वर्गांत त्यांना बसवून दरोडेखोरांप्रमाणें त्यांच्या आंगठ्यांचे ठसे घेण्याचा उपक्रम आफ्रिकन पोलीसनें सुरू केला.

सरकाराला केवळ लाजेकाजेस्तव कायदा डिला करणें जेथें जरूरीचें भासलें, तेथें ती उणीव तेथल्या गोऱ्या रहिवाशांनीं भरून काढली. कायद्याची अम्मलबजावणी स्वतःच्या हातीं घेऊन गोऱ्या गुंडांनीं हिंदी वसाहतवाल्यांवर नानाप्रकारचे अत्याचार केले. अशा वेळीं त्या रहिवाशांच्या मदतीस गांधी धावले. रहिवाशांचीं कायदेशीर कामें चालविण्याची सुरवात गांधी यांनीं इ. स. १८९३ सालीं केली. प्रथम त्यांचें वकीलपत्र रुजू करून घेण्याचेंच कोर्टानें नाकारलें; पण आपला वकीलीचा हक्क शाबीत करून हा कज्जा गांधी यांनीं चालविला आणि त्यांत यशहि संपादन केलें. मध्यंतरीं दीडदोनवर्षें हिंदुस्थानांत काढून इ. स. १८९५ सालीं दक्षिण आफ्रिकेंत ते पुन्हां परत आले. यावेळीं दरम्यान येथें त्याजवर जीवावरचा प्रसंग गुजरला होता. गोऱ्या रहिवाशांनीं त्याजवर हल्ला करून त्यांना इतका बेदम मार दिला कीं गांधी मृतप्राय होऊन पडले; पण अशाप्रकारच्या अत्याचारास न जुमानतांहि दक्षिण आफ्रिकेंत गांधी यांनीं दीर्घकाळपर्यंत वास कसा केला, हें येथें सविस्तर सांगण्याचें प्रयोजन नाहीं. डर्बन शहराच्या जवळच एक नवी हिंदी वसाहत त्यांनीं वसविली. केवळ शेतकीवर उदरनिर्वाह करणें आणि आजन्म दरिद्री राहणें अशा दोन शपथा आपल्या अनुयायांकडून गांधी यांनीं घेवविल्या होत्या. यानंतर पुढें दीर्घकाळपर्यंत दक्षिण आफ्रिकन सरकाराविरुद्ध शांतिमय युद्ध गांधी यांनीं पुकारलें. एका बाजूनें सरकाराशीं लढत असतां दुसऱ्या बाजूनें आपल्या अनुयायांचें जीवन नीतिदृष्ट्या अधिक उच्च आणि शुद्ध करण्याचे गांधी विसरले नाहींत. सरकाराशी लढण्यांतहि वाटाघाटीचा अंगिकार त्यांनीं केला नव्हता. सरकारला केव्हां पेंच पडला, तर त्या वेळीं त्याच्या मार्गांत अधिक अडचणी उपस्थित करून आपला कार्यभाग साधून घ्यावा, असा

सर्व प्रतिपक्षांची आजपर्यंतची चालू वहिवाट आहे; पण गांधी या वहिवाटीच्या उलट दिशेस गेले. सरकार अडचणींत आलें म्हणजे तें पुन्हा मोकळें होईपर्यंत आपलें युद्ध गांधी तहकूब करीत व अशा प्रसंगीं आपल्या शत्रूच्या मदतीलाहि ते धांवत. इ. स. १८९९ सालीं बोअरयुद्ध सुरू झालें, तेव्हां जखम्यांच्या शुश्रूषेकरतां गांधी यांनीं जीवदयापथक उभारलें. असल्या राजद्रोही मनुष्यानें उभारलेल्या या पथकाची मदत घेऊं नये, अशीहि ओरड करण्यास गोऱ्या रहिवाशांनीं कमी केलें नाहीं; पण या वेळीं अशा मदतीची अत्यंत जरूर असल्यामुळें सरकारला या ओरडीकडे कानाडोळा करावा लागला. पुढें गांधींची मदत खुद्द सोल्जरांसहि भासूं लागली, आणि त्यांच्या पथकानें युद्धसमाप्तीपर्यंत काम करावें, असा आग्रह त्यांनीं धरला. हें जीवदयेचें काम गांधी यांनीं इतकें चोख बजावलें कीं, याचा उल्लेख खुद्द सेनापतीला आपल्या खलित्यांत करावा लागला. सरकारनें सार्वजनिकरीत्या गांधी यांचे आभार मानून भर माऱ्याच्या ठिकाणींहि त्यांच्या पथकानें जें अनुपम धैर्य दाखविलें, त्याबद्दल त्यांची तारीफ केली. इ. स. १९०४ सालीं जोहान्सबर्ग येथें प्लेगची लाट उसळली. रोगाच्या उपशमाकरतां काय उपाययोजना करावी, याचा विचार सरकार करूं लागलें; पण सरकारचा हा विचार संपण्याच्या आधींच गांधी यांनीं केवळ स्वतःच्या हिंमतीवर खाजगी रुग्णालय सुरू केलें. इ.स. १९०६ सालीं नाताळच्या मूळच्या रहिवाशांनीं बंड सुरू केलें. तेव्हां या वेळींहि गांधी यांनीं आपलें जीवदयेचें कार्य पुनः सुरू केलें. युद्धाच्या वेळेपेक्षांहि या वेळेचें कार्य अधिक खडतर आणि अधिक धोक्याचें होतें; पण गांधी यांनीं तेंहि पूर्वीप्रमाणें उत्तम रीतीनें पार पाडलें. नाताळच्या गव्हर्नर साहेबानें या कार्याबद्दल त्यांचे आभार मानले आणि पुढें थोड्याच दिवसांनीं तुरुंगांत त्यांची रवानगी केली.

इ. स. १९१३ सालीं गांधी यांस कितीदां तरी तुरुंगवास पत्करावा लागला होता. आणि याच सालांत हिंदी कैद्यांची संख्या सुमारें अडीच हजार झाली होती. अशा रीतीनें ट्रान्सवाल आणि नाताळ या भागांत हें शांततामय युद्ध भर रंगांत आलें असतां तेथील रेलवे कामगारांनीं एक प्रचंड संप केला. या संपाचें स्वरूप इतकें भयंकर होतें कीं दक्षिण आफ्रिकेंतील साऱ्या वसाहतींची मुळापासूनच धुळधाण होते कीं काय अशी भीति वाटूं लागली. सामान्य चळवळ्यांच्या दृष्टीनें गांधी यांना ही सोन्यासारखी संधी प्राप्त झाली होती. या वेळीं आफ्रिकन सरकारची शेंडीच जणूं काय त्यांच्या हातीं आली होती. तिला एक

आणखी जोराचा हिसडा त्यांनीं मारला असता, तर तावडतोब मान वांकवि- ण्यावांचून सरकारास दुसरें गत्यंतर उरलें नसतें; पण गांधी यांचा पंथच असा- मान्य कोटींतला होता. आफ्रिकन सरकारावरील हा प्रसंग पाहून हिंदी वसाहत- वाल्याचा संप त्यांनीं तावडतोब बंद केला आणि या संकटांतून सरकार पूर्ण मुक्त होईपर्यंत सर्व हिंदी रहिवाशांनीं आपापल्या कामास जावें, 'असा हुकूम फर्मा- विला. गांधी यांजवर तुरुंगांत जाण्याचे प्रसंग किती वेळां आले, गोऱ्या पुंडांनीं त्यांजवर किती वेळां हात टाकला आणि भर चव्हाट्यावर त्यांची मानहानी करण्याच्या किती खटपटी त्यांच्या शत्रूंनीं केल्या, यांचें मोजमाप सांगतां येणें मला शक्य नाहीं. अखेरीस इ.स. १९१३ सालीं हें भांडण समेटाच्या मार्गास लागलें. लॉर्ड हार्डींग यांच्या अमदानींत हिंदुस्थान सरकारानें हा प्रश्न हातीं घेतला. या बाबतींत एकंदर चवकशी करण्याकरितां, एका कमीशनची योजना झाली. या- कमीशननें गांधी यांच्या बहुतेक मागण्यांस दुजोरा दिला आणि पुढें शिफारशी- वरून त्या अर्थाचा एक नवा कायदाहि पास झाला.

वरील हकीकतींत गांधी यांच्या जीवनचरित्राचें रहस्य अगदीं त्रोटक रीतीनें आम्हीं दाखविलें आहे. यांतील मुख्य रहस्य काय आहे, इतकाच विचार वाच- कांनीं करावा. कोणतीहि नीतिबाह्य गोष्ट न करतां, कोणावरहि हात न टाकतां आणि शत्रूनें दिलेले तडाखे पूर्ण सहनशीलतेनें गिळून जाऊन या युद्धांत गांधी यांनीं यश मिळविलें. आपल्या अलौकिक क्षमाशीलतेनें आपल्या शत्रूंना त्यांनी इतकें लाजविलें कीं, गांधी यांजवर हात उचलण्यास त्यांना पुन्हां धैर्य झालें नाहीं. या युद्धांतील दोन दळें कशा प्रकारचीं आहेत, हेंहि पाहाण्यासारखें आहे. एका बाजूला प्रचंड पाशवी शक्ति एकवटली होती आणि दुसऱ्या बाजूला एक मानवी जीवात्मा एकाकी होता. त्याला कसलेंहि साहाय्य नव्हतें. आणि अखेरीस या पाशवी सैन्यांतील एकेक घटक आपण होऊन जीवात्म्याच्या बाजूस जाऊं लागला. पाशवी शक्तीचें सारें सैन्य अशा रीतीनें अखेरीस वितळून गेलें.

गांधी यांना इंद्रियजन्य सुखाची यत्किंचितहि चाड नाहीं. संपत्तीची पर्वा ते करीत नाहींत. आपला आयुर्दाय सुखासमाधानांत जावा, इतकीहि त्यांची इच्छा नाहीं. निंदेला ते भीत नाहींत आणि स्तुतीला ते भाळूनहि जात नाहींत. स्व- तःच्या सुखोपभोगासाठीं अमुक गोष्ट करावी या हेतूनें कोणतेंहि कार्य ते हातीं घेत नाहींत. स्वतःच्या मनाला जी गोष्ट योग्य वाटेल तिचा व्यवहार पक्क्या दृढ निश्चयानें ते करतात. अशा प्रकारच्या सर्वसंगपरित्यागी पुरुषाला त्याच्या

शत्रूंनीं भ्यावें, यांत नवल नाहीं. पाशवी शक्तीचीं सूत्रें आज ज्यांच्या हातांत आहेत, त्यांनीं गांधी यांच्या बाबींत आपलें वर्तन अत्यंत धोरणानें सांभाळलें पाहिजे. अत्यंत भयंकर शत्रूशीं आपणास झुंझावयाचें आहे, या गोष्टीचा विसर त्यांनीं क्षणभरहि पडूं देऊं नये. या शत्रूचा देह त्यांना केव्हांहि काबीज करतां येईल; पण त्यामुळें त्याच्या जीवात्म्याचा अत्यंत अल्प इतक्या अंशाचा धागाहि त्यांच्या हातीं लागावयाचा नाहीं.

प्रो. गिलबर्ट मरे ( हिबर्ट जर्नल. )

---

१३

" सध्यां हिंदुस्थानापुढें अत्यंत महत्वाचा प्रश्न कोणता आहे?" असें नुकतेंच मला कोणीं विचारलें, तेव्हां ' गरीबांचा छळ ' असें उत्तर क्षणाचाहि विलंब न लागतां माझ्या तोंडून बाहेर पडलें. चांदपुर येथें जो दुःखाग्नी नुकताच भडकला होता, त्याच्या फुफाट्यांतून मी नुकताच बाहेर पडलों होतों. या ठिकाणीं, मजुरांचा एक तळ पडला असून त्यांत महामारीची सांथ उठली होती. आसामांतून आलेल्या या अनाथ मंडळींत लहान मुलांपासून वृद्धांपर्यंत सर्व जातीचीं स्त्री-पुरुषें होतीं. आमचा मुक्काम तेथें होता, तोंपर्यंत या माझ्या बंधुभगिनींच्या घोर यातना रोजच्यारोज पाहण्याचा प्रसंग मजवर येत असे. हा प्रसंग पहात असतां माझ्या अंतःकरणांत दुःखाग्नीच्या ज्या ज्वाळा उठत होत्या, त्यांची छाया या लेखावर पडलेली कोणास दिसली तर त्याबद्दल माझे वाचक मला खचित क्षमा करतील. ज्यांना अंतःकरण म्हणून आहे, त्यांचीं हृदयें ही हकीकत वाचून कालवल्यावांचून राहणार नाहींत. या माझ्या लेखांत कांहीं अतिशयोक्तीहि असण्याचा संभव आहे; पण हा विषयच असा आहे कीं, त्याची आठवण झाल्याबरोबर शुद्ध न्यायबुद्धीचा त्रयस्थपणा लोपून जातो. याकरतां माझ्या मनांत जसे विचार उठले, तसेच माझ्या वाचकांपुढेंहि ते मी मांडणार आहें. हा लेख लिहीत असतां, हा सारा प्रसंग माझ्या डोळ्यांपुढें उभा आहे. या वेळीं माझ्या दरिद्री बांधवांनीं ज्या घोर यातना भोगल्या त्या सार्‍यांचें चित्र माझ्या मनःचक्षूंपुढें स्पष्ट उभें राहिलें आहे. ही हकीकत घडल्यानंतर लवकरच हा लेख मी लिहीत असल्यामुळें तिची सारी आठवण अद्यापि अगदीं ताजी आहे. यावेळीं जे प्रसंग मी माझ्या नजरेनें पाहिले, त्यांची विस्मृति सहजासहजीं आणि लवकर होण्यासारखी नाहीं. प्रसंग अगदीं शिळा होऊन थंड झाल्यावर पूर्ण आणि शांत विचा-

रानें आपली थंडी मतें या लेखांत मी प्रगट केली नसून माझ्या अंतःकरणाला लागलेली सारी आंच या लेखांत व्यक्त करण्याचा यत्न मीं केला आहे. या आठवणीनें माझें हृदय अद्यापीहि जळत आहे. शांतिनिकेतन आश्रमांत बसून हा लेख मी लिहित असतां माझ्या हृदयाला मात्र शांतीचा स्पर्शहि होत नाहीं. माझ्या आजुबाजूची चराचर सृष्टि पूर्ण शांतिसुख अनुभवीत असतां आणि प्रसन्न वदनानें मुहास्य करीत असतां, माझें हृदय मात्र दुःखानें व्याप्त झालें आहे. माझ्या आजुबाजूच्या सृष्टीला नवजीवन प्राप्त झालें असल्यामुळें त्या आनंदांत तीं दंग असतां माझें हृदय दुःखाच्या कल्लोळांत हेलकावे खात आहे.

आसामांतील चहाच्या मळ्यांतून हे मजूर बाहेर कसे आले, त्यांची शरीरयष्टी वर्णन करतां न येण्यासारखी कशी रोडली होती, त्यांच्या पोटांतील क्षुधा त्यांच्या डोळ्यांतून बाहेर कशी डोकावत होती, त्यांना जवळ जवळ नग्नावस्था कशी प्राप्त झाली होती आणि हातापायाच्या काड्या झालेल्या त्यांच्या मुलांना उभें राहण्यापुरतीहि शक्ति कशी नव्हती, या साऱ्या हृदयद्रावक गोष्टींचें कथन आतां सर्वश्रुत झालेंच आहे. अंगावरचीं तान्हीं मुलें दुधाचा एकादा थेंब तरी मिळेल या आशेनें आपल्या आयांना चोखून चोखून हैराण करीत होतीं; पण जेथें मुळांतच दूध आटलेलें, तेथें त्याचा थेंब तरी कसा प्राप्त होणार! या पूर्वी कंगालांच्या अनेक यातना मीं पाहिल्या आहेत, किंबहुना असे देखावे पाहाण्यांतच माझें बहुतेक आयुष्य गेलें आहे. भणंग भिकारी लोकांत राहून तेथेंच कांहीं तरी कार्य करण्यांत माझें आयुष्य मीं घालविलें आहे; पण असामांतील या निराश्रितांच्या ज्या यातना मीं पाहिल्या, त्या अगदीं विनतोड होत्या. नैहाटीच्या स्टेशनावर आणि नंतर चांदपूर येथें त्यांचे झालेले जे हाल मीं पाहिले, तसा प्रकार माझ्या साऱ्या आयुष्यांत मला केव्हां दिसला नव्हता. हे सारे मजूर आसामांतून बाहेर कां पडले, याच्या कारणांची मीमांसा अद्यापि झालेली नाहीं. पण हीं कारणें कांहींहि असलीं, तरी अपरंपार आणि अवर्णनीय दुःखें हे लोक भोगीत होते, यांत मात्र शंका नाहीं. यांच्या साऱ्या परिस्थितींत दुःख आणि दारिद्र्य याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि वस्तूचा गंधसुद्धां नव्हता. यांचें दारिद्र्य कसें होतें, याचें वर्णन तरी कोणत्या शब्दानें करावें! या साऱ्या दुःखपरंपरेला कंटाळूनच आज ते देशोधडीला लागले होते. या साऱ्या दुःखाच्या भडक्यांत आशेचा एकच तंतु त्यांना दिसत होता. या एकाच सूक्ष्म तंतूला ते केवढ्या अट्टाहासानें कवटाळीत होते, हें पाहिलें, म्हणजे कोणाचेंहि हृदय भरून आल्या-

वांचून रहात नाहीं. त्यांचीं दुःखें जितकीं मोठीं तितकीच त्यांची आशाहि बळकट होती. आपल्या या साऱ्या यातनांतून महात्मा गांधी आपणास खचित मुक्त करील हाच त्यांचा आशातंतु होय.

आसामांतून आलेल्या या निराश्रितांपैकीं जे लोक महामारीनें अजारी झाले होते, त्यांना इतरांपासून वेगळे ठेवण्याकरतां नदीच्या कालव्याच्या दोन्ही बाजूंस एक कँप बांधला होता. या ठिकाणीं या लोकांस आम्ही नित्य पहात होतों. कोणत्या आशातंतूवर हे लोक जीव धरून राहिले होते, हेंहि आमच्या नजरेस नित्य पडत असे. सर्व बाजूंनीं त्यांची पूर्ण निराशा झाली असतांहि वर सांगितलेल्या आशातंतूला चिटकून बसून आपल्या साऱ्या यातना ते मोठ्या धैर्यानें सोशीत होते. या निराश्रित लोकांना याच आशेनें मोठी सहनशीलता उत्पन्न करून भयंकर संकटांस तोंड देण्याची शक्ति उत्पन्न केली होती. निराश्रित स्त्रियांचा जीवात्मा जणूं काय या एका आशेलाच चिटकून राहिला होता. या एका आशेमुळें जो थोडा बहुत उत्साह या मंडळींत शिल्लक राहिला होता, त्याची छाप त्यांच्या लहान मुलांलेंकरांवरहि पडल्याचें दिसत होतें. एवढ्या भयंकर आपत्तींत हे कंगाल लोक अद्यापि इतके तरी उत्साही कसे दिसतात, याचें मोठें नवल वाटून तेथले स्वयंसेवक मोठ्या कुतूहलदृष्टीनें या गोष्टीची आपसांत चर्चा करीत. गांधींवरच्या या दृढ विश्वासामुळें या लोकांत चैतन्यजागृती होऊन ते जणूं काय सामान्य मानवकोटीच्या बाहेर गेले आहेत, असा भास होई.

स्वतांच्या नांवानें कोणताहि एकादा नवा पंथ जन्मास येऊं नये अशाविषयीं महात्मा गांधी अत्यंत काळजी घेत असतात. अशा प्रकारच्या भावनांचा अंकुर कोठें दिसला, तर त्याचा समूळ उच्छेद ते करीत असतात. आपणाला कोणत्याहि प्रकारचें असामान्य सामर्थ्य प्राप्त झालेलें नाहीं, असें वारंवार त्यांनीं बजावलें आहे. परमेश्वराच्या ठिकाणीं ज्याचा दृढ विश्वास असेल, अशा कोणाहि मनुष्याच्या अंगीं जी शक्ति सामान्यतः असते, तिच्याहून अधिक शक्ति आपल्या अंगीं नाहीं, असें ते स्पष्ट म्हणतात. अशा स्थितींत या निराश्रित लोकांनीं महात्माजींबद्दल जी विलक्षण पूज्यबुद्धि दाखविली, ती त्या व्यक्तीविषयीं नसून तत्वाविषयीं होती, असें म्हटलें पाहिजे. महात्मा गांधी या व्यक्तीच्या रूपानें जें तत्व अवतरलेलें दिसत होतें, त्याचें पूजन हे लोक करीत होते, आणि त्या तत्वाराधनेमुळेंच त्यांच्या ठायीं चैतन्यजागृति झाली होती. या तत्वानेंच त्यांचीं चित्तें भरून गेलीं होतीं आणि त्याच तत्वाचें स्पष्टीकरण गांधी यांच्या नामोच्चा-

प्रमाणें तशाच प्रकारच्या कल्पनांचा जन्म हिंदुस्थानच्या सामान्य जनतेंत आज होत आहे.

माझी ही विचारपरंपरा थोडी अधिक विस्तारानें सांगणें अवश्य आहे, असें मला वाटतें. असें करण्यांत चर्वितचर्वणाचा दोष मजकडे येईल हें खरें; तथापि वाचकांची नीट समजूत घालण्याकरतां तो दोषहि पतकरणें मला भाग आहे.

हिंदुस्थानांतील लक्षावधी दरिद्री प्रजा आज खडबडून जागी झाली असल्याचें उघड दिसत आहे. स्वतःचें अज्ञान, आणि बाहेरचा जुलूम यांनीं उत्पन्न केलेल्या कुंभकर्णी निद्रेचा त्याग करून ती हळूहळू वर उठूं पहात आहे. या अंधकारांतून मुक्त होण्याची आपली दृढ इच्छा महात्मा गांधी यांच्या रूपानें त्यांनीं व्यक्त दर्शन आणली आहे. आपलें सारें भवितव्य, आपल्या आशा, आपल्या आकांक्षा, आणि आपलें ध्येय किंबहुना आपला सारा जीवमात्र त्यांनीं महात्माजींच्या चरणीं वाहिला आहे. अत्यंत उत्सुकतेनें आपलें सर्वस्व त्यांनीं त्यांच्या स्वाधीन केलें आहे. हा महात्मा या यातनांतून आपणास खास मुक्त करील, असा त्यांचा अत्यंत दृढ विश्वास आहे. अफाट हिंदुस्थान देशांत असा विश्वास अमुक एका भागांतच आहे, असें नसून सारा देश त्यानें व्यापला आहे. दरिद्री आणि दुःखी कष्टी लोकांत, मिसळण्याचे प्रसंग या प्रवासांत मला वारंवार येत होते. अस्पृश्य लोकांच्या मेळ्यांत मी मिसळत होतों. अनेक जातींच्या लोकांचे थवेच्याथवे माझ्या भेटीसाठीं येत होते. त्यांच्या हृदयद्रावक करुण कथा ऐकून मला अनिवार दुःख होई. पण या साऱ्या आपत्तींतहि त्यांना आतां धीर वाटूं लागला आहे. पूर्वी कधींहि नव्हती, अशा प्रकारची श्रद्धा त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली असल्याचें मला स्पष्ट दिसून आलें.

आपणावर होत असलेल्या अनेक प्रकारच्या जुलमांचें जें भेसूर चित्र त्यांनीं माझ्यापुढें रंगविलें तें पाहून मला अत्यंत उद्वेग वाटून संतापहि आला. वेठीला धरणें, पोलिसांनीं आणि इतर सरकारी अधिकाऱ्यांनीं त्यांजकडून विन मोबदला सिधासामग्री घेणें, हवीं तीं कामें त्यांजवर लादणें वगैरे जुलमाचे प्रकार ऐकून माझ्या नाडयांतलें रक्त कढूं लागलें. खालच्या वर्गांच्या या आपत्तींत उच्च वर्गांतर्फेहून आणखी भरच पडत होती. आज दीर्घ काळपर्यंत आपली दुःखें त्यांनीं कशीबशी दाबून ठेवली होतीं; पण त्यांचा आतां अतिरेक झाल्यामुळें धरचा दाब फोडून तीं आतां आपणच वर येऊं पहात होतीं. त्यांच्या वृत्तींत आतां शांतता उरली नव्हती. त्यांचा प्रचंड स्फोट केव्हां तरी होईल, अशीहि शंका

मला येऊं लागली. त्यांच्या हृदयांतील ज्योतीनें आतां पक्का पेट घेतला आहे आणि कालांतरानें ती वाढत जाऊन तिच्या मोठाल्या ज्वाळा बाहेर पडतील याबद्दल माझ्या मनांत तरी कसलीहि शंका उरलेली नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतीच्या आधींच्या दिवसांतील आठवण पुन्हां पुन्हां मला होते. त्यावेळीं ज्या गोष्टी घडल्याचें आपण इतिहासांत वाचतों त्यांची पुनरावृत्ति आपल्या नजरे समोर हिंदुस्थानांत आजमितीस होत आहे.

मीं अशीं अनेक चित्रें पाहिलीं, त्यांतील एकाचेंच उदाहरण येथें देतों. गोरखपुराहून परत येत असतां पाटणा जंकशनवर मी उतरलों. दिवस मावळण्याचा सुमार झाला होता. पश्चिम क्षितिजावर फिरणाऱ्या काळ्या ढगावर सुवर्णशलाका मधून मधून बाहेर पडत होत्या. आतां लवकरच सूर्यास्त होऊन अंधार पडूं लागेल अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं होतीं. अशा वेळीं स्टेशनाच्या प्लाटफार्मावर मी शांतपणें उभा राहिलों होतों. आतांपर्यंत मिळालेल्या अनुभवानें माझ्या चित्तांत खळबळ उडाल्यानें माझ्या विचारांत यावेळीं कसलीहि संगति राहिली नव्हती. माझ्या आगमनाची बातमी कांहीं लोकांस अगाऊ मिळाल्यामुळें मला भेटण्यासाठीं कांहीं मंडळी स्टेशनावर आली होती. रेलवे कंपन्या ज्यांना हलके कामगार या नांवानें संबोधितात, ते पोर्टर, भंगी आणि इतर लोकहि माझ्या भेटीस आले होते. हा हलका नौकर वर्ग माझ्याभोंवतीं जमा झाला. महात्मा गांधी यांचा मी स्नेही आहें, हें त्याला ठाऊक असल्यामुळेंच त्यानें आदरपूर्वक माझें स्वागत केलें.

आरंभीं ही सर्व मंडळी नुसती हात जोडून उभी होती. मग त्यांच्यांतलाच एक पुढारी माझ्यासमोर आला आणि 'गांधी महाराजकी जय !' असे शब्द त्यानें उच्चारले. रस्त्यानें जाणाऱ्या मिरवणुकींतहि हा जयजयकार आपण नेहमीं ऐकतों; पण त्या प्रसंगीं स्वराच्या ज्या अवरोहानें आणि थाटानें हा उच्चारला जातो, त्याच्याशीं या हमालांच्या जयजयकाराचें कसलेंहि साम्य नव्हतें. 'गांधीमहाराजकी जय ' हे तीनच शब्द अत्यंत गंभीरपणानें त्यानीं उच्चारले. एखाद्या स्तोत्राचा अथवा ऋचेचा उच्चार कोणी देवभक्त ज्या गंभीर स्वरानें आणि पवित्र भावनेनें करतो, तीच भावना या हमालांच्या जयजयकारांत मला दिसून आली. त्यानें असा जयजयकार करताच सर्वांनीं आपले हात जोडून वर केले. त्या साऱ्यांच्या डोळ्यांत एक विलक्षण तेज चमकूं लागलें. ही सारी मंडळी जणूं काय सायंकाळची प्रार्थनाच करीत आहेत, असें मला वाटलें.

रानें ते करीत होते. सर्व यातनांतून आपणास अंतीं मुक्त करणारें परमरूप गांधी यांच्या ठिकाणीं अवतरलें आहे, अशी त्यांची भावना होती.

ज्या एका गोष्टीचा ठसा माझ्या अंतःकरणावर अगदीं खोल असा उमटला, तिचें कथन थोड्याशा विस्तारानें आतां मी करणार आहें. चांदपुराहून गोलंडोला जाण्याकरतां एक गलबत निघालें होतें. या गलबतांत या निराश्रितांची एक टोळी होती. गलबत आपला मार्ग आक्रमीत असतां मी त्यावर इकडून तिकडे येरझारा घालीत होतों. माझ्या आजूबाजूच्या सार्‍या भागावर ही निराश्रित मंडळी जिकडे तिकडे बसली होती. महामारीचा तो भयंकर दरबार आतां पुष्कळ मागें राहिला, या जाणिवेनें आम्हा सार्‍यांसच मोठा आनंद झाला. आतां पुढच्या मुक्कामावर आपली कांहीं तरी सोय लागेल,म्हणून या सार्‍या मंडळीला मोठा उल्हास वाटत असल्याचें दिसत होतें. गलबताच्या वरच्या भागावर पडून राहिलेल्या एका अस्थिपंजरमय बाल मूर्तीकडे माझें लक्ष विशेषपणें वेधलें होतें. हा मुलगा सुमारें बारा वर्षांचा होता. महामारीच्या आजारांतून तो नुकताच उठला होता; पण अद्यापि तो इतका अशक्त होता कीं गलबताच्या मोकळ्या जागीं त्याला निजवून ठेवणें अवश्य होतें. येतायेतां गलबत नदीच्या किनार्‍याच्या जवळ आलें; यावेळीं त्या मुलाजवळ मी उभा होतों. किनारा अगदीं जवळच असल्यामुळें गांवांतील मुलें आजूबाजूला बागडतांना दिसत होतीं. खेळतांखेळतां आमचें गलबत त्यांच्या नजरेस पडलें, तेव्हां किनार्‍याजवळ येऊन 'गांधी महाराजकी जय' असा जयजयकार मोठ्या उच्च घोषानें या मुलांनीं केला. या वेळीं गलबतावर निजून राहिलेल्या त्या अस्थिपंजराकडे मीं सहज वळून पाहिलें, तेव्हा त्याच्या चेहर्‍यावर उल्हासाचें विलक्षण तेज मला दिसूं लागलें. मोठ्या प्रयासानें आपलें डोकें त्यानें वर उचललें आणि त्या मुलांकडे आपला हात करून अत्यंत क्षीण अशा आवाजानें 'गांधी महाराजकी जय' असा जयजयकार केला.

माझ्या आजूबाजूला जे अनेक हृदयद्रावक आणि भयंकर देखावे मीं पाहिले त्यांची आठवण माझ्या चित्तावर अगदीं ताजी असतांहि या मुलाचा चेहरा माझ्या स्मरणांतून गेला नाहीं. त्याला आलेली क्षीणता फार भयंकर स्वरूपाची होती. तथापि मृत्यूलाहि जिंकणार्‍या अशा कोणत्या तरी तत्त्वाचा वास त्या मुलाच्या ठिकाणीं संचित होता. उपनिषदांनीं जें अमृतत्व प्रतिपादिलें आहे, त्याचाच प्रकाशमय किरण त्याच्या हृदयांत प्रकाशत होता. आपला क्षीण हात वर उचलून त्याहूनहि क्षीण अशा आवाजानें तो जयजयकार करूं लागला, तेव्हां

माझ्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहूं लागला आणि मला पुढील स्मृतिवचनाची आठवण झाली, 'मला असत्यांतून सत्याकडे ने, अंधकारांतून ज्योतीकडे ने. मृत्यूंतून ऋताकडे ने, हे अव्यक्तरूपा माझ्या ठिकाणीं तूं व्यक्त हो.'

त्या मुलाच्या तोंडाकडे मीं पाहिलें आणि अत्यंत क्षीण आवाजानें उच्चारलेले त्याचे शब्द मीं ऐकले, तेव्हां या ठिकाणीं परमेश्वर व्यक्तदशेला येत आहे, अशी कल्पना विजेच्या चमकीप्रमाणें माझ्या चित्तांत उभी राहिली. अशा अनंत दुःखांत आणि हालअपेष्टांत परमेश्वर शुद्ध आनंदरूपानें अवतरतो, या वचनाची पूर्तता या ठिकाणीं होत असल्याचें मला आढळून आलें.

अशा प्रकारें नानाविध देखावे माझ्या नजरेसमोरून जात असतां 'हिंदुस्थानांत धर्मबुद्धीची जागृति पुन्हां होत असल्याचीं हींच पूर्व चिन्हें आहेत काय?' असा प्रश्न मोठ्या जोरानें माझ्यासमोर उभा राहिला. आणि या प्रश्नाला 'होय' असेंच उत्तर दुसऱ्याहि अनेक गोष्टी आज देऊं लागल्या आहेत. सरकारनें छळलेली, उच्चवर्णियांनीं नाडलेली आणि सावकार जमीनदारांच्या जुलमाखालीं चिरडली गेलेली हिंदुस्थानची गरीबदुबळी प्रजा 'त्राहि भगवान्' असा टाहो फोडून परमेश्वराला आळवूं लागली आहे. आपल्या यातना संपण्याचा काळ समीप येत चालला आहे, अशी त्यांच्या बुद्धीची खात्री आतां अधिकाधिक होत चालली आहे. उत्तर हिंदुस्थानांत बराच लांबवर प्रवास करण्याचा प्रसंग मजवर नुकताच आला होता. सिंधप्रांतापासून पूर्व बंगाल्यापर्यंत बहुधा सारा मुलूख मी फिरून आलों. या प्रवासांत फार विचित्र गोष्टी माझ्या नजरेस पडल्या आणि नवजीवनाचा उदय हिंदुस्थानांत होत असल्याची खात्री मला पटली. अनेक राजकीय चळवळी आपल्या नजरेसमोर आज आहेत; पण हा वरवरचा नुसता फेंस आहे. नवजीवनाच्या झऱ्याचा उगम इतका उथळ नाहीं. तो जनतेच्या अत्यंत खोल भागांतून निघाला आहे. त्याचा प्रवाह फोडण्याचें काम राजकीय चळवळीनें केलेलें नसून गरीबांच्या आक्रंदनानें केलें आहे. फ्रान्सात प्रचंड क्रांति झाली, त्यापूर्वीचा थोडा काळ ज्याप्रमाणें अतर्क्य अशा वातावरणानें भरून गेला होता, तेंच वातावरण आज हिंदुस्थानांत उत्पन्न झालें आहे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या पूर्वेतिहासांत जे नानाविध प्रसंग घडल्याचें आपण ऐकतों, त्यांच्याशीं साम्य पावणारे प्रसंग आज आपल्या नजरेसमोर येथें घडत आहेत. समता आणि बंधुभाव, या नव्या कल्पनांचा जन्म फ्रेंच शेतकऱ्यांच्या चित्तांत त्या काळीं जसा झाला होता, त्याच

इतका प्रकार झाल्यावर सारी मंडळी आपापल्या नेमलेल्या कामावर शांतपणें हजर झाली. हा सारा इतिहास, क्षणार्धांत घडला. क्षणमात्र त्यांचा एक दृष्टिक्षेप मजकडे आला; पण तेवढ्या एका क्षणांत दुसरे हजारों प्रसंग सांठविले होते. पूर्वी कित्येक दिवस ज्या गोष्टी मी पहात होतों त्या सार्‍यांची पुनरावृत्ति या एका क्षणांत होऊन गेली. पाटणा स्टेशनावर जमलेल्या या साध्याभोळ्या दरिद्री लोकांच्या अंतःकरणांत कोणती ज्योत पेटली आहे, याची पूर्ण जाणीव त्या एका क्षणांत मला झाली. तशाच प्रकारचे अनेक सायंकाळ समय चांदपुरांत मीं घालविले होते. तोच सूर्यास्ताचा समय, तेच कृष्णवर्ण मेघ, त्याच त्यांच्या सोनेरी कडा, जगाला लवकरच आक्रमूं पाहणारा तोच अंधकार आणि नवीन प्रज्वलित झालेली तीच दीपज्योति माझ्या अवलोकनांत पुन्हां एकवार आली. चांदपुरांत असतां रोज संध्याकाळच्या वेळीं निराश्रित मजुरांच्या संघांतून मी फिरत असें. जागोजागीं लहान लहान टोळ्या करून ते बसलेले असत. त्या सार्‍यांच्या मुद्रा अगदीं उदास झाल्या होत्या. पण मला पाहतांच 'गांधी महाराजकी जय!' असे शब्द ते उच्चारीत आणि मग उदासपणाचा मागमूसहि त्यांच्या चेहर्‍यावर दिसत नसे.

चांदपूर येथें निराशेचे ढग वितळून जाऊन आशेच्या किरणांचा उदय झाला असल्याचें मला दिसून आलें. त्याचप्रमाणें येथेंहि तोच प्रकार मला आढळून आला. कोठेंहि झालें तरी दारिद्र्याचीं दुःखें सारखींच. कोणी रेलवेची हलकी नोकरी करीत असला, चहाच्या मळ्यांत मजुरी करीत असला, अथवा दुसर्‍या कोठेंहि कसला उद्योग करीत असला, तरी त्याच्या हालअपेष्टांचें स्वरूप सेंच. आजपर्यंत या दुःखद स्थितींत कांहीं फरक पडला नव्हता, तिच्यांतील एकतानतेचा भंग झाला नव्हता. त्यांत आशेला जागा नव्हती अथवा या अनंत दुःखांना थोडा तरी विरंगुळा देणारी श्रद्धाहि त्यांच्या ठिकाणीं नव्हती; पण आतां ही परिस्थिति बदलली. त्यांच्या ठिकाणीं श्रद्धेचा उदय झाला आणि या यातनांतून मुक्त करणारा एक तरी पुरुष जन्मास आला आहे, या भावनेनें त्यांच्या हृदयांत आशेचा संचार झाला. पूर्वीचें उदासपणें जिणें आतां मागें पडून त्यांच्यांत उत्साह उत्पन्न झाला. हा फरक अधिक उदात्त स्वरूपाचा नाहीं, असें कोण म्हणेल? दारिद्र्याच्या वज्रमय कवचांचा एक तरी पापुद्रा आज फुटला आहे. या खडकाला आतां मध्यें मध्यें भेगा पडल्या असून जीवनाचा झरा त्यांतून वाहूं लागला आहे. त्यांच्या सार्‍या आशा तृप्त न होतां, हें सारें बोलणें

अगदीं फोल झाल्याचें बाह्यतः दिसून आलें, तरी सुद्धां हा परिस्थितीचा बदल अगदींच फुकट गेला असें म्हणतां येत नाहीं.

कंगाल जनतेच्या हृदयांत उत्पन्न झालेल्या या झऱ्याचा ताजेजणा आणि स्वच्छता हीं पाहून आश्चर्यानें मी अगदीं थक्क होऊन गेलों. या कंगालांचीं दुःखें खरोखर किती भयंकर आहेत, याची खरी कल्पना कोणासच येत नाहीं. उच्च वर्गीय लोक त्यांना हलक्या वर्गाचें समजतात आणि त्यांच्या दुःखाकडे कानाडोळा करतात. मनुष्याला लिहितां वाचतां येत नसलें म्हणून तो पशूच झाला असें समजावयाचें काय ? लिहितां वाचतां आल्यावांचून एखाद्याच्या ठिकाणीं खरी माणुसकी उत्पन्न होणें, अगदीं अशक्य आहे काय ? लिहितां वाचतां आलें नाहीं म्हणून त्याचें अनुभवजन्यज्ञानहि फुकट गेलें काय ? छे छे ! असें कधींच होत नाहीं. या वर्गाबद्दलच्या आपल्या साऱ्या कल्पना अगदीं चुकीच्या आहेत. ज्या आपत्ति हे लोक भोगीत असतात,त्याच विपत्ति त्यांना शहाणपण शिकवीत असतात आणि त्याच त्यांचीं हृदयें सुसंस्कृत करीत असतात. त्यांना तुच्छ लेखावें, असा कोणता अधिकार आपणास प्राप्त झाला आहे? ऐषआरामाच्या वस्तूंनीं भरलेल्या नगरांचा त्याग करून ख्रिस्त खेडेगांवांत गेला आणि गरीब शेतकरी वर्गाला त्यानें आशीर्वाद दिला. तो म्हणाला, 'दरिद्री जनहो. तुम्ही खरे पुण्यवंत आहां. कारण स्वर्गाचें राज्य खरोखर तुम्हासाठीं आहे.' किंबहुना दारूविक्यांची आणि उघड-पणें पाप करणारांची संगतीहि ढोंगी श्रीमंतांच्या संगतीपेक्षां ख्रिस्ताला बरी वाटली. पुण्यशीलाचें पांघरूण घेऊन आंतून बदकर्में करणाऱ्या ढोंगी धनवंता-पेक्षां उघड उघड पापें करणारे लोक ख्रिस्ताला अधिक बरे वाटले. कारण यांचीं पापें सर्वांच्या नजरेसमोर असतात. त्याबद्दल सर्वांसमोर ते शिक्षाहि भोगीत असतात आणि कित्येक वेळां तर जरूरीपेक्षां अधिक शासनहि त्यांच्या माथीं पडत असतें. उलटपक्षीं श्रीमंतांचीं पापें चोरून मारून घडतात, एवढेंच नव्हे तर त्यांचीं कित्येक पापें पुण्यकर्में म्हणून गणलीं जातात. यामुळें त्यांच्या साऱ्या पापांचें पूर्ण प्रायश्चित्त या जन्मीं तरी त्यांस भोगावें लागत नाहीं.

पापाचीं प्रायश्चित्तें भोगून गरीबांचीं अंतःकरणें मोकळीं झालेलीं असतात. त्यांच्या मनोभूमिकेंतील विषारी झाडेझुडपें जळून नाहींशीं झालेलीं असतात. यामुळें सत्कर्मांचें बीजारोपण होऊन तीं बीजें फलद्रूप होण्यास तेथें अवकाश उत्पन्न झालेला असतो. या मोकळ्या आणि मृदु अंतःकरणांत धर्माचें बीजारोपण झालें, तर त्याचीं पाळेंमुळें लवकर खोल जातात आणि या वृक्षाची वाढ पुढें मोठ्या

जोमानें होण्याजोगी असते. उलटपक्षीं कृत्रिम शिक्षणानें ज्यांची अंतःकरणें विकृत झालीं आहेत, तेथें धर्मबीजांची जोपासना होणेंच मोठें कठिण असतें. मग त्याच्या फलद्रूपतेची आशा कोठली ? त्या कंगाल लोकांना महात्मा गांधी इतके आपलेसे कां वाटतात ? याचें कारण हेंच की आपल्या सार्‍या दुःखांत महात्माजी समभागी आहेत, ही जाणीव त्यांना आहे. त्यांच्या दुःखानें ते दुःखी होतात. त्यांच्या प्रमाणेंच जाडें भरडें अन्न ते खातात आणि त्यांच्या प्रमाणेंच लक्तरन्याहि ते पांघरतात. या सार्‍या गोष्टी या सामान्य लोकांच्या नजरेसमोरच्या आहेत आणि यामुळेंच त्यांच्या अंतःकरणाच्या कपाटांत गांधी यांस स्थान मिळालें आहे. गांधी पुण्यवंत आहेत, हें आपल्या उपजत बुद्धीनेंच ते ओळखतात आणि उपजत बुद्धीनेंच त्यांजवर ते प्रेम करतात. महात्माजी कोणत्याहि खेड्यांत गेले, तरी त्यांच्या दर्शनासाठीं आजूबाजूचीं सारीं खेडीं धांवत कां सुटतात, याचें रहस्य हेंच आहे. महात्माजी आणि ही कंगाल मंडळी यांच्या हृदयांत अशी समरसता झाली असल्यामुळें त्यांचा साधा उपदेश गरीबांच्या अंतःकरणांत थेट जाऊन भिडतो. दारू आणि दुसरीं मादक व्यसनें यांचा नाश अगदीं अल्पावकाशांत किती कमी झाला आहे पहा ! या समरसतेमुळेंच गरीबांच्या हृदयांतील निराशेचें औदासिन्य मावळून त्या जागीं आशेचा अरुणोदय झाला आहे.

या सार्‍याचा अर्थ काय ? मला जी चिन्हें आज दिसत आहेत, ती खरोखर वस्तुस्थितीचीं निदर्शक असल्यास पुढें काय होणार, हा मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे.

कार्लाइल यानें फ्रेंच राज्यक्रांतीबद्दल एक विचित्र कथा सांगितली असल्याचें मला आठवतें. देशांत मोठी उलथापालथ होऊन भयंकर क्रांति घडून येणार, असें कोणालाहि वाटत नव्हतें. फ्रान्सांतील पंडित मंडळी आपल्या व्यवसायांत गर्क होती, विश्वकोश लिहिणारी मंडळी मोठमोठ्या पोथ्या पुढें ठेऊन त्या वाड्मयांत दंग होऊन गेली होती. इतक्यांत कांहीं लोक त्या जागीं एकदम घुसले आणि म्हणाले, 'अहो, पंडित मंडळी, उठा, आमच्या बरोबर बाहेर चला. आमच्या कंगालांच्या बाजूनें सांवटी तुम्हीं शस्त्र न उचलाल, तर या पुढचे तुमचे ग्रंथ तुमच्या अंगाच्या कातड्यांत बांधले जातील हें ध्यानांत ठेवा.' हिंदुस्थानांत सांप्रत चालू असलेल्या चळवळींचें स्वरूप शांतिमय व धार्मिक असल्यामुळें देव कृपेनें त्याला भयंकरी राक्षसी स्वरूप प्राप्त होईल, असें मला वाटत नाहीं.

हिंदी लोकांच्या अंगीं शांतिप्रियता इतकी खिळून बसली आहे की तिची तोड जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशांत आढळावयाची नाहीं. आज एक हजारांवर वर्षे बुद्धदेवानें जो उपदेश हिंदुस्थानांत केला, तो साराच फुकट गेलेला नाहीं; तथापि यात आणखीहि एक मुद्दा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. हिंदी जनता कितीहि शांत राहिली आणि स्वराज्यसिद्धीसाठीं तिनें तरवार हातीं न घेतली, तरी मुद्दां हा झगडा फार भयंकर स्वरूपाचा होणार आहे. आज सरकारी अधिकारीवर्ग लोकांपासून अगदीं विभक्त झाला आहे आणि हा विभक्तपणाचा आपला बाणा त्यानें असाच कायम ठेवला, तर लोकांच्या हालास सीमा उरणार नाहीं. आणि ज्या सामान्य लोकांतच हा अधिकारी वर्ग राहतो आणि आपली जीवित यात्रा पार पाडतो, त्यानें लोकांच्या पुढाऱ्यांशीं अखेरीस शत्रुत्व केलें, तर सांप्रतच्या या भांडणाला उग्ररूप आल्यावांचून राहणार नाहीं

इ. स. १९०७ सालीं पंजाबांत जी धामधूम झाली, तिची पुरी आठवण मला आहे. या वेळीं एका आणीबाणीच्या प्रसंगांत जनतेशीं प्रत्यक्ष संबंध स्थापण्याचा एक अगदीं साधा मार्ग अधिकारी वर्गास मीं सुचविला होता. एका मोठ्या सरकारी अधिकाऱ्याला ही सूचना मीं केली, तेव्हां, तो एकदम गुरकावून मला म्हणाला, ' समोर पडलेल्या या फाइली पहा.' यावेळीं कार्लाइलनें सांगितलेल्या फाइलीच्या गोष्टीची मला आठवण झाली आणि ती कार्लाइलची गोष्ट मीं त्याला सांगितली.

या गोष्टीला आज एक तपाहून अधिक काळ लोटला; तथापि अधिकारीवर्गाच्या मनोवृत्तींत कांहीं सुधारणा झाली असल्याचें एकहि चिह्न मला दिसत नाहीं. कांहीं फरक असला तर फाइलींची संख्या अधिक झाली असेल इतकेंच. पूर्वीप्रमाणेंच आजहि गिरिशिखराच्या शीत हवेची जरूर अधिकाऱ्यांना भासत आहे. आधींच परकी असलेल्या सरकारचा परकीपणा अधिकाधिक वाढत आहे. राज्यकारभारांत सुधारणा झाल्या आणि हिंदी प्रतिनिधींची सख्या वाढली; तथापि राजशासन परकी तें परकीच. मला स्वतःला या गोष्टीचा चांगला अनुभव चांदपूर येथें आला. सरकारची कसोटी या ठिकाणीं लागून त्याचा हिणकसपणा जगापुढें उघड झाला.

या माझ्या कटु अनुभवाची आणखीहि एक गोष्ट मी सांगतों. हिंदुस्थानांत ज्या पद्धतीनें पाश्चात्य शिक्षणाचा फैलाव झाला आहे, तीमुळें सामान्य जनतेंत आणि सुशिक्षित वर्ग यांमध्यें मोठें खिंडार पडलें आहे.सरकार आणि सामान्यजनता

यांत जसा ताळमेळ नाहीं, तसाच सुशिक्षित आणि अशिक्षित यांमध्यें नाहीं. लोककल्याणाच्या मार्गांत सरकार जसें हिणकस ठरलें, त्याप्रमाणें गरीबांचा विचार चित्तांत न आणतां ज्यानें पाश्चात्य शिक्षण मिळविलें, तो वर्गहि तितकाच हिणकस ठरला आहे. पाश्चात्य राहणीचा अंगिकार करून मोटर उडविण्यांत जे दंग झालेले असतात, त्यांचा संबंध सामान्य जनतेशीं कधींहि येत नाहीं गरीबाशीं संबंध येऊंच नये, अशा प्रकारची त्यांची रहाणी असते, यामुळें सामान्य जनतेच्या दृष्टीनें सरकारी अधिकारी आणि हे मोटर गाड्यांतले सुशिक्षित एकाच माळेचे मणी होत.

महात्मा गांधी यांनीं यंग इंडियांत पुढील मजकूर लिहिला आहे, "वर्षांतून सात महिने देशाचा संबंध तोडून गिरिशिखरावर राहणाऱ्या व्हाइसरायास वस्तुस्थिति कळणें अशक्य आहे; पण जेव्हां व्हाइसरायाची स्वारी राजधानींत असते, तेव्हांहि प्रजा आणि राजशासन यांमध्यें एक अभेद्य खडक आडवा पडलेला असतो. लक्षावधी जनतेची ओरड या खडकावर आदळून फुटत असते. तिचा नाद त्या पलीकडे जाऊं शकत नाहीं. आकाशाशीं भिडलेल्या गिरिशिखरापर्यंत तिचा आवाज जसा उड्डाण करूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें या खडकामुळें पृथ्वीतलावरहि व्हाइसरायाच्या कानापर्यंत ती जात नाहीं."

सरकार दार्जिलिंगास असलें काय अथवा सिमल्यास असलें काय लोकांना त्यांचा उपयोग सारखाच होतो, हें गांधी याचें म्हणणें अक्षरशः खरें आहे.

या यंग इंडियाच्या प्रतींत अब्बस तैयबजी याजकडून आलेलें एक पत्र छापलें आहे. अब्बस तैयबजी याचें बहुधा सारें शिक्षण इंग्लंडांत झालें आहे. यामुळें त्यांच्या सान्याःसंवयी आणि रीतिभाती इंग्रजासारख्या बनल्या होत्या. सारा विलायती पेहराव टाकून देऊन खादीचीं दरिद्री वस्त्रें अंगावर घेतल्यानंतर अब्बस तैयबजी यांस जो अनुभव आला, तो पुढील शब्दांत त्यांनीं व्यक्त केला आहे. ते म्हणतात—

"माझ्या शरीरप्रकृतीबद्दल यत्किंचितहि काळजी करण्याचें कारण तुम्हांस नाहीं, हें मी तुम्हाला खात्रीनें सांगतों. बेझवाडा येथें खादीचीं वस्त्रें मीं अंगावर घेतलीं, त्या दिवशीं मी वीस वर्षांनीं तरुण बनलों. मला येत असलेल्या अनुभवाचें वर्णन मी कोणत्या शब्दांनीं करूं? खेड्यापाड्यांतली बायकामुलेंसुद्धां अत्यंत प्रेमानें आणि आदरानें माझा सत्कार करतात."

"आमच्यांपैकीं कांहीं माणसांच्या ठिकाणीं असावा तसा उत्साह मला दिसत नाहीं. कदाचित स्वतःला ते उच्चवर्गाचे समजत असावेत. मी मात्र आतां उच्च वर्गीयांपैकीं नाहीं. सामान्यजनतेचें माझ्यावरील प्रेम पाहून माझें अंतःकरण आनंदानें भरून गेलें. यांच्यापैकींच मीहि एक झालों आहे, या गोष्टीचा मला अभिमान वाटूं लागला. माझ्या अंगावर असलेल्या फकिराच्या पोषाकानें या उच्चनीच वर्गामधील भिंती पार फोडून टाकल्या आहेत. यामुळें लहानमोठ्या साऱ्या स्त्रीपुरुषांची आणि माझी भेट अगदीं खुल्या अंतःकरणानें होते. त्यांचें हृद्गत मला कळावें, ही माझी इच्छा आतां तृप्त झाली आहे. फेटा, अंगरखा, बूट, पायमोजे, इत्यादि वस्तूंनीं आजपर्यंत माझ्या दीनबांधवांपासून मला कसें विभक्त केलें होतें, याची जाणीव पुष्कळ वर्षांपूर्वीच मला झाली असती, तर किती बरें झालें असतें!"

*अब्बस साहेबांच्या विचारसरणीपुढें आणखीहि एक पाऊल जाऊन मी म्हणतों* कीं जातिभेदामुळें भिन्न वर्गास आलेला विभक्तपणा याहूनहि अधिक भयंकर स्वरूपाचा आहे. विशेषतः कांहीं कंगालांतल्या कंगाल लोकांस अस्पृश्यहि मानण्यांत येतें ही गोष्ट तर मानवजातीला खरोखर लांछनास्पद आहे. सरकारानें गुरखे शिपायी सोडून निराश्रित आणि आजारी लोकांस त्यांजकडून मार देवविला, या गोष्टीनें मला जितका संताप येतो, तितकाच संताप या अस्पृश्यतेचाहि येतो. उच्च वर्गीय लोक आपल्यांतल्याच कांहीं बंधुभगिनींस अस्पृश्य मानून त्यांच्या जीवात्म्याला ज्या जखमा करतात, त्या पाहून माझ्या हृदयांत संतापाचा भडका होतो. दक्षिण हिंदुस्थानांत माझ्या खिस्ती बंधुभगिनीहि या भयंकर भावनेला बळी पडल्या आहेत, हें पाहून खिस्ती या नात्यानें मला खरोखर मोठी लाज वाटते. हिंदु लोकांप्रमाणेंच दक्षिण हिंदुस्थानांतील खिस्ती लोकहि जातिभेद पाळतात आणि खिस्ती धर्म स्वीकारलेल्या हलक्या जातीच्या लोकांस उच्च वर्गीय खिस्ती शिवतसुद्धां नाहींत.

या साऱ्या दुःखदकथेनें माझें अंतःकरण तुडुंब भरून गेलें असतां हा लेख मीं लिहिला आहे. यांत प्रदर्शित केलेल्या विचारांनीं माझें अंतःकरण आज कित्येक दिवस भरून राहिलें आहे आणि यांतले कांहीं विचार तर कित्येक वर्षें माझ्या अंतःकरणांत घर करून राहिले आहेत. अखेरीस मी पुनः पुन्हां हेंच म्हणतों कीं, हिंदुस्थानापुढें असलेला मुख्य प्रश्न गरीबांवरील जुलूम हाच होय.

**सी. एफ. ॲन्ड्रयूज. एम्. ए.**

१४

" कोणत्याहि राष्ट्राच्या स्वाभिमानविषयक भावनांचा नाश होतो, तो त्या राष्ट्रांतील एकमुखी सत्ताधाऱ्यांच्या जुलमी सत्तेपासून होत नसून परकीय सत्तेखालच्या गुलामगिरीमुळें होत असतो. राष्ट्रीय अथवा आपलेपणाची अशी कोणतीहि विशिष्ट भावना एकाद्या राष्ट्राजवळ उरली नाहीं, म्हणजे वैयक्तिक अथवा सार्वजनिकरीत्या स्तुत्य अशा कोणत्याहि गुणाचा परिपोष तेथें होत नाहीं. कारण आपलेपणाची भावना ही राष्ट्रीय सद्गुणांची खाण आहे. हीच मूळभावना नष्ट झाली, म्हणजे विशिष्ट राष्ट्रीयत्व नाहींसें होऊन त्याबरोबरच व्यक्तीचेंहि विशिष्टत्व लोपतें, असें सर टामस मनरो यानें म्हटलें आहे.

हिंदुस्थानच्या राजकीय क्षितिजावर महात्मा गांधी यांचा जो उदय झाला आहे, त्याचें महत्व या देशांतील कांहीं विशिष्ट वर्गास समजत नाहीं, हें पाहून मला पुष्कळ वेळां मोठें नवल वाटे. जो गोष्ट सामान्य मनुष्यासहि कळावी, तिचें महत्व उच्च आणि शिक्षित वर्गांपैकींहि कांहीं लोकांच्या ध्यानीं येऊं नये, याचें मला मोठें नवल वाटे आणि असें कां व्हावें याचा विचार करण्याकडे माझें मन वळलें. हिंदुस्थानांत एक पुरुषार्थी व्यक्ति जन्मास आली आणि खऱ्या स्वतंत्र बाण्यानें आणि पूर्ण मोकळेपणानें ती वावरत आहे, हें पाहून या सज्जनांचीं चित्तें कावरीं बावरीं होऊन ते मोठ्या बुचकळ्यांत पडले असावेत काय? या पुरुषार्थी व्यक्तीचे विचार, तिच्या भावना आणि तिचा आचार, याच्यांतील एकतानता पाहून हे शिक्षित लोक धाबरून गेले कीं, काय? हिंदुस्थानांत इतका स्वतंत्र बाण्याचा पुरुष जन्माला येईल, याचें स्वप्नहि त्या विचाऱ्यांस पडलें नव्हतें. अशा पुरुषाची आकृति नुसत्या कल्पनेनेंहि त्यांच्या चित्तांत कधीं आली नव्हती. पूर्वपरंपरेनें प्राप्त झालेले आचारविचार पुढें ढकलीत जावें, ही संवय त्यांच्या चित्तावर इतकी पक्की बिंबली होती कीं, तो त्यांचा जणूं देहस्वभावच बनून गेला होता. यामुळें पूर्वी कधीं न पाहिलेला असा अपूर्व देखावा एकदम नजरेस पडल्याबरोबर एकदम बिचकून जाऊन त्यांच्या हृदयानें ठाव तर सोडला नसेल ना? मनुष्य या नात्यानें जे हक्क प्रत्येकाला जन्मजात असावयाचे, ते सरसहा पायाखालीं तुडविले जात आहेत आणि या पुढें असा अत्याचार घडूं द्यावयाचा नाहीं, या महात्माजींच्या म्हणण्यांतील अतर्गत रहस्य कळण्याची पात्रताच या सज्जनांच्या आगीं कदाचित् नसेल. ही गोष्ट कळणेंच अशक्य झाल्यावर गांधी यांजबद्दल त्यांच्या बुद्धीस भ्रम पडला असेल. आजपर्यंतच्या त्यांच्या शिक्षणाची दिशा पाहिली तर ती अशीच होती. हिंदु-

स्थानच्या राजकीय परिस्थितींत कांहीं दोष असलेच तर त्यांच्या निवारणासाठीं हात जोडून राजकर्त्यांजवळ याचना करावी, याच मार्गाचें शिक्षण त्यांना जन्मभर मिळालें असल्यामुळें गांधी यांचे मार्ग त्यांना शंकास्पद तर वाटत नसतील ना? राज्यकर्त्यांनीं आपली एकादी अडचण दूर केली, तर आपणावर ती त्यांची मोठी कृपा झाली, असें मानण्याचें शिक्षण जन्मभर त्यांना मिळालें असल्यामुळें गांधी ज्या गोष्टींना हक्क म्हणून म्हणतात, ती वस्तु तरी काय, हेंच त्यांस समजत नाहीं.

माझ्या चित्ताच्या ज्या या शंका मीं वर प्रदर्शित केल्या, त्या खऱ्या असल्या, तर त्यांवरून आपणास एकच निष्कर्ष काढतां येण्यासारखा आहे आणि तो हाच कीं हिंदुस्थानांतील राजशासन आणि प्रजाजन यांजमध्यें असलेल्या सांप्रतच्या परस्पर संबंधात तावडतोब आणि आमूलाग्र बदल होणें अत्यंत जरूरीचें आहे. राष्ट्र या नात्यानें हिंदुस्थानास जगावयाचें असेल, तर हा बदल आजच घडवून आणल्यावांचून गत्यंतर नाहीं. कारण माझ्या वरील शंका अस्थानीं नसतील तर हिंदी-राष्ट्रांचा एक महत्वाचा विभाग पौरुषहीन झाला आहे, ही वस्तुस्थिति निःसंशय सिद्ध होते.

हिंदुस्थानांतील नौकरशाही महात्माजींस पाहून बिचकून गेली, तर त्यांत मला मुळींच नवल वाटत नाहीं. हिंदुस्थानांत वाढलेल्या कोणत्याहि पुरुषानें इतकी खणखणीत स्वातंत्र्याची वृत्ति दाखवावी हें पाहून तिच्या हृदयानें ठाव सोडावा, यांत नवल नाहीं. या लब्धप्रतिष्ठ आणि स्वयंमन्य नौकरशाहीला तसें वाटलें नसतें, तरच मोठें नवल. हिंदुस्थानांतील प्रजाजन आणि तोहि आपल्या बरोबरीच्या नात्याचा! या दोन अहि नकुलांचा एकत्र संगम कधीं काळीं तरी होईल, या कल्पनेवर या नौकरशाहीची उभारणी कधीं झाली नव्हती आणि तिची वाढहि त्या दृष्टीनें झालेली नाहीं. स्वतंत्र पुरुष आणि हिंदी प्रजाजन या दोन वस्तु त्यांच्या दृष्टीनें स्वभावतःच इतक्या परस्पर विरुद्ध आहेत कीं, त्यांची एकत्र कल्पना सुद्धां करणें या नौकरशाहीला अगदीं हास्यास्पद वाटतें. यामुळें महात्माजींस पाहून तिला चुकल्या चुकल्यासारखें वाटणें साहजिक आहे; पण खुद्द महात्माजींच्या देशबांधवांपैकींच कांहीं सुसंस्कृत आणि सुशिक्षित व्यक्ती या स्वयंमन्य नौकरशाहीचीच री ओढतात, तेव्हां हें कांहीं तरी भयंकर दुश्चिन्ह आहे, हें जाणून याचा विचार मोठ्या तातडीनें करणें अवश्य आहे.

महात्माजींची चळवळ पाहून नौकरशाहीप्रमाणेंच कांहीं हिंदी सुशिक्षितहि घाबरून गेले आहेत, हें निःसंशय सिद्ध झालें आहे. महात्माजींनीं सुरू केलेल्या

चळवळीचा परिपाक अखेरीस दंडादंडींत होईल अशी भीति या सुशिक्षितांस खरो-खरच वाटते. आणि अशा परिस्थितीच्या नुसत्या कल्पनेनेंहि त्यांच्या चित्ताला थरथरून कांपरें भरतें. कांहीं संकट आपणावर येणार, अशी एकादी गोष्ट घडत आहे, अशी नुसती कल्पना चित्तांत उभी राहतांच स्वतःच्या असहायतेची आणि दुबळेपणाची कल्पनाहि त्यांना भेडसावूं लागते. एकाद्या अस्मानी सुलतानीच्या वेळीं कांहीं संकट प्राप्त झालें, तर स्वसंरक्षासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे दीनपणें पाहण्याची संवय या मंडळीला लागली आहे. कसल्याहि प्रसंगीं 'मी अमूक करीन ' ही जाणीव त्यांना नाहीं. या परावलंबित्वामुळें आपल्या राष्ट्राच्या कल्याणाचा भारहि कायदेपंडितांवर आणि कायद्यावर त्यांनीं सोंपविला आहे. जगांतील स्वतंत्र राष्ट्रांच्या मालिकेंत हिंदुस्थानाला बसण्याचा योग एकादा वकील आणील, असा भरंवसा यांना वाटतो. त्यांना स्वराज्य तर हवेंच; पण तें सुखा समाधानानें, चैनीनें आणि पोटचें पाणी न हलतां त्यांना मिळालें पाहिजे. *थोडक्यांत इतकेंच सांगावयाचें कीं मोठे बुद्धिवाद करून आणि मतांची उलथापालथ करून स्वातंत्र्य मिळविण्याची त्यांची इच्छा आहे. या मार्गांत कोठें तरी* दंडादंडी होते, अशी थोडीशी शंका आली, तर वसल्या जागींच मुक्काम करण्याचीहि त्यांची तयारी आहे. शरीरावर एकादा ओरखाडा निघतो, अथवा मालमत्तेतील एकादी कवडी जाते, असें दिसूं लागलें, तर तत्क्षणींच 'एकदम सबूर' म्हणण्याची त्यांची तयारी आहे. इतिहासाच्या अरुणोदय काळापासून अशा दुबळ्या मार्गानें स्वराज्यप्राप्ती झाल्याचें एकतरी उदाहरण आजपर्यंत घडून आलें आहे काय ?

स्वराज्य या वस्तूची प्राप्ती शांतपणें अगदीं सिध्या मार्गानें आणि न कळत होईल, असें आम्हा राष्ट्रभक्तांस मुळींच वाटत नाहीं. आणि असल्या उपायांनीं स्वराज्य या नांवाखालीं एकादी वस्तु प्राप्त झाली, तर तिच्यांत कांहीं प्राणांश असेल, असेंहि आमचें मत आम्हांस ग्वाही देत नाहीं. स्वप्नसृष्टि टाकल्याप्रमाणें एकादा गुलाम आपली गुलामगिरी, सहज लीलेनें फेकून देईल, ही गोष्ट आम्हा देशभक्तांस संभवनीय दिसत नाहीं. कोणाचे विचार याहून अन्य प्रकारचे असतील तर त्यांना आम्ही इतकेंच म्हणतों कीं, दुसऱ्या राष्ट्रांनीं स्वराज्याची प्राप्ती करून घेतली, ती या उपायानें नव्हे. त्यांनीं अनंत हाल सोसले. त्यांचीं हृदयें त्यांना पिळवटावीं लागलीं. त्यांनीं देहदंड भोगिले, आपल्या सर्वस्वाला त्यांनीं तिलांजली दिली. आपला जीव तळहातावर घेण्याइतकें प्रचंड धैर्य त्यांनीं प्रगट केलें.

त्यांनीं कोणत्या यातना भोगल्या याचें वर्णन कोणीं करावें! हिंदुस्थानांतील असंख्य अज्ञ जनतेसाठीं ज्या वस्तूची प्राप्ती करून घेण्याच्या इच्छेनें अर्ज, प्रतिनिधित्व, कौन्सिलें इत्यादि उपायांची योजना तुम्ही करतां त्याच वस्तूच्या प्राप्तीसाठीं इतर राष्ट्रांना वरील उपाय योजावे लागले आहेत. स्वराज्य सिद्ध होण्यापूर्वी त्याच्या प्राप्तीसाठीं जे यत्न करावे लागतात, त्या उपायामुळें प्राप्त होणाऱ्या अनुभवाची किंमत स्वराज्यवाद्यांना प्रत्यक्ष स्वराज्यप्राप्तीपेक्षांहि अधिक वाटते. गुलामाकरतां तुम्ही स्वराज्याची प्राप्ती आधीं करून घेणार आणि मग स्वातंत्र्य त्यांच्या गळीं बांधणार; पण या मार्गानें कोणाहि राष्ट्राला स्वातंत्र्याची प्राप्ती आजपर्यंत झालेली नाहीं. स्वातंत्र्य ही देण्या घेण्या जोगी चीजच नव्हे. तिची जोड बाहेरून होणारी नव्हे. पुत्रजन्माप्रमाणें तिचा प्रसव आंतूनच झाला पाहिजे. हिंदमातेनें मुलांप्रमाणें आपल्या कुशींतूनच त्याला बाहेर आणलें पाहिजे. आणि पुत्रजन्माच्या वेळेप्रमाणेंच भयंकर प्रसूतिवेदनाहि तिनें सोसल्या पाहिजेत. तुम्ही ज्याला स्वराज्य म्हणतां, तें स्वतःच्या पोटचें औरस संतान नसून पिंपळाच्या पारावर सांपडलेलें मूल होय.

एका नोकरशाहीची हकालपट्टी करून तिच्या जागीं दुसऱ्या नोकरशाहीची स्थापना करणें हें कांग्रेसपक्षाचें ध्येय नव्हे. हिंदुस्थानांतील मूठभर सुशिक्षितांनीं आणि बोलघेवड्या पंडितांनीं अधिक समजुतदारीनें आणि सहानुकंपेनें हिंदुस्थानावर सत्ता गाजवावी हा स्वराज्याचा अर्थ कांग्रेस पक्षाला मान्य नाहीं. सर्व लोकांच्या कर्मसमुच्चयांतून स्वराज्याचा जन्म व्हावा, यासाठींच त्या पक्षाची ही सारी धडपड सुरू आहे. अखिल हिंदवासीयांच्या जागृत झालेल्या जाणिवेचें व्यक्त रूप म्हणजे स्वराज्य अशी त्याची स्वराज्याची व्याख्या आहे. हें ध्येय सिद्ध करण्याकरतां हिंदमातेला कितीहि प्रसववेदना झाल्या, तरी त्यांकडे शांतपणें पाहण्याची त्याची तयारी आहे. चोरून मारून टोपलींत घालून आणलेलें मूल त्याला नको.

वाटेल त्या आपत्ती भोगण्याची आणि प्रसंगीं सर्वस्वावर पाणी सोडण्याची तयारी, हिंदमातेच्या पुत्रांनीं केल्याशिवाय स्वराज्याची प्राप्ती त्यांना केव्हांहि होणार नाहीं. दुःखाश्रूंनीं जमीन भिजवून अथवा लांब लांब श्वास टाकून हात जोडून तुम्ही बसलां तर तेवढयानेंहि स्वराज्यप्राप्ती तुम्हांस होणार नाहीं. स्वराज्य तुम्हांस हवें असेल, तर रणांगणांत तुम्हास उभें राहिलें पाहिजे. प्राणावरहि पाणी सोडण्यास तुम्ही तयार असलें पाहिजे. हिंद मातेवर

तुमचें इतकें प्रेम असलें पाहिजे की तिच्या स्वातंत्र्यासाठीं प्राणाचा बळी देण्यास तुम्ही तयार असलें पाहिजे. तुमच्या उच्च भावनांनींच या गोष्टी तुमच्या ध्यानांत आल्या पाहिजेत. ज्यांच्या ठिकाणीं स्वात्मप्रत्यय असेल तेच तिच्यावर खरें प्रेम करूं शकतील आणि तेच तिचे पुत्र आपल्या इच्छा तुमच्या स्वप्नसृष्टींत न ठेवतां प्रत्यक्ष सृष्टींत त्या उभ्या करतील. कोरडी आशा करून दुःखाच्या उष्ण श्वासांनीं ज्यांचीं चित्तें दग्ध झालीं आहेत, त्यांच्या ठिकाणीं हिंदमातेचें दर्शन तुम्हांस होणार नाहीं. राखेनें भरलेल्या जागीं ती वास करीत नाहीं; पण हजारों संकटांना तोंड देऊन ज्यांचीं चित्तें प्रफुल्ल झालीं आहेत, त्या चित्तात ती तुम्हास आढळेल. आत्मश्रद्धेला कर्तृत्वाची जोड मिळाल्यामुळें पूर्णत्व पावलेल्या आत्मश्रद्धेंत तिचा वास तुम्हास आढळून येईल.

वरील उद्गार प्राचीन काळच्या एका कवीनें काढले आहेत. त्या काळीं तोंडानें नुसतें अघळपघळ बोलण्याची विद्या लोकांस ठाऊक नव्हती. तोंडानें बोलण्यापेक्षां प्रत्यक्ष कृतीचें धैर्य त्यांच्या ठिकाणीं अधिक होतें. त्या काळाचे लोक नुसत्या स्वप्नसृष्टींत वावरत न राहतां आपलीं स्वप्नें आचारसृष्टींत खरीं करून दाखवीत असत. परमेश्वर सर्वांचा पिता असून अवघी मानवी सृष्टि बंधुभावाची आहे, हें त्यांचें तत्वज्ञान त्या काळीं नुस्तें पुस्तकांत रहात नव्हतें. या गोष्टी तुमच्या तोंडानें बोलण्या पुरत्या खऱ्या आहेत, असें ते समजत नव्हते. या तत्वावर नुसते मोठाले निबंध रचूनच ते स्वस्थ बसत नव्हते अथवा त्यावर मोठमोठालीं भाषणें करण्यापुरतेंच तें खरें आहे, असेंहि त्यांना वाटत नव्हतें. गुढगे टेकून आणि हात पसरून भिक्षा मागण्या जोग्या या वस्तु आहेत, असें त्यांना वाटत नव्हतें. त्या प्रत्येक मनुष्याला जन्मसिद्ध हक्कानें प्राप्त होणाऱ्या असून त्या त्यानें मिळविल्या पाहिजेत. त्यासाठीं हातावर शीर घेऊन रणांगणावर उभें राहिलें पाहिजे आणि संकटांच्या तेजोमय किरणांनीं, सौंदर्यानें उज्वल दिसणाऱ्या ज्या उच्च गिरिशिखरावर त्याचा वास आहे, तेथें उड्डाण करण्यासाठीं धडपड केली पाहिजे.

हिंदुस्थानाला या वस्तूंची पूर्ण कल्पना आतां झाली आहे. परकियांच्या मदत्वाकांक्षेला बळी पडून गुलाम बनलेल्या हिंदी राष्ट्रानें आपल्या शृंखला तोडून टाकल्याचा भावी देखावा हिंदी जनतेला आजच दिसून चुकला आहे. ज्या काळीं हिंदीराष्ट्र वर नजर करून इतर राष्ट्रांच्या डोळ्यांस आपला डोळा समतेच्या हक्कानें भिडवील, त्या काळाचा देखावा हिंदी लोकांच्या मनश्चक्षुपुढें आजच

उभा राहिला आहे. हें उज्वल स्वप्न पाहून आमचीं अंतःकरणें उत्साहानें भरून गेलीं आहेत.

स्वराज्य! ज्याच्या ठिकाणीं स्वाभिमानाचा एखादा अखेरचा तरी किरण शिल्लक राहिला आहे, त्याचें अंतःकरण या विचाराच्या नुसत्या वाऱ्यानेंहि एकदम भरून येईल. स्वराज्य! हा शब्द चित्तांत उभा राहण्याबरोबर उत्साहानें ज्याचें अतःकरण भरून वाहत नाहीं, असा मायेचा पूत कोणी असेल का? स्वराज्यप्राप्तीसाठीं गतकाळीं लोकांनीं न भोगलेलें असें दुःख कोणतें आहे? स्वप्नसृष्टि खरी करण्यासाठीं त्यांनीं सोसले नाहींत, असे हाल तरी कोणते?

भुकेनें व्याकूळ झालेल्या आणि चिंध्या पांघरलेल्या सैन्यानें स्वराज्यप्राप्तीसाठीं निरमक्षिक अरण्यें तुडविलीं आहेत. हिमाच्छादित गिरिशिखरांना आपल्या अनवाणी पायांच्या रक्ताचें स्नान त्यांनीं घातलें आहे. भाकरीच्या तुकड्यांशींहि कित्येक दिवस भेट न झाल्यामुळें त्यांच्या शरीरयष्टी वेळूशीं स्पर्धा करीत होत्या.. डोकें टेकण्यास झाडाच्या सावलीचा आश्रय त्यांना मिळत नव्हता. हिंवाळ्याच्या लांबलचक रात्री पाचोळ्याच्या आगट्या भोंवतीं पडून त्यांनीं काढल्या. थंडगार वारा आणि हिमपात यांमुळें त्यांचीं हाडेंहि गारठून जात होतीं. आपत्तीची ही दीर्घ परंपरा स्वराज्यप्राप्तीसाठीं त्यांनीं आनंदानें भोगली.

स्वराज्यप्राप्तीसाठीं मातांनीं आपल्या पुत्रांचे बळी दिले. स्त्रियांनीं आपल्या पतीस रणांगणावर निजविलें आणि कुमारिकांनीं आपल्या भावी पतीस तोफेच्या तोंडीं दिलें. अखेरचें पाणी पाजण्यासहि जेथें कोणी मिळावयाचें नाहीं, अशा दूरदूरच्या रणांगणावर या आपल्या जिवलग आप्तांस त्यांनीं मरण्यासाठीं पाठविलें *आणि हें सारें स्वराज्यासाठीं!*

पूर्वकाळीं लोकांनीं आपल्या घरादारावरहि तुळशीपत्र ठेवलें. लोकांचे ताबेदार होऊन स्वस्थता आणि धनदौलत यांची प्राप्ती करून घेण्याचा नामुष्कीचा मार्ग स्वीकारण्यापेक्षां, शेतवाडी उध्वस्त झाल्याचा आणि आपल्या घरादारांची राखरांगोळी झाल्याचा देखावा आपल्या डोळ्यांनीं पाहण्याचें त्यांनीं पत्करलें आणि हें सगळें स्वराज्यासाठीं!

ज्यांना उन्हाची तिरिपहि केव्हां लागली नाहीं, अशीं स्त्रीपुरुषें देशोधडीस लागलीं, तुरुंगाचे भयंकर हाल अनेक वर्षें सोसून आपले देह त्यांनीं कष्टविले. चावकाच्या फटकाऱ्याखालीं आपले प्राण त्यांनीं दिले. बंदुकीच्या गोळ्यांना आपली छाती त्यांनीं पुढें केली. मांगांच्या दोऱ्या आपल्या गळ्याभोंवतीं त्यांनीं

अडकवून घेतल्या आणि हें सारें कशासाठी? स्वराज्यासाठी! गुलाम होऊन जगण्यापेक्षां पुरुषार्थ करीत असतां आलेलें मरण त्यांनीं पत्करलें.

सर्व राष्ट्रांत आजपर्यंत झालेल्या अशाच प्रकारच्या स्त्रीपुरुषांस मानाचें स्थान मिळालें होतें. अशाच प्रकारच्या स्त्रीपुरुषांची योजना जगांतील सर्व राष्ट्रांनीं शिरोभागीं करून त्यांस पूज्यनीय मानलें आहे. आणि असें होणें हें सर्वथा योग्यहि आहे. मनुष्यजातीची उच्च भवितव्यता कधीं काळीं प्रत्यक्ष सृष्टींत अवतरावयाची असेल, तर ती अशाच प्रकारच्या आत्मश्रद्धेनें, निर्भयपणानें आणि सर्व स्वार्थांच्या बलिदानानें होणारी आहे.

ज्यांनीं राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून दिलें, त्या पुरुषांनीं भिक्षावृत्तीचा अवलंब कधींच केला नाहीं. समर्थांच्या घरच्या कांहीं तुकडया ताकडयांची प्राप्ती व्हावी म्हणून त्यांच्या द्वारीं ते कुत्र्यासारखे कधींच पडून राहिले नाहींत. स्वतःच्या मनगटाच्या जोरावर जें मिळवतां येईल अशी त्यांची खात्री होती, त्याच्या प्राप्तीसाठीं याचनेचा मार्ग त्यांनीं कधींच स्वीकारला नाहीं. ' परमेश्वर आणि माझी शक्ति ' हाच त्यांच्या डोक्यावरचा मंत्र होता. त्यांचा भरंवसा परमेश्वराच्या ठिकाणीं जसा अढळ होता, तसाच त्यांचा आत्मविश्वासहि अढळ होता. कोणाच्या कृपेसाठीं ते भांडत नसून स्वतःच्या आणि स्वबांधवांच्या हक्कासाठीं त्यांनीं धर्मयुद्धें केलीं. आपणासमोरील शत्रूचें सामर्थ्य आपणाहून अनंतपटीनें अधिक आहे, हें ठाऊक असतांहि केवळ परमेश्वर आणि आत्मश्रद्धा यांजवर भिस्त ठेवून शत्रूंशीं त्यांनीं सामना दिला.

घडण्यास अशक्य अशा दिसणाऱ्या गोष्टी त्यांनीं प्रत्यक्ष घडवून आणल्याचे किती तरी दाखले आहेत. आपलें कार्य सत्य आहे. आणि न्याय्य आहे, याबद्दल त्यांच्या चित्ताची जी बालंबाल खात्री होती, तिजमुळें त्यांस अतुल धैर्य प्राप्त झालें होतें. सत्याचा पाठीराखा परमेश्वर आहे, या दृढ जाणीवेमुळें त्यांस इतकें अतुल बळ प्राप्त झालें कीं त्यांजकडे पाहून प्रतापशाली सम्राटाचें मुखहि म्लान होऊन जावें. स्वतःच्या ईश्वरनिष्ठेच्या आत्मश्रद्धेच्या बळावर या नरश्रेष्ठांनीं मोठमोठ्या शक्तिमान साम्राज्यांचेंहि धुडकें उडविलें. ते खरोखर पुरुष होते. ते पुरुषार्थी होते. संकटाच्या विद्यालयात त्यांच्या जीवात्म्यानें मंत्रोपदेश घेतला होता. सिंहाच्या गुहेंत शिरण्याची आज्ञा झाली, तरी ती शिरसावंद्य करून पुढें सरण्याची छाती त्यांस होती. गतानुगतिकत्वेनें चालणारें जग आपल्या पदाघातानें आपण वांकवूं अशी त्यांची खात्री होती. मी मी म्हणून ते पुढें सरसावले. त्यांत

जो मागें राहिला तोच दुःखी. अशा पुढें सरलेल्या पुरुपार्थी पुरुपांपैकीं महात्मा गांधी हे एक आहेत.

एके वेळीं एक सुप्रसिद्ध हिंदी गृहस्थ मला म्हणाला, 'चमत्कारांचे ते जुने दिवस आतां गेले.' कां, कसे गेले, कधीं गेले ? पूर्वकाळीं चमत्कार घडून आले, ते कशाच्या बळावर ? प्रखर आत्मश्रद्धेच्या सामर्थ्यानेंच ते घडून आले होते, तीच आत्मश्रद्धा आज ज्याच्या ठिकाणीं आहे, त्याला चमत्काराचे दिवस गेलेले नाहींत. चमत्कार घडणे आतां शक्य नाहीं, ही दुबळी भावना ज्याच्या मनांत शिरून बसली असेल, त्याला मात्र चमत्कारांचे दिवस गेले, हें खरें.

हे हिंदी जनते ! स्वराज्यप्राप्ती व्हावी, अशी खरी इच्छा तुला झाली आहे काय ? पूर्व काळीं जगांतील इतर देशांना ही इच्छा जितक्या तीव्रतेनें झाली होती, तीच तीव्रता आज तुझ्या ठिकाणीं आहे का ! स्वराज्यप्राप्तीसाठीं त्यांनीं जसें बलिदान दिलें, तसें तें देण्याची तुझी तयारी आहे काय ? स्वराज्यसाधनासाठीं त्यांनीं जितके आणि जसे हाल भोगले, तितके आणि तसले हाल भोगण्याची तुझी तयारी आहे काय ?

स्वराज्य हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे, तो परमेश्वर निर्मित हक्क आहे, असें तुला खऱ्या दिलानें वाटतें काय ? असा तुझा विश्वास, तुझा पक्का निश्चय आहे काय ? तसें असेल, तर चमत्काराचे दिवस अद्यापि गेलेले नाहींत, ही पक्की खूणगांठ बांधून ठेव. तुझा पक्का निश्चय असेल, तर अशक्य गोष्टीहि तूं खचित घडवून आणशील.

आणि खरें पाहतां अशक्य गोष्टी घडवून आणण्याचेच यत्न स्वराज्यप्राप्तीसाठीं हिंदुस्थानानें केले पाहिजेत. सध्यांच्या भयंकर परिस्थितीचे वेढे तिच्या अगाभोंवतीं इतके घट्ट आवळून बसले आहेत कीं, ते तोडण्यास भगीरथाच्याच प्रयत्नांची आवश्यकता आहे. आणि आपणा हिंदवासीयांपाशीं तितकी आत्मश्रद्धा अद्यापि जिवंत असेल, तर स्वराज्य प्राप्तीचा चमत्कार आजहि घडून येईल. ही आत्मश्रद्धा आणि बलिदानाची तयारी या दोनच गोष्टी हा चमत्कार घडवून आणण्यास आवश्यक आहेत.

हिंदुस्थानाचा खरा पुढारी कोण, हें ठरवावयाचें माप आत्मश्रद्धा हेंच होय. ज्याच्या जवळ ही तीव्र आत्मश्रद्धा असेल, तोच एक आपला पुढारी. त्याचेंच पुढारीपण मोलवान आहे. चमत्काराचे दिवस अद्यापि गेले नसून अशक्य तें

आपण सिद्ध करून दाखवूं अशी ज्याची दृढ भावना असेल, त्याचाच गुरुपदेश तुम्ही घ्या. त्याच्याच पावलावर पावलें टाकून त्याच्या मागून तुम्ही जा. स्वराज्य प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य हिंदमातेच्या आंगीं आहे, असा ज्याचा दृढ विश्वास असेल, तोच तुम्हास स्वराज्याच्या पल्ल्यापर्यंत नेऊन पोहचवील. आपला हा आत्मविश्वास दुसऱ्यांच्याहि हृदयांत उत्पन्न करण्याचें सामर्थ्य ज्याला असेल, तोच आपणास अखेरच्या मुक्कामावर नेऊन पोहोंचवील.

अशा प्रकारच्या पुढाऱ्याची निकडीची जरूर हिंदुस्थानाला आज आहे आणि अशा प्रकारचा पुढारी आज त्याला लाभलाहि आहे, अशी माझी खात्री आहे. त्या पुढाऱ्याला आज पाठिंबा न देणें म्हणजे राजकारणाच्या दृष्टीनें मोठी घोडचूक करणें होय. या पुढाऱ्याच्या कार्यक्रमांतील जो भाग आपणास संमत नसेल, तो चवाठ्यावर मांडून त्याची निषेधपूर्वक चर्चा करणें ही तर राष्ट्राच्या दृष्टीनें मोठीच हानिकारक गोष्ट आहे, असें मला निःसंशय वाटतें. आज दीर्घकालानंतर पुरुषार्थी पुढारी आपणास लाभला आहे. तो प्रामाणिक आहे, निर्भय आहे, आणि उज्वल देशभक्तहि आहे. त्याजवर सामान्य जनतेचा पूर्ण विश्वास आहे आणि आपलें ध्येय सामान्य जनतेला पटवून तिच्या ठिकाणीं उत्साह उत्पन्न करण्याचें सामर्थ्यहि त्याच्या आंगीं आहे. नानाप्रकारच्या शंका आणि कुशंका काढून आणि अकारण भीतीनें त्याला आपण तोंडघशीं पाडलें; तर या कृतकर्मांचा भयंकर पश्चात्ताप करण्याची वेळ खचित येईल. अशा प्रकारचे पुढारी कोणत्याहि राष्ट्राला पायलीचे पंधरा मिळत नसतात. ते अद्यापि इतके सवंग-सुकाळ झालेले नाहींत.

हिंदुस्थानचे पुढारीपण स्वीकारण्यास महात्माजी योग्य आहेत कीं नाहींत, हा प्रश्नच संभवत नाहीं. हिंदुस्थान त्यांच्या मार्गे जाण्यास योग्य आहे कीं नाहीं आणि त्यांच्या आत्मश्रद्धेला एकनिष्ठपणें पाठिंबा देण्याची योग्यता हिंदी राष्ट्राच्या आंगीं आहे कीं नाहीं. इतकाच प्रश्न आहे.

**एस. ई. स्टोक्स.**

---

१५

हिंदुस्थानांत नांव घेण्यासारखे असे दोन पुरुष आज अस्तित्वांत आहेत. एक रवींद्रनाथ टागोर आणि दुसरे महात्मागांधी. मनुष्यजन्माच्या इतिकर्तव्यते संबंधीं प्राचीन ग्रीक लोकांच्या कल्पना रवींद्रनाथ यांच्या ठिकाणीं अवतरल्या

असून त्याच धाटींतल्या येशु खिस्ताच्या कल्पनांचें मूर्तरूप महात्मा गांधी हे होत. रवींद्रनाथ आपणास प्लेटोची आठवण करून देतात. ज्ञान, काव्य आणि अतींद्रिय ज्ञान यांचा एकत्र परिपाक रवींद्रनाथाच्या ठिकाणीं आहे. आपल्या शिष्य वर्गानें याच मार्गानें चालावें, अशी त्यांची इच्छा आहे; पण ही आपली इच्छा आपल्या शिष्यांवर ते जबरीनें लादीत नाहींत. या मार्गाचें ज्ञान शिष्यांनीं स्वबुद्धीनें करून घ्यावें, असा त्यांचा रोख आहे. ते कोणाची स्तुतिनिंदा करीत नाहींत; पण आपल्या मधुरवाणीनें आणि कोमल पद्धतीनें आपल्या शिष्यांचीं अंतःकरणें वश करून घेऊन त्यांच्या बुद्धीला ते चालना देतात. आपल्या काव्याच्या द्वारें उदार आणि उदात्त विचार प्रकट करून अखेरच्या साध्याबद्दल वाचकांच्या मनांत ते उत्साह उत्पन्न करतात. काव्याच्या माधुरीनें वाचकांची अंतःकरणें ते वश करून घेतात. आज साऱ्या बंगाल्यांत त्यांची गणना अलौकिक बुद्धिवान पुरुषांत होते. सुसंस्कृतीबद्दल बंगाल प्रांत सुप्रसिद्ध आहे. आणि या प्रांताच्या विशिष्ट गुणांचें एकत्र रूप कोणास पहावयाचें असेल, तर त्याला तें रवींद्रनाथांच्या ठिकाणीं आढळून येईल. शांतिनिकेतनांतील लताकुंजांनीं युक्त अशा आश्रमांत आपल्या विद्यार्थ्यांशीं ते संभाषणें करीत असतात. प्राचीन काळीं प्लेटोहि अशाच रीतीनें लताकुंजांत आपल्या शिष्यांशीं संभाषणें करीत असे. शिष्यगणासमवेत दुतर्फा लागलेल्या वृक्षराजींतून फिरत फिरत ते बोलत असले म्हणजे क्षणोक्षणीं त्यांच्या मुखांतून निघणाऱ्या नव्या नव्या विचारानें शिष्यांचीं अंतःकरणें आनंदानें भरून जातात. जगांतील सर्व देशांतले कवी, तत्ववेत्ते, आणि कलावान् पुरुष जेथें एकत्र जमतील, अशी एकादी विश्वभारती निर्माण करावी, असा त्यांचा मनःपूर्वक हेतु आहे. कल्पनाआवकाशाच्या शुद्ध वातावरणांतून खालीं कधीं उतरूंच नये, अशा प्रकारचा आपला जीवनक्रम आंखण्याचा यत्न ते नेहमीं करीत असतात. प्रचंड वादळ होऊन धुळीनें दिशा धुंद झाल्या आहेत आणि वाऱ्याच्या झोताबरोबर शुष्क पर्णावली इतस्ततः गिरक्या खाऊं लागली आहे, अशा वेळीं एकादा मनुष्य निर्वात स्थळाचा आश्रय ज्याप्रमाणें मोठ्या औत्सुक्यानें करीत असतो, त्याचप्रमाणें नानामतांचा आणि पंथांचा गलबला दूर ठेवून स्वतःच्या उच्च कल्पनावकाशाच्या निर्भय किल्ल्याचा आश्रय टागोर नेहमीं करीत असतात.

गांधी याहून भिन्न वृत्तीचे मनुष्य आहेत. संसारकर्दमांत लोळणाऱ्या आणि त्यामुळें अंतःकरणानें कठोर बनलेल्या मुंबई शहरांतून महात्माजींचें आगमन

हें शस्त्र शुद्ध धार्मिक स्वरूपाचें दिसत असलें, तरी तें पूर्ण व्यवहार्य आहे. याचा व्यवहारिक आरंभ पदव्या सोडण्यापासून होतो. ब्रिटिश नोकरशाहीनें दिलेल्या मानाच्या पदव्यांचा त्याग करणें ही या मार्गांतील पहिली पायरी होय. यानंतर हळूहळू नोकरशाहीकडून हळूहळू प्रतिकार होत जाईल, त्या मानानें असहकार योगाच्या मार्गांत हिंदी देशभक्तहि पुढें पुढें सरकत जातील. असहकार योगाचें पूर्ण पर्यवसान म्हटलें म्हणजे हिंदी जनतेकडून नोकरशाहीला कोणत्याहि प्रकारचें साहाय्य न मिळणें हें होय. अशा प्रकारचा सर्वव्यापी हरताळ कोणत्याहि पाश्चात्य राष्ट्रानें पाहिलेला नाहीं. उत्तम संघटनेनें असहकार योग यशस्वी झाला, तर हिंदुस्थानांतील ब्रिटिश तरवार अगदीं गंजून जाईल हे उघड आहे. इतकेंच नव्हे तर तरवार उचलण्याचे सामर्थ्य तिच्या हातांतहि राहाणार नाहीं. आजच्या दिवशीं असहकारयोगवाद्यांनीं परदेशी कापडाचा बहिष्कार हातीं घेतला असून त्याला हातमागाच्या पुनरुज्जीवनाची जोड त्यांनीं दिली आहे. सांपत्तिक दृष्ट्या हिंदुस्थानांतील कापडाचा व्यापार परकीयांच्या हातांत असल्यामुळें हिंदुस्थानाचें अर्थशास्त्रहि परकीय हातांत आहे. हिंदुस्थानांतील नाण्याची वासलात परकीयांच्या हातानें लागत असते. बाहेरून येणारी कापडाची आयात बंद झाली, तर त्या देशाचें अर्थशास्त्र त्याच्याच हातांत आल्यासारखें होईल, हें उघड आहे. एवढ्या मोठ्या पैशाचा व्यवहार परकीयाच्या हातांतून निघून हिंदुस्थानाच्या हातीं आला म्हणजे सांपत्तीक परावलंबीपणापासून हिंदुस्थान बऱ्याच अंशानें मुक्त होईल. महात्मा गांधी यांनी ता. १ आगष्ट (१९२१) रोजीं परदेशी कापडाची एक प्रचंड होळी स्वहस्तें पेटवून या बहिष्काराचा जन्मदिवस साजरा केला. रहाटावरील सूत आनि हातमागाचें कापड यांच्या पुनरुज्जीवनाकरितां सुमारें एक कोट रुपयांचा संकल्प हिंदुस्थानच्या राष्ट्रीय महासभेनें सोडला आहे. अशा रीतीनें ब्रिटिश लोकांच्या एका धंद्यावर हल्ला करून या युद्धांत त्यांची एक बगल मारावी, इतकाच गांधी यांचा उद्देश नाहीं. हा बहिष्कार फक्त ब्रिटिश कापडा पुरता नसून जपानी आनि इतर विदेशी कापडासहि तो लागू आहे. कापड विणण्याचा उद्योग हा एक घरगुती धंदा होऊन बसला, तर आपलें आर्थिक स्वावलंबित्व आपल्या हातीं येईल, हा मुद्दा असहकारवाद्याच्या लक्षांत पूर्णपणें आला आहे. हिंदुस्थानांतील हातमाग बुडाले, त्याच दिवसापासून त्या देशांतील संपत्तीला ओहोटी लागून आज तो पूर्ण कंगाल बनला आहे. चरख्याचा गुणगुण आवाज ज्या दिवशीं झोंपड्या

झोंपड्यांतून ऐकूं जाईल, त्या दिवशीं दारिद्र्याला ओहोटी लागून संपत्तीच्या भरतीला पुन्हां सुरुवात होईल, असा असहकार योग्यांस पूर्ण भरंवसा वाटत आहे. हिंदुस्थानांतील या घरगुती कलेचा नाश यांत्रिक शक्तीनें केला आहे. या कलेचें पुनरुज्जीवन म्हणजे आपल्या स्वातंत्र्याचा भक्कम पाया उभारणें होय असें त्यांस वाटतें. हिंदुस्थाननें परकी कापडावर बहिष्कार घातला, याचा अर्थ दुसऱ्या देशांशीं असलेला सारा संबंध त्यानें तोडून टाकला, असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. परस्परांत देवघेव होणें इष्ट आहे, हें तत्व असहकारवाद्यां-नींहि मान्य केलें आहे. त्यांचा बहिष्कार फक्त कापडापुरता आहे.

परकी कापडाचा बहिष्कार असहकार योगाच्या अनेक अंगापैकीं एक आहे. याशिवाय हिंदु मुसलमानादिकांचें ऐक्य, राष्ट्रीय शाळांची स्थापना, अंत्यजोद्धार, मद्यपाननिषेध इत्यादि दुसरीं आंगेंहि या योगांत अंतर्भूत होतात. न्यायतत्वाविरुद्ध असलेल्या कायद्यांचा भंग करण्याची वेळ लवकरच येईल, असेंहि गांधी यांनीं जाहीर केलें आहे. ब्रिटिश न्याय कचेरींत स्वतः तर्फे कोणताहि बचाव करावयाचा नाहीं, असा ठराव राष्ट्रीय सभेनें मंजूर केल्यापासून किती तरी लोक बचावाचें अक्षरहि न उच्चारतां निमूटपणें आजच तुरुंगांत गेले आहेत. तुर्की सरकार किंवा अंगोराचें सरकार यांच्या विरुद्ध इंग्रजांनीं शस्त्र उचललें तर त्यांच्या मदतीस कोणाहि हिंदी सैनिकानें जाऊं नये, अशी आग्रहाची शिफारस राष्ट्रीय सभेनें केली आहे. ब्रिटिश साम्राज्य आणि तुर्कस्थान यांजमध्यें पडलेल्या लढ्यांत हिंदुस्थाननें तुर्कांचा पक्ष स्वीकारला, ही गोष्ट मुसलमानांच्या खिलाफतीच्या प्रश्नामुळेंच घडलेली नसून साम्राज्यसत्ता वाढविण्याच्या कामीं हिंदुस्थानचा पैसा आणि मनुष्यें यांचा अपव्यय होऊं नये, अशी साऱ्याच हिंदी जनतेची इच्छा आहे. हिंदुस्थानांत बारीक सारीक संपांचा सुळसुळाट झाला आहे, याचें मूळ कारण कामकरी वर्गाची दैन्यावस्था हेंच असलें; तथापि त्यांच्या मागें राष्ट्रीय पक्षाची चळवळ अगदींच नाहीं, असें नाहीं. अशा रीतीनें ब्रिटिश सत्तेशीं हा कडू झगडा सुरू झाला असला, तरी गांधी यांनीं स्वतःचें अंतःकरण द्वेषा-पासून पूर्ण मुक्त ठेवलें आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या प्रचंड राज्य-क्रांतीची सारी संहिता आपण चाळून पाहिली, तर इतक्या स्पष्टोक्तीचा खलिता कोणत्याहि राजकारणांत आजवर लिहिला गेला असल्याचें आपणास आढळून येणार नाहीं; पण तो इतका स्पष्ट आणि निर्भीड असतांहि सौजन्य आणि बुद्धि-वादाचा शुद्धपणा त्याच्या इतका दुसरा कोठेंहि आढळावयाचा नाहीं. "कापडाच्या

व्यापाऱ्यांस' आणि मिन्हाइकांस व तसेंच 'प्रत्येक इंग्रजास' या मथळ्याखालीं गांधी यांनीं लिहिलेलीं पत्रें पाहिलीं म्हणजे आमच्या या म्हणण्याचें सत्यत्व कळून येईल.

हिंदुस्थानापासून दूरच्या पल्ल्यावर असलेल्या आह्मासारख्या लिन्हाइतांस मिळणारी माहिती आधीं ब्रिटिशांमार्फत आलेली असते. तशांतून तीहि अगदीं संक्षिप्त आणि पुष्कळ वेळां परस्परविरोधी बातम्यांनीं भरलेली असते; तथापि ह्या साऱ्या विरोधांची आणि संक्षिप्त माहितीची छाननी केल्यानंतर आम्ही जी अनुमानें वर काढलीं आहेत, तीं तर्कशास्त्रदृष्ट्या चुकीचीं ठरणार नाहींत, अशी आमची खात्री आहे. हिंदुस्थानांत राष्ट्रीय पक्षानें चालविलेल्या चळवळीवर नेहमीं तुटून पडणाऱ्या लोकांत जे समवृत्तीचे आहेत, त्यांनीं मुद्दां या चळवळीच्या यशस्वितेबद्दल प्रांजळ मनानें साक्ष दिली आहे. त्यांच्या मतें या चळवळीला इतकें यश प्राप्त झालें आहे, कीं एवढ्या यशाचा वांटा कोणा पक्षाच्या पदरीं पडेल असें कांहीं वर्षांपूर्वी कोणाच्या ध्यानीं मनींहि आलें नसतें. या चळवळीला मिळालेलें यश म्हणजे हा एक अपूर्व चमत्कार आहे, असें ते स्पष्ट म्हणतात. या टीकाकारांना भीति वाटते, ती केवळ भविष्यकाळापुरतीच होय. हिंदुस्थान हा एकच देश नसून तो सतरा देशांची खिचडी आहे, असें हे टीकाकार आम्हास पजावून सांगत असतात. मॅझिनीचा उदय होण्यापूर्वी इटली देशमुद्धां हिंदुस्थाना इतका विस्कळित नव्हता, असें ते म्हणतात.

ते म्हणतात; "हिंदुस्थानांतील आजच्या दारिद्र्याला दुनियेंत कोठें तोड सांपडावयाची नाहीं. हिंदुस्थानाइतके अक्षरशत्रु जगांत दुसऱ्या कोठें सांपडावयाचे नाहींत. जाती आणि पोटजाती यामुळें या साऱ्या जनतेची चाळणी झाली आहे. धर्मभेद आणि भाषाभेद यांचा सुळसुळाट तर विचारूंच नका. देशांतील सधनवर्ग महात्मागांधी यांजपासून अद्यापि विमुक्त राहिला आहे. आपण पेटविलेल्या यज्ञकुंडांत सर्वस्वाची आहुति देऊन पूर्ण विरक्त व्हा, हा महात्माजींचा उपदेश या स्वर्णमंदिरांत पटलेला नाहीं. सामान्य जनतेची अवस्था पाहिली तर ती अद्यापि बाजारबुणग्यासारखी आहे. त्यांच्यांत अद्यापि शिस्तीचा गंधहि नाहीं. गांधीजींच्या चळवळीचें मर्म त्यांच्या तशांत अजून आलें नाहीं. यामुळें असहकारयोगाचा कार्यक्रम संघटनेनें पार पडत नाहीं. त्यांत सुसंवदना नाहीं. अगामांतल्याप्रमाणें कांहीं भंप झाले, तर त्यामुळें दंभ्रम लोकांची अडचण थोडीबहुत होते, हें खरें; पण त्या मानानें मूढ रहिवाश्यांचे हाल कितीतरी

अधिक पटीनें होतात, याचा विचार काय! यामुळें आपलें नाक कापून दुस-ऱ्यांस अपशकून करण्याचा हा प्रयत्न होतो. असहकाराचीं सर्व कामें निस्सीम शांततेनें पार पडलीं पाहिजेत असा आग्रह गांधी यांनीं कितीहि धरला, तरी त्यांच्या चळवळीमुळें सामान्य माणसांच्या वृत्ती बेफाम होतात, यांत शंका नाहीं. या बाबींत आपल्या सहकाऱ्यांचा आणि आपला मतभेद आहे, ही गोष्ट गांधीहि जाणून आहेत. लोक निःशस्त्र झाले आहेत, या गोष्टीचा विषाद खुद्द महात्माजींस मुळींच वाटत नसला; तथापि त्यांचे अनुयायी त्याबद्दल सरकारावर जळफळत आहेत, हें निर्विवाद आहे. हिंदु आणि मुसलमान यांतील ऐक्य केवळ वरवरचें आहे. मुसलमान लोक जात्याच कडवे आणि धर्मवेडे आहेत. खिलाफतीचा प्रश्न अगदीं उराशीं बाळगण्यांत गांधी हे विस्तवाचा खेळ खेळत आहेत, यांत शंका नाहीं."

गांधी यांच्या टीकाकारांचें म्हणणें एवढ्यावरच संपतें असें नाहीं. या चळवळींतील याहूनहि अधिक धोक्याचीं स्थानें त्यांनीं नमूद केलीं आहेत. गांधी यांचे मुसलमान मदतगार अली बंधू यांचे लक्ष हिंदुस्थानाच्या ऐक्यापेक्षां इस्लामाच्या सर्वव्यापी साम्राज्याकडेच अधिक आहे, असेंहि हे टीकाकार म्हणतात. प्राचीन काळाप्रमाणेंच मुसलमानी सत्ता सर्वव्यापी व्हावी, असा अली बंधूंचा खरा मनोदय असल्याचें या टीकाकारांनीं प्रसिद्ध केलें आहे. अखेरीस गांधी यांच्या हातमागाच्या चळवळीवरहि शस्त्र उगारण्यासहि या टीकाकारांनीं कमी केलें नाहीं. गांधी यांची चळवळ मुख्यतः विध्वंसक स्वरूपाची असून तींत विधायक बाबी कांहीं नाहींत, असें ते म्हणतात. महात्माजी सत्पुरुष आहेत, हें त्यांना कबूल आहे. त्याचप्रमाणें नेतृत्वाला लागणारे गुण आणि सामर्थ्य हीं त्यांच्या अंगीं आहेत, हेंहि त्यांना पटतें; तथापि अव्यवहारी इतर संतांप्रमाणेंच महात्माजीहि समाजविध्वंसक आहेत आणि कसल्याहि प्रकारचें राजशासन त्यांना पसंत नाहीं, असा या टीकाकारांचा आक्षेप आहे. गांधी यांच्या चळवळीचें अंतिम पर्यवसान सरकारनें त्यांचा छळ करण्यांत कदाचित् न झालें, तर लोक आपण होऊनच त्यांना पदभ्रष्ट करतील आणि त्यांच्या आवडत्या तत्त्वांना पायाखालीं तुडवतील, असा या टीकाकारांचा अजमास आहे.

या टीकाकारांचा म्हणण्याचा एवढा गोषवारा आम्ही येथें दिला आहे, यावरून त्यांचें म्हणणें आम्हास मान्य आहे, असें कोणीं समजूं नये. आमच्या मान्यतेचें दर्शक म्हणून नव्हे, तर त्यांत अत्यंत विचारार्ह भागहि असल्यामुळें

त्याचा एवढा ऊहापोह, आम्हीं येथें केला आहे. हिंदी राष्ट्राचें भावी स्वरूप काय होणार, ही गोष्ट फक्त कालांतरानेंच निश्चित होणारी आहे. काळाच्या पोटांत असलेल्या घटनेच्या सासळीचे दुवे निश्चितपणें सांगण्याचें काम स्वतः काळावांचून कोण करूं शकणार ? तथापि पाश्चात्य साम्राज्यवादाची अखेरची घटका हिंदुस्थानांत भरली आहे, इतकें म्हणण्यास आज प्रत्यवाय दिसत नाहीं. आशिया खंडांत झालेल्या जागृतींतील एका प्रचंड चळवळीचा इतिहास आज आपल्या नजरेसमोर लिहिला जात आहे. हिंदुस्थानांतील या जागृतीचें स्वरूप मवाळ पक्षाच्या म्हणण्याप्रमाणें सनदशीर मार्गानें चालणाऱ्या आणि गोगलगाईच्या पावलानें होणाऱ्या सुधारणेंत होवो अथवा एकदम उसळून सर्वत्र पसरणाऱ्या बंडांत होवो, अर्धे उपाशी राहणाऱ्या शेतकऱ्यांच्या आणि जात्यांत सांपडलेल्या कामकरी वर्गाच्या माथेफिरू पणांत होवो, अथवा असहकारवाद्यांच्या सुसंघटित धार्मिक आणि आर्थिक प्रयत्नानें चालणाऱ्या असहकारयोगांत होवो, तें कसेंहि असलें तरी आज दीर्घकाळ जुलुमाखालीं चेंगरलेल्या लोकांनीं चालविलेल्या चळवळीबद्दल सर्वांची सहानुकंपा असली पाहिजे, हें उघड आहे. जगांतील सर्व राष्ट्रांत स्वातंत्र्यसूर्याचा उदय व्हावा, अशी ज्याची ज्याची मनःपूर्वक इच्छा असेल, अशा प्रत्येक व्यक्तीनें या चळवळीबद्दल सहानुकंपा बाळगली पाहिजे. महात्मा गांधी यांनीं आखून दिलेला मार्ग अखेरीस यशस्वी होऊन, या झगड्यांत हिंदुस्थानानें जय मिळविला, तर मानवजातीच्या इतिहासांत एका अपूर्व तत्वाचा उदय झाला, असें म्हणणें भाग होईल. स्वातंत्र्याच्या प्राप्तीकरतां, युद्ध करून रक्तस्राव करणें अनवश्यक आहे, हें सिद्ध होईल, इतकेंच नव्हे तर युद्धामुळें मिळणाऱ्या जड स्वातंत्र्यापेक्षां चैतन्यशक्तीनें मिळविलेल्या खऱ्या अंतर्गत स्वातंत्र्याचें महत्व अधिक आहे, हा धडा मानवजातीच्या हृत्पटलावर कायमचा गोंदला जाईल.

न्यूयार्क नेशन.

---

१७

मोहनदास करमचंद गांधी, यांच्या पायावर सारा हिंदुस्थान आज लोळण घेत आहे. हिंदुस्थानांत आजपर्यंत कधींहि अनुभवास न आलेलें, असें नवें वातावरण महात्मा गांधी यांनीं तेथें निर्माण केलें आहे. येरवाली जें मनुष्याचें अखेरचें म्हणून शब्द समजलें जात होतें, त्याचेंच पुनरुज्जीवन करण्याचा यत्न गांधी

आज करीत असून ते स्वतः आपल्या प्रत्यक्ष उदाहरणानें या मार्गाचा धडा घालून देत आहेत. वैराग्य आणि पूर्ण स्वार्थत्याग यांच्या बळावर या गृहस्थानें कांहीं थोड्याशा महिन्यांच्या अवधींत हिंदु आणि मुसलमान यांची एकी करून गौतमाच्या काळापासून आजपर्यंत कधींहि अस्तित्वांत नसलेला बंधुभाव त्यानें या दोन जातींत उत्पन्न केला आहे. गांधी यांच्या कृश आणि श्यामल शरीरयष्टींत प्रचंड विद्युच्छक्ति भरून राहिली आहे. लोहचुंबक लोखंडाचें जसें आकर्षण करतो त्याचप्रमाणें गांधी हे हजारों लोकास आपलेसे करून टाकतात. रुझवेल्ट यांच्याप्रमाणेंच गांधी यांची उद्यमशीलता लोकोत्तर आहे. थकवा हा शब्द त्यांना ठाऊकच नाहीं. प्रसिद्ध अमेरिकन गृहस्थ डेब्ज याच्याप्रमाणेंच गांधी यांचें अंतःकरणहि परदुःखानें विव्हळ होतें. तत्वज्ञानांत ते प्रति टॉलस्टॉय आहेत. अशा रीतीनें अनेक लोकोत्तर व्यक्तींचें समीकरण गांधी यांच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांना स्पर्श करण्यास बलाढ्य इंग्रज सरकारहि भितें. गांधी यांनीं केवळ आपल्या चारित्र्याच्या जोरावर एक अमोघशक्ति आज हिंदुस्थानांत निर्माण केली आहे.

हिंदुस्थानांत एक नवाच पंथ गांधी यांनीं निर्माण केला आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. या पंथाचो माहिती, पाश्चात्यांना अगदींच नाहीं, असें नाहीं. बरनार्डशॉ आणि टॉलस्टॉय यांच्या लेखांचें मनःपूर्वक अध्ययन ज्यानें केलें असेल, त्याला गांधीपंथाची समजूत लवकर पटण्यासारखी आहे. भांडवलवाल्यांनीं आज सामान्य जनतेची स्थिति इतकी करुणास्पद करून ठेवली आहे, कीं तिच्यांतून बाहेर पडावयास कांहीं मार्ग दिसेनासा झाला आहे. किंबहुना सांप्रतच्या साऱ्या संस्कृतीची उभारणीच भांडवलाच्या पायावर झाली असल्यामुळें ही सारी संस्कृतीच विषमय झाली असून तिच्यांत सुधारणा करावयाची म्हणजे ती सारीच मोडून टाकली पाहिजे, अशा प्रकारचा निष्कर्ष आपोआपच बाहेर पडतो. टॉलस्टॉय आणि बर्नार्डशॉ यांची विचारसरणी ज्यानें आपलीशी केली असेल, त्याला या निष्कर्षावांचून दुसरा मार्गच उरत नाहीं. तथापि हिंदुस्थानांत मात्र ही विचारसरणी अद्यापि नवीनच म्हटली पाहिजे. कारण यंत्रशक्तीनें चालणारे उद्योगधंदे आणि भांडवलवाले व मजूर यांच्यांतील तंटे या गोष्टी हिंदुस्थान अजून नव्यानेंच शिकत आहे. या पाश्चात्य पद्धतीच्या संस्कृतीच्या तडाक्यांत तो देश अद्यापि पूर्णपणें सांपडलेला नाहीं. औद्योगिक, राजकीय, बौद्धिक आणि सांपत्तिक अशा स्वरूपाच्या पाश्चात्य सुधारणेचें वादळ हिंदुस्था-

नांत अद्यापि पूर्ण स्वरूपानें सुरू झालेलें नाहीं; तथापि त्याच्या बारीक सारीक झुळका तेथें वाहूं लागल्या आहेत. या वारयाचक्राच्या झपाट्यांत आपला देश सांपडूं नये म्हणून कांहीं उपायांची योजना गांधी अगाऊच करूं लागले आहेत. ते म्हणतात—

"प्राचीनकाळीं लढाया सुरू झाल्या म्हणजे जो तो आपापल्या तोलाचा शत्रु पाहून व्यक्तिशः लढाई करी; पण हा सर्व मनु आतां पालटला आहे. आतां एकाद्या टेकडीच्या पिछाडीच्या आसऱ्याला एक तोफ चालवून एकटा मनुष्य हजारों लोकांचे बळी घेऊं शकतो. हल्लींची सुधारणा आणि संस्कृति ती हीच. पूर्वकाळीं आपल्या मर्जीला येईपर्यंतच माणसें काम करीत आणि तेंहि अगदीं खुल्या हवेंत. आतां हजारों मजूर केवळ पोटाची खळगी भरण्याकरतां कारखान्याच्या लहानशा कोंडलेल्या जागेंत आणि जमीनीच्या पोटाच्या खोल खाणींत काम करीत असतात. त्यांची स्थिति पशूपेक्षांहि आज अधिक वाईट झाली आहे. जीव गमावण्याची भीति आहे, अशा एकाद्या धंद्यांतहि काम करणें आज त्यांना भाग पडत आहे. लक्षाधिशानीं कोट्यधीश बनावें म्हणून लक्षावधी मजुरांना आपले जीव आज तळहातावर घ्यावे लागत आहेत. सांप्रतची संस्कृति इतकी विषमय झाली आहे की, ती आपणच आतां आपला नाश करून घेऊं लागली आहे. तिचा उच्छेद करण्याकरतां कोणताहि उपाय न करतां नुसते हात जोडून आपण स्वस्थ बसलों, तरी अंतर्गत ज्वालेनें आपली आपणासच ती जाळून घेईल."

याकरतां या साऱ्या संस्कृतीचा संबंध तोडून टाकून आपल्या पहिल्या मुक्कामाला परत चला, असा गांधी यांचा उपदेश आहे. पाश्चात्यांना हा उपदेश रानटीपणाचा आणि शुद्ध हास्यास्पद वाटेल आणि वस्तुस्थितीहि तशीच दिसते. चरक्याच्या काळाकडे हिंदुस्थान पुन्हां वळला असून या चळवळीची प्रचंड लाट तेथें उसळली आहे, हें खरें; पण तिचें कारण अर्वाचीन यंत्रकलेचा आणि उद्योगधंद्याचा द्वेष हें नसून इंग्लंडचा द्वेष त्याच्या मुळाशीं आहे. अर्वाचीन संस्कृति हिंदवासीयांना नकोशी झाली, असें नसून त्यांना इंग्लंड नकोसें झालें आहे. वेदकालीन पूर्वजांप्रमाणें प्राथमिक अवस्थेंत जाऊन पडण्याची आवड त्यांच्यांत उत्पन्न झाली आहे, असें नसून नव्या पद्धतीचा द्वेष त्यांच्या चित्तांत भरला आहे.

गांधी यांनी चालविलेल्या चळवळीवर पाश्चात्य टीकाकारांनीं घेतलेले आक्षेप येथवर सांगितले. आतां बाबर शाह गांधी यांचें म्हणणें काय आहे, याचा विचार

केला पाहिजे. ते म्हणतात–" आज विलक्षण हाल आम्ही भोगीत आहों, हें कोणांस सांगावयास नको. कोणत्या तरी रीतीनें या स्थितींतून आम्हास आमची सुटका करून घेतली पाहिजे. या सुटकेचे मार्ग दोन. एक सशस्त्र प्रतिकार आणि दुसरा अशस्त्र प्रतिकार. आम्ही अशस्त्रप्रतिकार केला, तर आमच्या पैकीं कोट्यावधी लोक मुंगयामाशांसारखे चिरडले जातील. आम्हाजवळ शारिरिक क्रियाशक्तीची वाण आहे. दारूगोळा आम्हांजवळ नाहीं आणि तोफा बंदुकाहि नाहींत. अशा प्रकारची तयारी असतां सशस्त्र प्रतिकाराची कल्पना मनांत सुद्धां आणावयास नको. उलट पक्षीं आम्हीं अशस्त्र प्रतिकार केला, तर जयाची आशा तरी आम्हांस आहे. केवळ जड दृष्ट्या आमच्या परिस्थितीचा हा विचार झाला; पण येथें आणखीहि एका बाजूचा विचार केला पाहिजे. आम्ही तलवार हातीं घेतली, तर ती गोष्ट म्हणजे आध्यात्मिकदृष्ट्या आमचें मरणच होय. तरवार हातीं घेणें म्हणजे चैतन्य शक्तीला मूठमाती देऊन जड शक्तीचा आश्रय करणें होय. दुष्टत्वानें दुष्टत्व नाहींसें होत नाहीं. सशस्त्र शत्रूविरुद्ध आम्ही शस्त्र उचललें, तर आम्हीहि त्यांच्याच सारखे नादान व दुष्ट होऊं. मग आमचें श्रेष्ठत्व तें कोठें राहिलें? आम्ही तरवार हातीं धरली म्हणजे द्वेष आणि अर्वाचीन आसुरी संस्कृति, यांच्या पचनीं आम्ही पडलों असें होईल. अशा स्थितींत आमचा जय झाला, तरी तोहि पराजयाइतकाच वाईट आहे. असला जय सुद्धां निःसंशय त्याज्य आहे. जडशस्त्रांनीं मिळविलेला जय, मानवजातीला उपकारक नसून तो अत्यंत हानिकारक मात्र आहे. "

हिंदवासीयांना ही विचार सरणी तावडतोब पटते. गांधी यांचे हे शब्द ते कान देऊन ऐकतात. संत आणि क्रांतिकारक पक्षाचा पुढारी अशा संयुक्त स्वरूपाच्या गांधींना ते देवासारखे पूज्य मानतात. प्रेमानें आपण सारें जग जिंकू आणि सारा मानव समाज प्रेमाच्या एक सूत्रांत ओवून टाकूं अशी गांधी यांची अपेक्षा आहे. ही त्यांची अपेक्षा खरी ठरली, तर मानव जातीच्या इतिहासांत ती गोष्ट न भूतो न भविष्यति अशा अपूर्व स्वरूपाची गाजली जाईल; पण ही चळवळ इतक्या शुद्ध प्रेम स्वरूपाची होईल, असें आम्हांस वाटत नाहीं. कारण गांधी यांच्या गोटात त्यांच्या एका शत्रूनें आजच प्रवेश केला आहे. हा शत्रु म्हणजे द्वेष होय. हिंदी जनतेच्या मनांत पाश्चात्यांबद्दल द्वेषाचें वारें वहात आहे, हें ना कबूल करण्यांत अर्थ नाहीं आणि इंग्रज लोकांबद्दल तिच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला असला, तर तिला दोष तरी कां द्यावा? छातीच्या फांसळ्या बा-

हेर दिसत आहेत, गालांची मापटी बनलीं आहेत, हातांपायांच्या काड्या झाल्या आहेत आणि पोटें फुगलीं आहेत; अशा स्थितींतली मुलें आणि ज्यांच्या डोळ्यांतून मूर्तिमंत क्षुधा बाहेर पडूं पहात आहे; अशीं स्त्री पुरुषें देशभर हिंडतांना पाहिलीं म्हणजे भरतभूमीचें रक्त शोषण कसें झालें असेल याचें मूर्तिमंत चित्र डोळ्यापुढें उभें रहातें. पाश्चात्य मजुर वर्गाची क्रिया शक्ति तिकडच्या भांडवल वाल्यांनीं शोषून टाकली आहे, अशी ओरड आम्ही करतों; पण हिंदुस्थानांतील दारिद्र्य आणि पाश्चात्य देशांतील दारिद्र्य यांची तुलना कोणत्याहि एका शब्दानें व्हावयाची नाहीं. अशा स्थितींत इंग्रजांचा द्वेष हिंदी लोकांनीं केला, तर त्यांत नवल काय ?

प्रति क्रियेला सुरुवात झाली आहे. रक्ताच्या नद्या वाहतील असली भयंकर क्रांति घडून येणें, मला अशक्य दिसत नाहीं, एवढेंच नव्हे तर ती गोष्ट अनिवार्य आहे, असें मला वाटतें. असा विचार गांधी याच्या चित्तांतहि केव्हां केव्हां येतो आणि तो आल्या बरोबर त्यांचें चित्त कंपायमान होतें. हिंदुस्थानच्या आकांक्षांना असलें राक्षसी स्वरूप येऊं नये म्हणून आपणा कडून बनेल ती खटपट प्रत्येकानें केली पाहिजे, असें ते म्हणतात. टॉलस्टॉय यांचें हें तत्वज्ञान कदाचित अव्यवहार्य ठरेल , त्याचा प्रत्यक्ष आचार करणें कदाचित सगळ्यांनाच साधणार नाहीं आणि सांप्रतची अस्वाभाविक आणि विकृत स्वरुपाची संस्कृति कदाचित नष्टहि होणार नाहीं, हें कसेंहि झालें तरी हिंदी लोक आज मोठ्या उदात्त कल्पना जगास देत आहेत, हें खोटें नव्हे. मानव जातीचा तारक म्हणून म्हणविण्याचें भाग्य आज गांधी यांना प्राप्त न झालें, तरी भविष्यत काळचा मार्ग दर्शक या नात्यानें तरी त्यांचें नांव आजरामर होऊन जाईल.

विन्सेंट शॅंडरसन.
( न्यूयार्क हेरल्ड. )

---

१८

राजकारण आणि मनुष्याची सामान्य जीवन परिचर्या या दोन गोष्टी परस्पराशीं इतक्या संलग्न आहेत कीं, त्यांचें साहचर्य सहसादूर होण्या सारखें नाहीं. या दोन गोष्टी परस्परांपासून भिन्न करणें गांधी यांना तरी खचित खपणार नाहीं. कारण राजकारणा भोंवतीं जे दांभिकपणाचें वातावरण पसरलें आहे, तें नाहींसें करून मनुष्याचा जीवनक्रम साधा, सोपा, आणि शुद्ध करणें हें त्यांचें कार्य आहे.

आज ते राजकारणांत पडलेले दिसतात, ही गोष्ट केवळ प्रसंगानुरूप आणि यदृच्छेनें घडून आलेली आहे. ब्रिटिश सरकाराशीं आज युद्धाला तोंड लावून त्याचा सारा क्रोध आपणावर ते ओढून घेत आहेत, ही गोष्ट केवळ यदृच्छेनें घडलेली आहे. गांधी यांनीं स्वराज्याची तुतारी वाजविली आहे, तिचा नाद साऱ्या जगभर दुंदुभून राहिला आहे आणि गांधी यांची स्वराज्याची व्याख्या तरी काय आहे, हें जाणण्यास जग उत्सुक झालें आहे. या गोष्टी सुद्धां केवळ यदृच्छेनें घडून आलेल्या आहेत. त्या घडून याव्या या हेतूनें गांधी यांनीं आपला कार्यक्रम आंखला नव्हता. त्यांचा मुख्य हेतु अखिल मानव जातीचा जीवन क्रम सुधारणें हा होय. मनुष्याच्या रोजच्या परिचर्येला अगदीं साधें आणि स्वाभाविक वळण द्यावें, हें त्यांच्या श्रुतीचें महावाक्य आहे. पाश्चात्य संस्कृतीचे आपण कट्टे शत्रु आहों, असें ते प्रांजलपणें सांगतात. हिंदुस्थानाला स्वराज्य प्राप्त करून द्यावें, ही त्यांच्या महायुद्धांतली एक लहानशी मोहीम आहे. आणि साऱ्या जगाला नवें वळण लावून अवघ्या समाजरचनेचा पाया नवा घालणें, हा त्यांच्या महायुद्धाचा प्रमुख हेतु आहे. या युद्धाकरतां खेळाव्या लागणाऱ्या अनेक डावापैकीं हिंदुस्थानचें स्वराज्य हा एक डाव आहे. या स्वराज्याच्या मोहीमेंत जीं तत्वें ते लागू करूं पहात आहेत, त्याच तत्वांवर त्यांच्या महायुद्धाचीहि उभारणी झाली आहे. ज्या शस्त्रांच्या साहाय्यानें स्वराज्याची लहानशी मोहीम ते यशस्वी करूं पहात आहेत, त्याच शस्त्रांचा उपयोग आपल्या महायुद्धांत ते सर्वत्र करणार आहेत. जे सद्गुण हिंदी जनतेच्या अंगीं आणून तिच्या हातून स्वराज्याची मोहीम ते पार पाडवीत आहेत, त्याच सद्गुणांचा उदय साऱ्या जगभर करून आपलें महायुद्ध ते जिंकणार आहेत. जो नियम या लहानशा मोहिमेंत तोच महायुद्धालाहि लागू आहे. हा मुख्य नियम म्हणजे दंडनीतीचा पूर्ण त्याग हाच होय. हा दंडनीतीचा त्याग नुसता जडदेहापुरताच नसून तो मनानेंहि झाला पाहिजे. मनानें वाचेनें अथवा कृतीनें आपल्या शत्रूवर केव्हांहि शुद्धां पडावयाचें नाहीं, असा त्यांचा आदेश आहे. येथें 'शत्रु' हा शब्दसुद्धां गांधी यांच्या कोशांत सांपडावयाचा नाहीं. ते या शब्दाऐवजीं फार तर प्रतिपक्षी असा शब्द योजण्यास तयार होतील. आतां त्यांच्या युद्धनीतीचें हें महासूत्र प्रतिपक्षी कबूल करणार नाहीं, आणि त्याप्रमाणें तो चालणार नाहीं, हें त्यांस कबूल आहे. तो आपणावर दंडाचा प्रयोग करील, आपले हाल करील आणि आपल्या सर्वस्वाचा नाशहि करील; पण यावर गांधी म्हणतात, की त्याचा

सर्व नाश झाला, तर तें आपल्या आनंदाचें कारण आहे. किंबहुना असा सर्वनाश व्हावा, याच हेतूनें तुम्हीं आपला कार्यक्रम आंखला पाहिजे. सर्वस्वाचा नाश होण्यांत आनंद मानण्याइतकी तुमच्या चित्ताची तयारी नसली, तर किमानपक्ष नाश न होण्याची अथवा त्याविरुद्ध तक्रार करण्याची गोष्ट तरी करूं नका. आपल्या प्रतिपक्षावर प्रेम करा; पण प्रेमकरण्याइतकी चित्ताची समता तुमच्या जवळ नसली, तर किमानपक्ष त्यांच्या अपराधांची क्षमा करून त्यांना प्रतिक्रिया करूं नका. दंडनीति ही सर्वथा त्याज्य असल्यामुळें तिचें निःशेष उच्चाटणच झालें पाहिजे. आत्मा अजिंक्य आहे. त्याचें सामर्थ्य आज निद्रितावस्थेंत आहे, तें जागें करा आणि त्याचा उपयोग करण्यास शिका. कांहीं झालें तरी, सत्याचा मार्ग सोडूं नका. अखेरीस सत्याचा जय निश्चयानें होतो, हा सिद्धांत केव्हांहि दृष्टिआड करूं नका. गांधी यांच्या महायुद्धाचे, हे सर्व सामान्य नियम आहेत. आणि दंडत्याग हें त्यांचें महावाक्य आहे. हें महावाक्य एकवार विदित केलें म्हणजे त्याच्या पोटीं दुसरीं अनेक सूत्रें स्वाभाविकपणेंच निर्माण होतात.

या साऱ्या सूत्रांच्या आधारानें स्वराज्याची मोहीम चालली, तर कसलीहि अनपेक्षित अडचण न येतां आपलें ध्येय सिद्ध होईल, असें गांधी यांचें म्हणणें आहे. सांप्रतची पाश्चात्य संस्कृति आणि सांप्रतची नोकरशाहीची राज्यपद्धति हा सैतानाची प्रजा असल्यामुळें ती नाहींशी करण्यास तिच्याशीं कोणत्याहि प्रकारचें सहकारित्व न करणें हाच योग्य उपाय आहे, असें ते म्हणतात. ज्या मार्गांनीं हिंदी लोकांवर या सैतानाच्या प्रजेच्या शृंखला पडल्या आहेत, त्या मार्गांपासून पराङ्मुख होणें, हा पहिला उपाय आहे. शाळा, न्यायकचेऱ्या आणि कायदे कौन्सिलें या तीन मार्गांनीं या शृंखला घडविल्या जातात. याकरतां आपलीं मुलें काढून घेऊन शाळा ओस पाडा. न्यायाकरतां कोर्टांच्या तोंडाकडे पाहूं नका आणि कौन्सिलाच्या निवडणुकीस मन देऊं नका, असा त्यांचा उपदेश आहे. त्याचप्रमाणें यंत्रकला आणि त्यांनीं चालणारे कारखाने ही शुद्ध सैतानाची प्रजा असल्यामुळें आणि हिंदी लोकांवर गुलामगिरी लादण्याचें हें एक साधन असल्यामुळें त्यांचाहि त्याग करणें अवश्य आहे. याच हेतूनें परदेशी कपड्यावर त्यांनीं बहिष्कार टाकला आहे. प्रत्येक घरांत चरखा फिरला पाहिजे, असें ते म्हणतात. चरख्याच्या घर्मीत गोष्टी यांना अलौकिक सामर्थ्य दिसतें. चरख्याच्या गुणगुण नादानें आत्मा पवित्र होतो आणि त्यापासून निघणाऱ्या व्यायामानें शरीराला-विशेषतः स्त्रियांच्या शरीराला विलक्षण शोभा येते. चरखा आणि हातमाग

या वस्तु केवळ तात्पुरत्या महत्वाच्या नसून त्यांना कायमचें महत्व आहे. कारण पाश्चात्य सुधारणेबरोबर चालणारें युद्ध एक दोन दिवसांत संपणारें नसून तें दीर्घ काळ चालावयाचें आहे. या आपल्या मतांचा प्रसार करण्याकरतां गांधी यांनीं अहमदावाद येथें सत्याग्रह आश्रम या नांवाची संस्था स्थापन केली आहे. येथें येणारे अनुयायी याच शुभोद्योगांत गुंतलेले असतात. जन्मभर या तत्वांचा प्रसार आणि त्यांचें पालन आपण करूं अशी शपथ त्यांनीं घेतलेली असते. असहकार योगाची मोहीम चालविण्याकरतां मधून मधून सामान्य सैनिकांची जी मोठी संख्या लागते, तिची भरती या मोहिमेंतील एका एका विशिष्ट अंगापुरतीच केलेली असते. हीं तत्वें त्यांनीं जन्मभर पाळलींच पाहिजेत, अशी शपथ या सामान्य सैनिकांस घ्यावी लागत नाहीं. लोटांगण घालून नौकरशाही शरण आली आणि आपले पूर्वीचें मार्ग सोडून देण्यास ती तयार झाली, म्हणजे या सैनिकांना घरीं जाऊन आपल्या जुन्या पद्धतीनें आपलें आयुष्य कंठण्यास पूर्ण मुभा आहे. असहकारयोगाचा पूर्ण भर आला, म्हणजे सविनय कायदेभंगाचा उपक्रमहि होणार आहे. कांहीं विशिष्ट कायदे मोडावयाचे आणि कर द्यावयाचे नाहींत, अशी या कायदेभंगाचीं दोन अंगें आहेत. सविनय कायदेभंगाला सुरुवात झाली म्हणजे सरकार खवळून उठेल आणि कडक उपायांची योजना करील, हें उघड आहे; पण सरकारचे उपाय कितीहि कडक झाले, तरी कोणत्याहि प्रसंगीं आणि कोणत्याहि कारणानें दंड नीतीचा अवलंब करावयाचा नाहीं, अशी गांधी यांची सक्त आज्ञा आहे.

मानवी जीवनक्रमासंबंधीं गांधी यांच्या मतांचें आकलन होण्यास अहमदाबाद येथील आश्रमवासीयांनीं पाळावयाचे जे नियम त्यांनीं तयार केले आहेत, ते चांगले ध्यानांत घेतले पाहिजेत. सत्याग्रह आश्रम हें नांवसुद्धां तत्वबोधक आहे. अत्यंत आग्रहानें सत्याचरण करावयाचें असा ज्याचा निर्धार आहे, त्यांच्या निवासाची जी जागा तिचें नांव सत्याग्रह. हा आश्रम अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. यांत खरा जिवटपणा किती आहे, याची कसोटी लागण्याचा प्रसंग त्याजवर अद्यापि आलेला नाहीं. आश्रमाच्या स्थापनेच्या दिवसापासून त्याच्या उत्पादकाचें लक्ष दुसऱ्या अनेक महत्वाच्या बाबींकडे गुंतलें असल्यामुळें आश्रमाच्या पूर्णावस्थेसाठीं उद्योग करण्याची सवडच त्याला झालेली नाहीं. ही पूर्णावस्था येण्याकरतां आश्रमवासीयांची संख्या पुष्कळ वाढली पाहिजे आणि त्याची कडक शिस्त सामान्य जनतेच्या गळींहि उतरली पाहिजे, हें उघड आहे. आज थोड्याशा

उपोषणाचें पाप आपल्या माथीं पडूं नये म्हणून मजुरांच्या मागण्या त्यांनीं कबूल केल्या. युवराजांचें आगमन मुंबईंत झालें; तेव्हां तेथल्या कांहीं असहकार वाद्यांनीं (?) मोठा दंगा केला. या वेळींहि याच उपायांची योजना करून गांधी यांनीं तो तावडतोब बंद पाडला, अशी हकीकत प्रसिद्ध झाली आहे.

गांधी हे पूर्ण त्यागी आहेत. त्याग हा त्यांचा महामंत्र आहे आणि इतरानींहि तोच मंत्र घ्यावा, अशी त्यांची इच्छा आहे. जीविताच्या चाल्ह क्षणीं, जेवढयाची जरूरी आहे, त्याहून अधिक संग्रह करण्याची सवड त्यांच्या दृष्टीनें कोणासहि नाहीं. गरजेहून अधिक संग्रह करणें, हे त्यांच्या दृष्टीनें चोरी करण्या सारखेंच आहे. गांधी आणि त्यांची पत्नी या उभयतांनींहि आपल्या सर्वस्वाचें दान करून टाकलें आहे. वकीलीचा धंदा गांधी पुष्कळ वर्षें करीत होते आणि त्यांत त्यांना प्राप्तीहि चांगली होत होती; पण आतां अंगावरील वस्त्राशिवाय स्वतःचें असें म्हणावयास त्यांच्यापाशीं कांहीं नाहीं. कदाचित पालटण्यापुरतें एकादे अधिक वस्त्र आणि अशीं एकदोन वस्त्रें ठेवण्यापुरती पेटी अथवा थैली, एवढीच गांधी यांची संपत्ति आहे. अहमदाबादेंतील त्यांच्या आश्रमांत आवश्यक वस्तू पेक्षां फाजील अशी एकहि चीज तुम्हास आढळावयाची नाहीं.

प्रत्येकानें आपल्या मेहनतीनें आपल्या गरजा भागवून घ्याव्या, असें गांधी यांचें तत्व आहे. स्वतःला लागणारें धान्य स्वतः मिळवावें आणि स्वतःचें वस्त्र स्वतःच कांतून विणावें, अशी स्थिति गांधी यांस इष्ट वाटते. विद्वान पंडितालाहि दुसऱ्याच्या श्रमाचें खाण्याची परवानगी ते देत नाहींत मेंदूचा विशेष उपयोग करणारांनींहि स्वतःच्या गरजेपुरती शारीरिक मेहनत केली पाहिजे; असें ते म्हणतात. चरखा हें त्यांचें खरोखरच एक खूळ होऊन बसलें आहे. त्याचा नाद त्यांना संगिताहून मधूर वाटतो. सर्वत्र पुरुषांनीं तो हातीं धरला पाहिजे, असा त्यांचा आग्रह आहे. मुलांनींहि पुस्तकें टाकून चरखा हातीं घ्यावा, कायदे पंडितांनीं आपले पुरावे आणि नोटिसा फेंकून देऊन चरख्याची आराधना करावी आणि डॉक्तर लोकांनीं छाती तपासण्याच्या नळी ऐवजीं चरख्याची दोंडी हातीं धरावी, इतकें म्हणण्यापर्यंतहि त्यांची मजल गेली आहे.

आजपर्यंत चरख्यानें तयार झालेला माल जाडाभरडा असाच आहे; पण स्वतःच्या हातानें तयार झालेल्या जाड्याभरडया वस्त्रापेक्षां अधिक भूषणावह अशी चीज कोणती? असा प्रश्न गांधी करतात. त्यांच्या एका शिष्यिणीनें स्वतःच्या हातानें साडी तयार केली. ती नेसून आपल्या गुरूपुढें ती उभी राहिली,

तेव्हां गांधी यांनीं तिजकडे निरखून पाहिलें आणि ही स्वर्गांतील देवता आहे, असें म्हटलें. गांधी यांच्या नजरेला ती खरोखरच सुंदर दिसली असेल, यांत मला शंका वाटत नाहीं.

गांधी यांच्या सूत्रावलींत इंद्रिय निग्रहाला ते पहिलें स्थान देतात. ही तपश्चर्या फार उग्र आहे आणि तिची उपासना अगदीं हळू हळू होईल, हें उघड आहे; तथापि अविरतपणें आणि तीव्र निग्रहानें या मार्गावर सदोदित आरूढ असलें पाहिजे, असें ते म्हणतात. अशा स्थितींत चैनीच्या वस्तूंची मनाई आहे, हें वेगळें सांगावयास नकोच. फार काय; पण सामान्यप्रतीच्या सुख सोयीहि हळू हळू सोडल्या पाहिजेत. या बाबतींत जिव्हा हें इंद्रिय सर्वांत मोठें उत्शृंखल आहे. याकरता त्याचा निग्रह प्रथम केला पाहिजे. जाडीभरडी भाकर ही धर्ममार्गाची पहिली पायरी आहे. या मार्गांत पुढें सरूं पाहणारानें जाड्याभरड्या अन्नांत संतोष मानला पाहिजे. किंबहुना असा संतोष स्वाभाविक बनला, म्हणजे मुमुक्षु पहिल्या पायरीवर आरूढ झाल्याची ती निशाणी झाली. विवाहित स्त्री पुरुषांचा प्रवेश आश्रमांत होऊं द्यावयाचा असेल, तर बहिण भावंडांच्या नात्यानें वागण्याची शपथ त्यांनीं घेतली पाहिजे. गांधी यांच्या हातीं तशी सत्ता असती, तर हा नियम साऱ्या मानवजातीला त्यांनीं सररास लागूं केला असता. अशा स्थितींत मानवजाती नष्ट होईल, हें उघड आहे; पण या अनर्थाची भीति त्यांच्या चित्ताला शिवतहि नाहीं. ते म्हणतात, 'आत्मा अमर आहे. पृथ्वी ओस पडली, तर आपण सारे दुसऱ्या अधिक उच्च परिस्थितीच्या ग्रहावर जाऊन राहूं.' कर्मानुसार वेगवेगळ्या परिस्थितींत मानवी आत्म्याला पुनः पुन्हा जन्म घ्यावा लागतो, हा सिद्धांत ज्याला मान्य असेल, त्याला गांधी यांच्या या मतांत तितका विलक्षणपणा दिसावयाचा नाहीं.

यंत्रकला हें अर्वाचिन पाश्चात्य संस्कृतीचें एक अविभाज्य अंग असल्यामुळें त्याचाहि त्याग करणें अवश्य आहे. यंत्रें हीं सुद्धां सैतानाच्या राज्यांतलीच रहिवाशी आहेत. गिरण्या आणि कारखाने हीं मजुरांची माणुसकी नष्ट करणारीं असल्यामुळें गांधी यांच्या राज्यांत त्यांनाहि स्थान नाहीं. असल्या कारखान्यांतून उत्पन्न होणारें धन शुद्ध पापमूलक अर्थात् त्याज्य हें सांगावयास नकोच. टपाल, तारखातें, आगगाड्या या पदार्थांवरहि गांधी बहिष्कार घालतात आणि याजबरोबरच छापखान्यासारख्या वस्तूहि त्यांच्या मागोमाग जातात. यांतील एखाद्या वस्तूचा उपयोग करणें गांधींना भाग पडतें, तेव्हां त्यांच्या हृदयांत कालवा-

कालव होते. आपलें कार्य त्यांच्या मदतीशिवाय चालावयाचेंच नाहीं, ही जाणीव त्यांना असल्यामुळें त्यांचा उपयोग केल्याशिवाय त्यांना गत्यंतरच नाहीं. ज्याप्रमाणें पृथ्वीवरची हवा दूषित असली, तरी जीवधारणाला अवश्य आहे, तसेंच सांप्रत या वस्तूंचेंहि आहे. काट्यानें कांटा काढावयाचा, याच दृष्टीनें या अर्वाचीन वस्तूंचा उपयोग गांधी करतात. दळणवळणाचीं साधनें पुष्कळ वाढल्यामुळें रोगांचा आणि अनीतीचा प्रसारहि मोठ्या झपाट्यानें होतो. परमेश्वरानें मनुष्याला पाय दिले आहेत, [यावरूनच] त्याहून अधिक गतीच्या साधनांचा उपयोग त्यांनीं करूं नये, ही त्याची इच्छा उघड होत नाहीं काय ? आगगाड्या आणि तसल्याच इतर अर्वाचीन वस्तू सुखसोयी वाढवितात, अशी सामान्य समजूत आहे; पण यामुळेंच इंद्रियजन्य सुखाची लालसा वाढून मनुष्य अधोगतीला जातो, हेंहि खरें आहे. अर्वाचीन वैद्यकहि गांधी यांच्या गदाप्रहरांतून सुटलेलें नाहीं. हें वैद्यक म्हणजे सैतानी चेटुक असून त्याच्या क्रियेनें जगण्यापेक्षां मेलेलें पुरवलें असें ते स्पष्ट म्हणतात. आपल्या हातून वाईट वागणुक झाली, तर एखाद्या भयंकर रोगाच्या भक्ष्यस्थानीं आपण पडूं अथवा सारें आयुष्य आपणास दुःखांत कंठावें लागेल, ही भीति डॉक्टरी औषधामुळें अगदींच नाहींशी झाली नसली, तरी पुष्कळ कमी झाली. हल्लींची जीवन क्रमाची कृत्रिम दिशा मनुष्यानें टाकून दिली, तर रोगांचें निर्मूलनहि आपोआप होईल, असें गांधी म्हणतात.

हीं आणि अशाच प्रकारचीं दुसरीं मतें सामान्य मनुष्याला कठोर वाटतात, पण गांधी यांच्या श्रद्धेंतील हीं सारीं महावाक्यें आहेत. त्यांचें सारें नीतिशास्त्र याच सिद्धांतावर उभारलेलें आहे. या गोष्टी नुसत्या बुद्धीला पटवून घ्यावयाच्या अथवा तोंडानें बोलावयाच्या अशा अर्थाच्या नसून त्यांचा प्रत्यक्ष आचार झाला पाहिजे, असा गांधी यांचा आग्रह आहे. या मतांचा आद्य प्रवर्तक अक्षरशः याप्रमाणें वागत असतो आणि या आचारांत कोठें उणीव आली, तर तो त्याच्या स्वतःच्या दौर्बल्याचें अथवा कुटुंबियांच्या फाजील ममतेचें द्योतक नव्हे. अजारीपणांत कोणाहि डॉक्टराची मदत गांधी घेत नाहींत. त्यांचें अन्न अगदीं जाडें भरडें असतें. स्वहस्तानें विणलेली खादी ते वापरतात आणि एका वस्त्रानिशीं आणि कसल्याहि पादत्राणाशिवाय सार्वभौमाच्या प्रतिनिधीपुढें ते उभे राहतात. भीति या पदार्थाची ओळख गांधी यांस नाहीं. आणि लोकांस जसा उपदेश ते करतात, तसें स्वतः वागण्यास ते कधींहि मागें सरत नाहींत. धार्मिक उन्नतीचा मार्ग शारीरिक कष्टांनीं आणि दुःखभोगांनींच आक्रमण करतां येण्यासारखा आहे,

या मताचें वेडच जणूं काय त्यांना लागलें आहे; तथापि इतक्या कठोरपणांतहि दया आणि अंतःकरणाची मृदुता हे गुण त्यांच्या ठिकाणीं ओतप्रोत भरले आहेत. आमच्या पौर्वात्य पद्धतीनें बोलावयाचें तर त्यांना कृपासागर ही संज्ञा लावता येईल. एका रक्तपित्याची लस आपल्या अंगावरच्या वस्त्रांनीं त्यांनीं पुसल्याचें प्रस्तुत लेखकानें स्वतः पाहिलें आहे. आज हिंदुस्थानांतील सामान्य जनतेच्या चित्तावर गांधी यांचें आधिराज्य कां स्थापन झालें आहे, याचें रहस्य या हकीकतींत सांपडेल. संन्यास वृत्तीचें मूर्तिमंत चित्र गांधी यांच्या ठिकाणीं आहे. आणि यामुळेंच हिंदी जनतेनें महात्मा या पदवीनें त्यांना अभिषेक केला आहे.

आतां गांधी यांच्या अधिक कांहीं मताकडे मी वळतों. हीं मतें अर्थातच दुय्यम दर्जाचीं आहेत. गांधी यांस वर्ण व्यवस्था मान्य आहे; तथापि त्यांना विशिष्ट वर्णांना विशिष्ट हक्क असणें आणि वर्णाभिमान या गोष्टी मान्य नाहींत. मुद्दा इतकाच कीं मुळचे चार वर्ण त्यांना मान्य आहेत, आणि या वर्णांचें स्वरूप मूळाप्रमाणेंच शुद्ध राखलें पाहिजे. चातुर्वर्ण्य व्यवस्था हें हिंदु धर्माचें सार-सर्वस्व आहे, असें गांधी यांचें मत आहेसें दिसतें; तथापि त्यांचें हें मत त्यांच्या शिष्य वर्गापैकीं बऱ्याच मोठ्या भागाला मान्य न होण्याचा संभव आहे. त्यांना आपला धर्म जुनाट पद्धतीनें चालू राहणें हेंच इष्ट वाटतें. हिंदु धर्म अगदीं मूळच्या शुद्ध स्वरूपाला जावा, हें गांधी यांसहि मान्य आहे आणि या करतांच त्यात शिरलेला अस्पृश्यतेचा दोष समूळ नष्ट करण्याचा ते अट्टाहास करतात. कोटयवधी लोकांना उच्च वर्णीय हिंदु लोक अस्पृश्य मानतात, त्यांना स्पर्श करण्याचीहि त्यांची योग्यता नाहीं, असें ते समजतात. हे कोटयवधी लोक मनुष्य प्राण्याला अयोग्य अशा स्थितींत राहतात. या स्थितींतून त्यांनीं वर यावें अशी गांधी याची इच्छा आहे. त्यांना अस्पृश्य मानावें अशा प्रकारची संमति हिंदु धर्म शास्त्रानें कोठेंहि दिली नाहीं, असें त्यांचें म्हणणें आहे. याची उन्नति, त्यांच्या अंतर्गत सुधारणेनें व्हावी, या धोरणानें तशा प्रकारच्या उपायांची योजना गांधी करीत असतात. उच्च वर्णीय लोकांप्रमाणेंच त्यांची राहणी बनविण्याचा उद्योग गांधी करीत आहेत. हे अस्पृश्य लोक सदाचारी होऊन व्यवस्थितपणें वर्तूं लागले, म्हणजे त्याजबद्दल उच्च वर्णीयांच्या मनांत असलेला अनादर हळूहळू कमी होऊन उभयपक्षीं सलोख्याचा मार्ग मोकळा होत जाईल, हें अगदीं उघड आहे.

गांधी यांचीं सामाजिक मतें आणि त्यांचें राजकारण यांची भेसळ त्यांच्या कित्येक अनुयायांनीं कांहीं प्रसंगीं केल्यामुळें त्यांच्या कार्याला कित्येकवेळां धक्काहि बसला. ज्या समाजरचनेंत अस्पृश्यत्वासारखीं भयंकर व्यंगें आहेत, अशा समाजाला राजकीय हक्कांची प्राप्ती झाली, तरी त्यांचा त्यांस कांहीं उपयोग नाहीं, असे ते म्हणतात. समाजाचीं हीं व्यंगें दूर झाल्याशिवाय स्वराज्य हातीं येणार नाहीं, असे त्यांचें म्हणणें आहे; पण राजकीय चळवळीच्या अतिरेकानें समाजांत मोठी खळबळ उडणें ही स्थिति त्याच्या सुधारणेला पोषक होत नाहीं. राजशासन आणि सरकारी अधिकारी वर्ग यांचा सरांस द्वेष करणें ही गोष्ट तरुण अनुयायांच्या ठिकाणीं अगदीं सहजगत्या घडून येणारी आहे. लोकसेवेसाठीं जे स्वयंसेवक बनविण्यांत येतात, त्यांचें काम सरकारला अडचणींत आणणें आणि राज्यकारभाराचा गाडा उलथून पाडणें हेंच आहे, असें त्यांना निःक्षून सांगण्यांत आल्यावर त्यांच्या ठिकाणीं अधिकारी वर्गाबद्दल आणि सरकाराबद्दल द्वेष उत्पन्न झाला, तर तें अनपेक्षित झालें, असें म्हणण्याचें कारण नाहीं.

मुलांच्या शिक्षणाची पद्धत कशी असावी आणि शिक्षणाचें अखेरचें ध्येय काय, याचें अगदीं खुलें स्पष्टीकरण महात्माजींनीं अद्यापि केलें नाहीं. अगदीं लहान मुलांसमुद्धां जबरीनें शिक्षण द्यावें ही गोष्ट त्यांना पसंत असेल असें वाटत नाहीं. त्याचप्रमाणें उच्च रसायनशास्त्र, यंत्रकला, प्राचीन वस्तुसंशोधन, अर्थशास्त्र इत्यादि अर्वाचीन शास्त्रांनाहि त्याच्या साध्याभोळ्या व्यवस्थेंत स्थान मिळेल, असें वाटत नाहीं. सर्व हिंदुस्थानाची एक भाषा असावी, अशी गांधी यांची इच्छा असून या दिशेनें ते अविश्रांत खटपट करीत असतात. हिंदुस्थानची एक भाषा हिंदी हीच होऊं शकेल, असें त्यांचें मत आहे. या भाषेच्या ज्ञानाचा प्रसार करण्याकरतां आपल्या नेहमींच्या मनःपूर्वकतेनें त्यांनीं द्रव्यनिधीहि जमा केला आहे आणि त्यातून हिंदी भाषागुरु देशभर पाठविण्याची व्यवस्थाहि त्यांनीं केली आहे. हल्लीं असहकारितेची लाट विशेष जोरांत उसळत असल्यामुळें या बारीक सारीक गोष्टींवरील त्यांचें लक्ष अर्थातच कमी झालें आहे. शिक्षणपद्धतीसंबंधी महात्माजींचीं मतें अद्यापि बऱ्याच लोकांना कदाचित मान्यहि झालीं नसतील, यामुळें हिंदुस्थानची एक भाषा व्हावी, या त्याच्या मताला मिळावी तितकी पुष्टी मिळाल्याचें दिसत नाहीं.

प्रस्तुत लेखक गांधी यांच्या राजकारणी शिष्यवर्गापैकीं नाहीं. अथवा त्यांच्या धर्ममताचाहि तो अनुयायी नाहीं; तथापि गांधी यांस तो कांहीं वर्षें ओळखीत

एक मोठें कोडें होऊन बसलें आहे. विशेषतः अट्टलदारूबाजांना त्यांचें नांवसुद्धां खपावयाचें नाहीं. त्यांजवर अशा प्रकारें अगदीं तुटून पडणारे लोकहि त्यांची मनःपूर्वकता, त्यांची दानत, आणि त्यांचें कर्तृव्य यांजबद्दल शंका घेत नाहींत. अशा प्रकारच्या लोकांना गांधी यांची मूर्ति दैवीशक्तीसारखी दिसत नसून त्यांना ती सैतानी कृतीसारखी वाटते. गांधी यांस परमेश्वरानें घडविलें नसून सैतानानें घडविलें आहे, असें म्हणणारे लोक पुष्कळ आहेत आणि याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेवर गांधी तुटून पडतात हेंच होय. गांधी यांजविरुद्ध जें जें कांहीं बोलतां येण्यासारखें आहे, तें सारें बोलून संपल्यानंतरहि त्यांची उज्वल मूर्ति आकाशांतील छायाचित्राप्रमाणें या हलयाच्या धुक्यांतून स्पष्ट दिसते. जगाच्या आजपर्यंतच्या इतिहासांत कोणाहि एका व्यक्तीनें एकाच उद्योगांत आपला सारा जन्म घालवूनहि जेवढें यश संपादन केलें नसेल, तेवढें यश केवळ दोन वर्षांच्या अवधींत आपल्या शुद्ध दानतीच्या बळावर महात्मा गांधी यांनीं संपादिलें आहे.

दारूचे मक्ते देण्याचें सरकारी वर्ष हिंदुस्थानांत एप्रील महिन्यांत संपतें. हिंदुस्थानांत सध्यां दारूचा खप इतका कमी झाला आहे कीं, जमावंदींत येणाऱ्या तुटवड्याचें स्वरूप पाहून मत्तयावरील अधिकारी वर्ग अगदीं घाबरून गेला आहे. दारूचा खप धडकून चालला पाहिजे अशी या अधिकाऱ्यांची इच्छा असावी हें स्पष्ट दिसतें. त्यांच्या दृष्टीनें दारूचा खप वाढण्यांत दोन फायदे आहेत. एक सरकारची तुमडी भरपूर भरते आणि दुसरें दारूबाजांस लागलेली तहान शमते.

हिंदुस्थानाचा बहुतेक भाग मी फिरून आलों आहें. आणि मुख्य सरकारी अधिकाऱ्यांचीहि भेट जागोजाग घेऊन त्यांच्याशीं मी वादविवादहि केला आहे. हे सर्व मला एकच रडकथा सांगतात. दारूच्या खपांत विलक्षण तुटवडा पडला असून त्यामुळें सरकारी तिजोरीहि बरीच रिकामी राहूं लागली आहे, असें या सर्वांनीं मला सांगितलें. मद्रास इलाख्यांतील नेलोर जिल्ह्यांत गेल्या सालीं दारूचें उत्पन्न एक लक्ष अड्डसष्ट हजार रुपये झालें होतें, तें यंदाच्या सालीं दोनशें अठ्ठावीस होईल, असा अजमास तेथील सरकारी अधिकाऱ्यानें मला सांगितला. अशा प्रकारें जेथें भयंकर सूट आली नाहीं, असा एखादा तरी जिल्हा हिंदुस्थानांत असेल असें मला वाटत नाहीं. नाहीं म्हणावयास मलवार प्रांतांत मात्र दारूचें उत्पन्न कमी झालें नसल्याचें एक उदाहरण मला आढळून आलें. या ठिकाणीं लष्करी कायदा पुकारलेला होता आणि त्रासदायक असहकारवाद्यांना येथें

मज्जाव झाला होता. एप्रील महिन्यापर्यंत आहे ही स्थिति कायम राहिली, तर किमान पक्ष सरकारचें अर्धें उत्पन्न पूर्ण नाहींसें होईल, यांत शंका नाहीं. एकंदर सरकारी अधिकाऱ्यांपासून जी माहिती मला मिळाली, तिच्याच आधारानें हा अजमास मीं सांगितला आहे. शेंकडों खेड्यांत दारूचा थेंबहि आढळावयाचा नाहीं आणि ही सारी कृति या अर्धनग्न मनुष्यानें आपल्या अत्युच्च दानतीनें घडवून आणली आहे. केवळ शाब्दिक उपदेशापलीकडे दुसरा कोणताहि उपाय त्यानें योजिलेला नाहीं.

पुष्कळ मक्तेदार या चळवळीमुळें भयंकर नुकसानींत आले आहेत आणि उरले सुरलेले त्या मार्गाला लागले आहेत. सर्वांत अधिक किंमत येईल त्याला दारूविक्रीचा मक्ता द्यावयाचा अशी पद्धत हिंदुस्थानांत आहे. मोठ्या चढाओढीनें हे मक्तेदार अवाच्या सवा किंमती देऊन कंत्राटें मिळवितात. मग दिलेली किंमत आणि शिवाय तीवरील नफा इतकी वसुली करण्याकरतां दारूची पिपेंच्या पिपें गिऱ्हाइकांच्या घशांत त्यांना ओतावीं लागतात. त्याला कधीं काळीं नुकसान आलें, तर आपल्या वसुलींपैकीं एक पैसुद्धां सोडण्या इतकी दया सरकार दाखवीत नाहीं.

हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या प्रांतांत हिंडून शेंकडों दारूचीं दुकानें मीं स्वतः जाऊन पाहिलीं, त्यावेळीं तीं अगदीं ठणठणीत पडल्याचें मला आढळून आलें. साऱ्या दिवसांत एकदोनशिवाय अधिक गिऱ्हाइकें येत नाहींत, असें या लोकांनीं अगदीं दीनवाणीनें मला सांगितलें. असें कां म्हणून विचारतां 'गांधींचा हुकूम' हें एकच उत्तर मला सर्वत्र मिळालें. कटक येथील मुख्य गुरुंग मी जाऊन पाहिला, त्यांतील स्वच्छता आणि सोयी अमेरिकेंतील तुरुंगाच्या इतक्याच चांगल्या आहेत, असें मला आढळून आलें. येथें चारशें कैदी ठेवण्या इतकी सोय आहे आणि नेहमीं हा तुरुंग भरलेला असे; पण अलीकडे ही संख्या कमी होत होत आतां ती १३८ पर्यंत येऊन पोंचली आहे असें, तेथल्या मुख्य अधिकाऱ्यानें मला सांगितलें. याचें कारण काय असा प्रश्न मीं केला, तेव्हां त्यानें उत्तर दिलें, 'हें सारें गांधी यांच्या असहकारयोगाचें फळ आहे.'

असले विलक्षण चमत्कार घडवून आणणारा हा इतका अलौकिक शक्तिमान प्राणी आहे तरी कोण ? याचें सगळें नांव मोहनदास करमचंद गांधी असें आहे. गांधी यांचा जन्म ता. २ आक्टोबर सन १८६९ रोजीं झाला. गांधी यांना सामान्य लोकांनीं महात्मा हें नांव आतां दिलें आहे. महात्मा या शब्दाचा

अर्थ परमेश्वर असा होत नसून साधुपुरुष अथवा अत्यंत आदरणीय मनुष्य इतकाच होतो. गांधी यांचीं मातापितरें खाऊन पिऊन सुखी अशा स्थितींत होतीं. हें कुटुंब रहात असलेल्या प्रांतांत जैन धर्मियांची वस्ती पुष्कळ आहे. या लोकांनीं आपल्या कांहीं धार्मिक कल्पना अगदीं अतिरेकाला नेल्या आहेत. कोणाचाहि जीव घेणें अथवा कोणा जीवाला इजा होईल, अशी वर्तणूक करणें, हें या लोकांच्या दृष्टीनें महापातक गणलें जातें. संध्याकाळ झाल्यानंतर हवेंतील बारीक बारीक कीटक नाकातोंडांत जाऊन मरूं नयेत म्हणून यांतील पुष्कळ लोक तोंडाला पडदा बांधतात. एका जैन पंथाच्या मोठ्या तात्त्विक पुढाऱ्याशीं माझी मुलाखत झाली होती. बोलतां बोलतां जीवदयेबद्दल प्रश्न निघाला; तेव्हां ढेंकणांनीं भरलेल्या अंथरुणांत रात्रभर निजून त्यांना जगविणाऱ्या मनुष्याचें हृदय किती उच्च असलें पाहिजे, याचें रसभरित वर्णन त्यानें मोठ्या गंभीरपणें केलें. वाघाकडून स्वतःचें शरीर भक्षण करवून त्याची क्षुधा तृप्त करण्याइतका मोठा यज्ञ कोणताहि नाहीं, असेंहि तो म्हणाला. अहमदाबादेंत पिसाळलेलीं कुत्रीं मारणेंसुद्धां किती त्रासदायक होतें, याचें वर्णन तेथल्या एका मोठ्या सरकारी अमलदारानें केलें. एक कुत्रें मारल्याचें वर्तमान गांवांत समजलें, तर गांवभर दंगे सुद्धां होतील, असे तो म्हणाला.

अगदीं लहानपणीं सुद्धां गांधी यांची वृत्ति स्वतंत्र बाण्याची होती. अमुक पदार्थ खाऊं नको, असें वडिलांनीं म्हटलें तर यांनीं मुद्दाम तो खावा. अशा रीतीनें केवळ हट्टामुळें ते मांसहि खात असत. कोठारामागें चोरून उभें राहून अमेरिकन मुलें विड्या ओढतात, तसेंच गांधींचें हें वर्तन होतें. पुढें विलायतेस विद्याभ्यासासाठीं जाण्याचा प्रश्न निघाला, तेव्हां दारू पिणार नाहीं, मांस खाणार नाहीं आणि कोणाहि स्त्रीशीं संबंध ठेवणार नाहीं, अशा तीन शपथा गांधी यांजकडून त्यांच्या आईनें घेवविल्या, आणि गांधी यांनींहि या शपथा अगदीं तंतोतंत पाळल्या. विलायतेंत कायद्याचा अभ्यास संपून मुंबईला वकिली करण्याच्या उद्देशानें गांधी परत आले.

दक्षिण आफ्रिकेंत एका मोठ्या महत्वाच्या कज्जांत गांधी यांस वकीलपत्र मिळालें; पण 'काळा अदमी' म्हणून तेथील कोर्टानें त्यांना मज्जाव केला. तेव्हां गांधी यांनीं मोठ्या जोरानें भांडून वकिली करण्याचा आपला हक्क सिद्ध केला. पुढें लवकरच तेथें झालेल्या शांतिमय युद्धाचा हाच प्रारंभ होय, असे म्हणण्यास हरकत नाहीं. हिंदी लोकांना सामान्य हक्क सुद्धां नाहींत, याचा प्रत्यक्ष अनुभव

अशा रीतीनें झाल्यानंतर ते प्राप्त करून घेण्याच्या उद्योगाला गांधी लागले. हें शांतिमय युद्ध दक्षिण आफ्रिकेंतील इतिहासाचा एक महत्वाचा भाग होऊन बसलें आहे. या युद्धांत कित्येक वेळां आणि कित्येक महिनेपर्यंत गांधी यांनीं कारागृहवास भोगला आहे. अखेरीस या युद्धांत त्यांना यश मिळालें. ही सारीच कथा मोठी रमणीय आणि महत्वाचीहि आहे.

या काळात टॉलस्टॉय यांचे ग्रंथ, भगवद्गीता, बायबल इत्यादि ग्रंथांचा अभ्यास त्यांनीं केला. त्यांतील तत्वज्ञानानें त्यांची सारी विचारसरणी बदलून त्यांच्या जीवनक्रमाला नवें वळण मिळालें. हाच आयुष्यक्रम दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर दृढ होत गेल्यामुळें गांधी आज या युगांतील श्रेष्ठतम पुरुष होऊन बसले आहेत. ख्रिस्ताच्या दहा आज्ञा त्यांनीं पाहिल्या; तेव्हां त्यांतील नीति-सिद्धांत त्यांच्या बुद्धिला पूर्णपणें पटले. नीतीचा शुद्ध आदर्श यांत आहे, असें त्यांस कळून आलें. विचाराच्या नव्या मुशींत गांधी यांच्या चरित्राला जें नवें वळण लागलें, त्यांत या दहा आज्ञांनीं बरेंच कार्य केलें आहे. सत्याग्रहाची उत्पत्ति यांतून झाली आणि असहकारयोग ही सत्याग्रहाचीच पुढची पायरी आहे. या असहकारयोगानें सारें ब्रिटिश साम्राज्य आज हलून गेलें आहे. सत्यशोधनाच्या बाबींत गांधी यांच्या विचारसरणींत अथवा प्रत्यक्ष वर्तणुकींत लपवाछपवीचा अथवा दंभाचा प्रकार मुळींच नाहीं. बुद्धीला पटेल तें बोलावयाचें आणि तसेंच प्रत्यक्ष वागावयाचें असा त्यांचा निश्चित क्रम आहे. सारासार बुद्धीला पटलेल्या एखादा मार्गाचा अवलंब गांधी यांनीं एकवार केला, म्हणजे मध्यंतरीं कोठेंहि मुक्काम न करतां अखेरच्या मुक्कामापर्यंत ते निश्चयी वृत्तीनें चालत जातात.

महायुद्ध झाल्यानंतर दोन वर्षेपर्यंत गांधी हे ब्रिटिशसरकारचे कट्टे भक्त होते. फार काय या बाबींत आडमुठ्या जन्मजात इंग्रजांला मुद्दां त्यांनीं लाजविलें होतें. बोअर युद्धाच्या वेळीं इंग्रजी लष्करांत त्यांनीं नोकरी केली आणि त्याबद्दल मुद्द् सेनापतीनें आपल्या खलित्यांत त्यांची स्तुति केली होती. महायुद्ध सुरू झालें, तेव्हां गांधी लंडनांत होते. तेथें लंडनांतील थटीचशें हिंदी रहिवाशांची स्वयंसेवकांची एक तुकडी तयार केली होती. या तुकडीनें कोणताहि मोबदला न घेतां आपलें काम केलें. यानंतर थोड्याच दिवसांनी प्रकृति बिघडल्यामुळें गांधी हिंदुस्थानांत आले.

इ. स. १९१८ साली संयुक्त राष्ट्राची लष्करी स्थिति मोठी हलाखीची झाली होती. कोणत्याहि मार्गानें लष्करी भरती करण्यासाठीं हीं राष्ट्रें धडपडत होतीं. मुख्य प्रधान डेव्हिड लाइड जार्ज यांनीं सार्‍या ब्रिटिशसाम्राज्याला मोठ्या कळकळीनें विनंती करून सैन्यभरती करण्यास विनविलें. या भरतीपैकीं हिंदुस्थानाकडे आलेला भाग पुरा करण्यासाठीं गांधी यांनीं इतकी जिवापाड मेहनत केली कीं, नऊ महिन्यांचें काम त्यांनीं सातच महिन्यांत उरकून पार केलें. पुढें लवकरच युद्धाची तहकुबी झाल्यामुळें लष्करभरतीचें काम बंद झालें. हिंदी लोकांना लष्करी नोकरींत शिरतांना ज्या नानाप्रकारच्या मानहानीच्या अटी सोसाव्या लागतात, त्याजविरुद्ध यावेळीं पुष्कळ ओरड झाली असतांहि तिकडे लक्ष न देतां अथवा ब्रिटिशसरकारला अडवणुकीच्या गोष्टी न सांगता आपलें काम गांधी यांनीं अव्याहत सुरू ठेवलें होतें. युद्धसमाप्तीनंतर हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य मिळेल, असें वचन प्रधानमंडळाकडून मिळवावें अशा अर्थाचा एक ठराव राष्ट्रीय सभेंत आला असता गांधी यांनीं तोसुद्धां फेटाळून लावला.

महायुद्ध सुरू असतां हिंदुस्थानच्या रक्षणाचा कायदा या नांवाचा एक कायदा पास झाला. इंग्लंडांत असलेल्या अशा कायद्याच्या धरतीवरच या कायद्याची रचना झाली होती. या कायद्यानें सामान्य प्रजाजनांचें स्वातंत्र्य बहुतांशीं संपुष्टांत आणलें होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. वास्तविक पाहतां हें 'कायद्याचें शस्त्र साम्राज्याच्या शत्रूच्या निर्मूलनासाठीं बनविलें होतें; पण प्रत्यक्ष व्यवहारांत हें मूलतत्व बाजूला सारून हिंदुस्थानांतील नोकरशाहीनें त्याचा उपयोग हिंदुस्थानांतील अतस्थ राजकीय चळवळ दडपून टाकण्याकडे केला. हें काम सरकारी अधिकार्‍यांनीं इतक्या अट्टाहासानें चालविलें कीं, त्यामुळें हिंदुस्थानांतील प्रजाजनांत क्षोभ उत्पन्न झाला. अॅनी बेझांटसारख्या अत्यंत राजनिष्ठ प्रजाजनाना सुद्धां तीन महिने पर्यंत बंदिवास सोसावा लागला. बिझांटबाईच्या चळवळीचा संबंध कोणत्याहि प्रकारें युरोपीय युद्धाशीं जोडता येण्यासारखा नव्हता. त्याचें यशापयश बाईच्या चळवळीवर कोणत्याहि प्रकारें अवलंबून नव्हतें. तिचें राजकारण फक्त हिंदुस्थानांतील अंतस्थ परिस्थितीसंबंधानेंच होतें; पण हा मुद्दा लक्षांत न घेतां मद्रास सरकारानें ही चळवळ दडपून टाकण्याकरतां बाईची उचलबांगडी केली. युद्धसमाप्तीनंतर रौलट कायदा पास झाला. यामुळें हिंदुस्थानांतील असंतोषाची आग एकदम भडकून तिचे परिणाम स्पष्टपणें दृग्गोचर होऊं लागले. पंजाबाची कत्तल, हा प्रकार याच असंतोषांतून निर्माण झाला.

या माऱ्या प्रकारामुळें गांधी यांचें चित्तहि पालटलें. पूर्वीचे राजभक्त गांधी आतां शिल्लक राहिले नाहींत. यानंतर लवकरच गांधी यांनीं आपली असहकारितेची मोहीम सुरू केली.

गांधी हे युद्धकुशल सेनानी असल्यामुळें या प्रसंगीं तोंड कसें लावावें, हें बरोबर ओळखून त्यांनीं चढाईच्या डावास सुरुवात केली. शत्रूच्या व्यूहांतील मर्मस्थान कोठें आहे, हें जाणून त्यांनीं आपला पहिला हल्ला चढविला. हें मर्मस्थान म्हणजे दारूचा व्यापार हेंच होय. हिंदुस्थानांत इंग्रज लोकांनीं दारू पहिल्यानेंच आणली असें नाहीं. तिचा प्रचार थोडया बहुत प्रमाणानें अगोदरच होता आणि कांहीं विशेष प्रसंगीं तिचा उपयोग पुष्कळ होत असे. इंग्रज लोकांनीं केलें तें हेंच कीं हा प्रसार आपल्या हातीं घेऊन आणि त्याला व्यापारी तत्वाचीं बंधनें घालून त्यांतून एक किफायतशीर धंदा त्यांनीं निर्माण केला. यामुळें तो व्यापाऱ्यांना व्यक्तिशः फायदेशीर होऊन सरकारच्या खजिन्याचीहि भर तो करूं लागला. कमींतकमी दारूचा खप होऊन त्यापासून अधिकाधिक उत्पन्न व्हावें अशी उपपत्ति सांगून हा धंदा इंग्रज सरकारनें आपल्या हातीं घेतला. हळू हळू तो वाढीला लागला आणि अखेरीस आजचें अफाट स्वरूप त्याला प्राप्त झालें आहे. दारूच्या धंद्याला आज भीषण स्वरूप प्राप्त झालें आहे, त्याचें सारें खापर सरकारच्या माथीं फोडलें पाहिजे. याचा दोष दुसऱ्या कोणाकडेहि नाहीं. ही गोष्ट ब्रिटिश सरकारच्या चाहत्या मित्रमंडळीसहि नाकबूल करतां यावयाची नाहीं. दारूच्या धंद्याची ही सारी घाण चवाठयावर ओढून गांधी यांनीं तिचें प्रदर्शन जगापुढें केलें. जी राजकीय इमारत गांधी यांस पुढें उभारावयाची होती, तिच्या पायाचा दगड त्यांनीं अशा रीतीनें बसविला. दारूची विक्री एकदम बंद झाली पाहिजे, अशी हाकाटी त्यांनीं सुरू केली आणि तीबरोबर हिंदी लोकांची रास्त महत्त्वाकांक्षा खडबडून जागी झाली.

दारूच्या दुकानावर पिकेटींग सुरू झालें आणि या मोहिमेंतील मुख्य माऱ्याचें स्थान हें पिकेटिंग झालें. असहकाऱ्यांचीं सैन्यें आणि सरकारी लष्कर यांच्या मुख्य झटापटी या मध्यबिंदूवर होऊं लागल्या. दारूच्या दुकानाभोंवतीं उभे राहून मद्यपी लोकांस दारूपासून परावृत्त करण्याचें काम स्वयंसेवक करूं लागले. ही मोहीम साऱ्या देशभर पसरली. तो सुरू असतां थोड्याबहुत आगळिकीच्या गोष्टी उभयपक्षीं घडून आल्या; तथापि या मोहिमेचे सुपरिणाम लवकरच दृष्टोत्पत्तीस येऊं लागले.

यांत कित्येक वेळां कांहीं हास्यास्पद प्रकारहि घडत. कांहीं गुत्त्यावर भंगी, महार आणि इतर अस्पृश्य लोक उभे रहात. अशा रीतीनें एकादा अस्पृश गुत्त्या-वर स्वयंसेवक म्हणून उभा राहिलेला पाहिला, म्हणजे तेथें प्रवेश करणें उच्च वर्णीयांस मोठें लाजिरवाणें वाटे. आपल्या जातीचा मोठा अभिमान उच्चवर्णी-यांस वाटतो आणि दारू पिण्यासारख्या घाणेरड्या कर्मांतून एकाद्या भंग्यानें अथवा महारानें आपणास परावृत्त करावें, या गोष्टीची त्याला मोठी लाज वाटते. आतां या अस्पृश्याला दूर ढकलून आपण आंत जावें, तर ती गोष्टहि उच्च वर्णी-याला अनेक दृष्टीनें मोठ्या नडीची आहे. त्याला स्पर्श करणें म्हणजे आधीं स्वतःला विटाळ करून घेणें होय. आणि त्याच्यासारख्या हलक्या वर्णबाह्य मनु-ष्यावर हात टाकणें, हें तर त्याहून अधिक नामुष्कीचें आहे. अर्थातच स्वतःचा मान राखून घेण्याकरतां, तेथून दूर निघून जाण्याशिवाय दुसरें गत्यंतर उरत नाहीं.

लखनौ येथें मुसलमान जातीच्या एका वडया नवाब साहेबांस दारूचें भयं-कर व्यसन लागलें होतें. मुसलमानी धर्मानें दारूचा निषेध केला आहे; तथापि तें मनास न आणतां नवाबसाहेस यथेच्छ दारू पिऊन धुंद असत पुढें सर्व मशी-दींतून दारूचा निषेध उच्च घोषानें होऊं लागला. त्याचा परिणाम नवाबसाहे-बांच्या नौकर मंडळीवर होऊन त्यांनीं मालकास दारू आणून देण्याचें साफ नाकारलें. दारू आणून देण्याचा हुकूम नवाबसाहेबानें पुन्हां करतांच ते सारे नौकर लोक नवाबसाहेबांस अखेरचा मुजरा करून निघून गेले. दुसरे नौकर मिळविण्याची खटपट नवाबसाहेबांनीं केली; पण दारुड्याच्या घरीं कोणी नौकरी करावयाची नाहीं, असा ठराव मान्या जमातीनें केला असल्यामुळें नवाबसाहे-बांस नौकर मिळेनात. आतां नवाबसाहेबांचे डोळे पांढरे होण्याच्या बेतांत आले. घरांतील झाडलोट आणि कपडे धुणें इत्यादि सारीं कामें आपणास करावीं लागणार ही गोष्ट त्यांस उघड दिसून दारूचा नाद त्यांना सोडावा लागला. असल्या प्रकारच्या मौजेच्या हकीकती दुसऱ्याहि अनेक घडल्या आहेत. या गोष्टी अगदीं क्षुद्रशा भासतात; पण मौज ही कीं त्यांचे सुपरिणाम अगदीं हातोहात दिसूं लागले.

एकंदरीनें विचार करतां महात्मा गांधी यांच्या इच्छेप्रमाणें पिकेटिंगचें काम अगदीं शांततेनें चाललें आहे. अगदीं क्वचित प्रसंगीं स्वयंसेवकांनीं गुत्त्याजव-ळून दारुबाजूंना फरफरत ओढून नेलें, असेंहि घडलें आहे; तथापि असा प्रकार

अगदीं थोड्या वेळां घडून आला. त्याच प्रमाणें कित्येक वेळां जमातीच्या ठरावा-विरुद्ध दारू पिण्याचा गुन्हा केल्याबद्दल एकाद्या दारूबाजाला अर्धा भादरून त्याची धिंड काढण्यांत आल्याच्या कथाहि क्वचित प्रसंगीं ऐकूं येतात. त्याच-प्रमाणें कोणा दारुबाजाला फाटक्या जोड्यांची माळ देणगी दाखल मिळाल्याचेंहि लोक सांगतात. कांहीं वेळां अशा गोष्टी घडून आल्यामुळें मारामाऱ्या होऊन पोलीसमध्यें पडलें आणि या प्रसंगाचा फायदा घेऊन सरकारनें त्या ठिकाणचें पिके-टिंग बंद केलें असेंहि घडलें आहे. त्याचप्रमाणें कित्येक स्थळीं अशी संधी उत्पन्न करण्याकरतां सरकारी अधिकारी आणि पोलीस यांनीं संगन मतानें दंगे घडवून आणले. वर्तमानपत्रांत अशा अनेक गोष्टींची चर्चा मोठ्या हमरीतुमरीनें झाल्यामुळें पिकेटिंगच्या कामांत दंगे फार झाले, असा भ्रम उत्पन्न होण्याचा संभव आहे. शांततेनें चाललेल्या पिकेटिंगची चळवळ वर्तमानपत्रांत कोठेंच येत नसल्यामुळें एकादुसऱ्या दंग्याची खबरहि वाजवीहून अधिक भयंकर भासूं लागते.

कायदेकौन्सिलांत या प्रश्नाची चर्चा होऊन कायद्यानेंच दारू अजिबात बंद व्हावी, अशी खटपट गांधीभक्त करीत आहेत. पण प्रत्येक वेळीं या गोष्टीला सरकारी सभासदांकडून विलक्षण विरोधाचा अडथळा होतो. सरकारच्या या धोरणामुळेंच हिंदी लोकांच्या घशांत मुद्दमानें सरकार दारू ओततें, असें म्हण-ण्यास गांधी पक्षाला फावलें आहे. उलट बाजूनें सरकार यावर निराळीच कोटी करतें. मद्यपान बंद व्हावें, हा चळवळीचा खरा हेतु नसून सरकारी उत्पन्नांत तूट येऊन तें लंगडें पडावें, याच हेतूनें गांधी पक्षानें ही चळवळ चालविली आहे, असें सरकारचें म्हणणें आहे. सामान्य लोकमताचा अंदाज पाहतां हिंदु-स्थानांतून दारूचें पूर्ण उच्चाटन करण्याकडे, त्याचा कल आहे, असें स्पष्ट दिसतें. या चळवळीची मीमांसा सरकारनें कशीहि केली, तरी हिंदी लोकांना दारू आतां नको.

हिंदुस्थानांत दारू बंद करावी असें म्हणणारे कांहीं इंग्रज लोकहि मला भेटले; पण असें म्हणणारांची संख्या हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीहि नाहीं. आणि कायदे कौन्सिलांत तर मद्यपानाविरुद्ध मत देणारा एकहि इंग्रज सभासद नाहीं.

आपापल्या हद्दींतून मद्यपाननिषेधाचें काम पुष्कळ म्युनिसिपालिट्यांनीं केलें आणि अशा अर्थाचे पुष्कळसे अर्जहि सरकाराकडे पाठविले; पण यांपैकीं एकाहि

भर्जाला यश आलें नाहीं. फार झालें तर कोठें एकाद दुसरें दुकान बंद झालें आणि कांहीं ठिकाणीं एकाद दुसऱ्या दुकानाची रवानगी शहराच्या हद्दीबाहेर झाली. सामान्यपणें सरकारी अधिकारी वर्गानें या चळवळी विरुद्ध हत्यार उपसलें आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. एका प्रसंगी तर एका ब्रिटिश हेल्थ ऑफिसरानें या ठरावाविरुद्ध भाषण करून तो हाणून पाडला. आरोग्यरक्षणासाठीं दारू पिणें अवश्य आहे, असें आपलें मत त्यानें ठांसून सांगितलें. कित्येक प्रसंगीं मक्तेदारानें मक्ता फिरून घेण्याचें नाकारलें; तेव्हां नाना प्रकारांनीं त्याला सतावण्याचा उपक्रम करून मक्ता घेणें त्याला भाग पडावें, अशा प्रकारचा उपक्रमहि सरकारी अधिकाऱ्यानें केला आहे. विजगापट्टण येथें मी गेलों, तेव्हां तेथील ब्रिटिश डेप्युटी कमिशनरानें एक विलक्षण हुकूम काढला होता. डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या अध्यक्षाला लिहिलेल्या पत्रांत हा अधिकारी म्हणतो.

"असहकारितेच्या चळवळीमुळें ताडीच्या दुकानांचें लिलाव करणें कठिण झालें आहे. झाडांच्या मालकांनीं ताडी काढण्यास झाडेंच देऊं नयेत, असा उपदेश हे लोक झाडांच्या मालकांस करीत आहेत. यामुळें ताडीचीं दुकानेंहि चालणें कठिण झालें आहे. ही चळवळ हाणून पाडण्याचा मार्ग सरकारला एकच आहे आणि तो हाच कीं सरकारी ताडीचीं झाडें रस काढण्यासाठीं देणें. हल्लींची परिस्थिति फार चमत्कारिक असल्यामुळें तुमच्या ताब्यांतील झाडें देण्याच्या ज्या शर्ती आहेत, त्या सर्व बंद कराव्यात. विशेष प्रसंगासाठीं अशी विशेष तजवीज करणेंच अवश्य आहे. हल्लींची अडचण अंशतः तरी निभावण्यासाठीं असें करणें जरूरीचें आहे."

इ. स. १९१९ सालीं ब्रिटिश पार्लमेंटानें सुधारणांचा कायदा पास केला. या कायद्याअन्वयें दारूचा कारभार हिंदी लोकांच्या हातीं देण्यांत आला; पण या देणगीबरोबर असलेल्या अटी अशा चमत्कारिक आहेत कीं, दारूचा व्यापार सपशेल बंद करणें प्रांतिक सरकारला अतिशय जड व्हावें. या बाबींत हिंदी लोकांबरोबर ब्रिटिश अधिकारी वर्गानें वास्तविक पाहतां सहकारिता करावी; पण तसें न करतां सर्व राष्ट्राच्या या आकांक्षेच्या मार्गांत शक्य तितके अडथळे आणण्यासाठींच हा वर्ग धडपडत आहे. या धोरणामुळें आगींत तेल पडून हिंदी लोकांचीं मनें अधिकच भडकत चाललीं आहेत. या धोरणामुळेंच असहकारयोगाची लहानशी ठिणगी वळावून ही आग आतां धडाडून पेटत आहे आणि असल्या परिस्थितीचा मिळेल तेवढा फायदा घेण्यास गांधी कमी करणार नाहींत

नाहीं. बेझांटबाई सारख्या युरोपियाला गांधी सर्वथा त्याज्य वाटतात, त्यांच्या म्हणण्याचा नुसता विचार करावा इतकीहि योग्यता, त्यांच्या दृष्टीनें गांधी यांस नाहीं. अदृश्य, अतर्क्य, अप्राप्य, अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त असलेल्या महात्म्याच्या शोधांत बिझांटबाई होत्या आणि भटकतां भटकतां त्यांना आतां जो महात्मा भेटला, तो तर सामान्य मानवी जीव! माणसांच्याच रक्तमांसाचा तो घडलेला! साधारण माणसाप्रमाणेंच तो दूध भाकर खाऊन राहणारा, हातानें कांतलेल्या सुताची हातानें विणलेली खादी तो नेसणारा आणि सामान्य माणसें राहतात, तसल्याच सामान्य घरांत तो राहणारा. हा महात्मा दिसण्यांत अगदीं साधा, त्याचें भाषण अगदीं साधें आणि अलंकारहीन, अगदीं सामान्य स्त्रीपुरुषांबरोवर तो बोलतो आणि तो जें बोलतो, तेंच त्याच्या चित्ताला पटलेलें असतें. आपल्या श्रोत्यांना काय अवडेल याचा विचार करून तो बोलत नाहीं. आपल्या भाषणानें त्यांच्या चित्ताला आनंदाच्या गुदगुदल्या होतील कीं विंचू चावल्यासारख्या वेदना होतील याचा विचार त्याच्या चित्ताला शिवत नाहीं. त्याचें बोलणें रोख ठोक. त्यांत आडपडदा अथवा लपवालपवी मुळींच नाहीं. त्याच्या साऱ्या दिनचर्येंत कसलेंहि काव्य म्हणून नाहींच. त्याचा जीवनक्रम प्रत्यक्ष स्थितीशीं पक्का बांधला गेला असल्यामुळें कल्पनामय काव्याचा प्रवेश कोठून होणार? त्याच्या कृतींत अथवा उक्तींत लपून राहिलेलें रहस्यहि कोठें नाहीं. स्वतःसंबंधीं तो कोणालाहि बुचकळ्यांत पाडीत नाहीं. त्याचा सारा व्यवहार जगाच्या नजरेसमोर चालतो. त्याची भेट घेण्यास कोणासहि मनाई नाहीं. खाणेंपिणें आणि निजणें वगैरे त्याचे सामान्य व्यवहारहि साऱ्यांच्या साक्षीनें होतात. आपले लेख चारचौघांत बसून तो लिहितो आणि कोणाशीं बोलावयाचें झालें, तरी तेंहि चारचौघा मंडळीच्या समक्ष तो बोलतो. त्याच्या जवळ कांहीं गोप्य नाहीं, आणि कोणाचें गोप्य लपवूनहि ठेवावयाचा नाहीं. तो हातानें सूत काढतो; पण त्यानें काढलेल्या धाग्याचें साम्य कवींच्या, साहित्यकारांच्या वेदांत्यांच्या अथवा सूक्ष्मेंद्रियशास्त्र्यांच्या धाग्याशीं त्याचें साम्य नाहीं. तो दृष्टांतानें बोलत नाहीं, आणि त्याचप्रमाणें कांहीं विशिष्ट देवतांचीं, चिन्हांचीं अथवा प्रतिमांची गरजहि तो ठेवीत नाहीं. तो जो धागा काढतो, तो अगदीं साधा आणि जाडाभरडा. यामुळें त्याचें विणलेलें कापडहि तसेंच जाडेंभरडें. मग राजकारणाच्या विद्येंत मुरलेल्या धुरंधर पुरुषांस हा कपडा असह्य व्हावा यांत नवल काय! अर्वाचीन काळच्या राजपुरुषाला या गृहस्थाचा मार्ग ध्यानांतच

येण्यासारखा नाहीं. साधेपणा, मोकळेपणा, आणि निष्कपट हे गुण अर्वाचीन राजकारणी पुरुषाला कोणी शिकविलेले नाहीत. राजकारणांत या गुणांचें वास्तव्य असणें शक्य आहे, हें सुद्धां त्याला खरें वाटत नाहीं. यामुळें या गृहस्थाचा साधेपणाच त्यांच्या चित्ताला बावरून टाकतो. त्याचा साधेपणा, त्यांना अशा कोटीचा वाटतो कीं सामान्यबुद्धीला त्याचा उमज पडणें, त्यांना शक्य दिसत नाही. हा महात्मा स्वतः अगदीं निर्भय चित्ताचा असून इतरांसहि तो भुलवीत नाहीं. कसल्याहि लौकिकी चालीरीतींची पर्वा तो ठेवीत नाहीं. लोकांतून अगदींच उठून जावें लागूं नये म्हणून अवश्य तितके शिष्टाचार तो पाळतो. येट व्हाईसरायपासून तों अगदीं कंगालापर्यंत त्याची वागणूक सर्वांशीं एकसारखी. मोठ्याच्या पायावर डोकें ठेवावें आणि धाकट्याच्या डोक्यावर पाय ठेवावेत, ही विद्या त्याला ठाऊक नाहीं. ज्या पोषाकानें तो व्हाइसरायाकडे जाईल, त्याच पोषाकांत भिकाऱ्याचीहि भेट तो घेईल. कोणालाहि तो परात्पर गुरूच्या स्थानीं बैसवीत नाहीं आणि कोणालाहि तो शिष्य म्हणवीत नाहीं. स्वतःला त्याचे शिष्य म्हणविणारे लोक पुष्कळ आहेत; पण तो स्वतःस कोणाचा गुरू म्हणवीत नाहीं.

गांधी यांजपाशीं कांहीं अलौकिक शक्ति नाहीं, आणि ती असल्याचा बहाणाहि ते करीत नाहीत. त्यांजपाशीं दिव्यशक्ति आहे, असें समजणारे भोळे लोक पुष्कळ आहेत. तथापि स्वतः गांधी असल्या समजाचा प्रतिकार वारंवार मोठ्या आग्रहानें करीत असतात. मेस्मेरिझम सारख्या एखाद्या वशीकरण विद्येचा गंधहि गांधी यांस नाहीं. अथवा कोणत्या तरी युक्तीनें कोणाला भुरळ पाडण्याचाहि यत्न ते करीत नाहीत. ते सदोदित प्रयत्न करीत असतात आणि एखाद्या गोष्टीचा विचार करावयाचा झाला, तर तोहि मोठ्यानें बोलून करतात. त्यांना स्वतःची मालमिळकत नाहीं. कोठल्याहि पैशांवर त्यांची मालकी नाहीं. ते पैसे व्याजी लावीत नाहींत, तथापि स्नेह्यांच्या गरजेसाठीं ते कोणाच्या मागेहि लागत नाहीत. सारांश गांधी हे तुम्हां आम्हां सारखेच सामान्य मानवी प्राणी आहेत. परंतु एवढेंच कीं त्यांची दानत विशेष शुद्ध आणि दांभिकपणरहित आहे. कोणत्याहि कार्याला ते एकनिष्ठपणें वाहून घेतात. त्यांचे विचार आणि आचार हीं दोन्हीं सारखींच पवित्र आहेत. सर्वांवर त्यांचें सारखें प्रेम आहे. ते फक्त ईश्वराचेच दास आहेत. क्षुद्र बुद्धि आणि मत्सर यांचा वास त्यांच्या चित्तांत नाहीं. कोणत्याहि कारणानें ते सत्यभ्रष्ट होत नाहींत आणि कोणापुढेंहि मान वाकवीत नाहींत. साधेपणा आणि सरळपणा हीं दोनच

त्यांचीं हल्लयाचीं शस्त्रें आहेत आणि यामुळेंच युरोपियांस ते कोडें होऊन बसले आहेत. ज्या हिंदी लोकांनीं युरोपीय इतिहासांत बुडी मारून त्यांतील सारीं तत्त्वें आपलींशीं केलीं आहेत, युरोपीय राजकारणानें ज्यांचीं मनें पूर्ण भरून गेलीं आहेत आणि युरोपीय संस्कृति व चालीरीती यांच्या भजनी जे लागले आहेत, अशा हिंदी लोकांनाहि गांधी आवडत नाहींत आणि त्यांचीं तत्वेंहि त्यांना समजत नाहींत. त्यांच्या दृष्टीनें गांधीं हा शुद्ध रानवट मनुष्य आहे. याचे पाय जमिनीला लागलेले नसून हा कल्पनावकाशांत भराऱ्या मारतो, हा त्यांजवरचा आक्षेप, खरा असण्याचा संभव आहे. त्यांच्या डोळ्यावर अर्वाचीन सुधारणेचा चष्मा चढलेला नाहीं. त्याचप्रमाणें त्यांच्या बुद्धीवर दांभिक तर्कशास्त्राचा पगडा बसलेला नाहीं. यामुळें मानवी जीवनाचें स्वरूप जसें वास्तविक आहे, तसेंच त्यांना दिसतें. आपल्या हातून चूक कधीं व्हावयाचीच नाहीं, असें ते म्हणत नाहींत. तथापि आपण मूर्ख आणि वेडगळ आहों, अशीहि ओरड ते करीत नाहींत. कोणत्याहि प्रश्नाची भवति न भवति होऊन त्यांचा निश्चय एकवार कायम झाला कीं त्याजपासून त्यांना ढळविणें हें जवळ जवळ अशक्यच आहे. ते देवदूत नाहींत; तथापि आपणापुढें कांहीं नियोजित कार्य आहे, ही जाणीव त्यांना असून तें सिद्धीस नेण्यास लागणारें सामर्थ्यहि आपल्या आंगीं आहे, अशी त्यांची श्रद्धा आहे. ते विनीत आहेत; पण विनीतपणा हा त्यांचा धंदा नव्हे. त्यांचा विनय अहेतुक आणि स्वभावजन्य आहे. हिंदुस्थानांत स्वराज्यासाठीं जी चळवळ आज चालली आहे, तिच्या प्रमुखस्थानीं असलेला गृहस्थ अशाप्रकारचा आहे.

गांधी यांना कोणतीहि राज्यपद्धति प्रिय नसून त्यांना नुसती पुंडशाही पाहिजे, असें कित्येकांचें म्हणणें आहे. ते टॉलस्टॉयपंथवादी आहेत, असें दुसऱ्या कित्येकांचें म्हणणें आहे. कित्येक त्यांना निहिलिस्ट समजतात. अशा रीतीनें त्यांजबद्दल अनेकांची अनेक मतें आहेत; पण यापैकीं कोणत्याहि पंथाचे ते नाहींत. त्यांनीं आपणास कोणत्याहि पंथाला वाहून घेतलें नाहीं. ते एक साधे भोळे हिंदु गृहस्थ आहेत. आपल्या मातृभूमीचा अभिमान त्यांना आहे. परमेश्वर धर्म आणि श्रुति यांच्या ठिकाणीं त्यांचा विश्वास आहे. चातुर्वर्ण्यसंस्थाहि त्यांना मान्य आहे; तथापि हल्लींच्या नानाविध जाती, पोटजाती आणि पंथ व उपपंथ या गोष्टी मात्र त्यांना मान्य नाहींत. केवळ जात म्हणून अमुक मनुष्य श्रेष्ठ आणि अमुक कनिष्ठ हा भेदहि त्यांना मान्य नाहीं; तथापि वार•

दादापासून चालत आलेले आपापले धंदे ज्यांनी त्यांनी करावे, असें त्यांचें मत आहे. आनुवंशिक संस्कारानें त्या त्या धंद्याची हातोटी त्या त्या जातीला विशेष साधलेली असते, असें त्यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें वर्ण हा जन्मजात आहे, असें मानण्याइतका जुनाटपणाहि त्यांच्या अंगीं आहे. निरनिराळ्या धर्मानुयायांनीं अथवा वेगवेगळ्या जातीच्या लोकांनी एकत्र सहभोजन करूं नये, आणि बेटीव्यवहारहि करूं नयेत, असें त्यांचें मत आहे; तथापि तसें कोणी केलें तर त्याला समाजबाह्य समजून वाळींत टाकावें, असेंहि त्यांचें म्हणणें नाहीं. दुसऱ्या स्पर्शानें विटाळ होतो, असेंहि ते मानीत नाहींत आणि कोणाहि जातीच्या अथवा धर्माच्या मनुष्याच्या हातचें अन्न खाण्यास त्यांना प्रत्यवाय वाटत नाहीं. बेबंदशाही त्यांना प्रिय नाहीं. इतकेंच नव्हे, तर शिस्त, अधिकार, आणि संघटना ही त्यांना प्रिय आहेत. 'कांहींच नको' असें म्हणणाऱ्या नेति वादी लोकांपैकीं ते नाहींत; तर उलटपक्षीं स्वार्थत्याग आणि परोपकार या तत्वांवर उभारलेल्या शिस्तीचे ते भक्त आहेत. हिंदवासीयांस इंग्रज, अमेरिकन किंवा जपानीज, यांज प्रमाणेंच पूर्ण स्वातंत्र्य असावें, या मताचें प्रतिपादन ते अट्टाहासानें करतात. म्हणून इंग्रज लोक आणि नोकरशाहीचे शुंकीहेले त्यांचा द्वेष करतात. गोरे लोक स्वभावतःच श्रेष्ठ आहेत अथवा इतर लोकांवर राज्य करण्याचा ताम्रपट परमेश्वरानें त्यांना दिला आहे, असें त्यांस मुळींच वाटत नाहीं. कोणाहि एका वर्गाकडे धनीपण आणि बाकीच्यांकडे गुलामगिरी अशी वांटणी स्वभावजन्य आहे, असें त्यांस वाटत नाहीं. युरोपीय संस्कृतीचा ते द्वेष करीत नाहींत; पण ज्या व्यापारी तत्वावर तिची उभारणी झाली आहे, त्याचा मात्र त्यांना मनापासून तिटकारा आला आहे.

त्यांनीं सुरू केलेली असहयोगाची चळवळ ही नेतिवादमूलक नाहीं. हल्लीं इंग्रजलोक हिंदवासीयांच्याच मदतीनें राज्य करीत आहेत. मूळ रहिवाशांच्या मदतीनेंच स्वतःची तुंबडी भरण्याकरतां हिंदुस्थानाची लूट ते करात आ[illegible] आणि त्याच्या या कार्यास हिंदीलोक आपखुषीनें मदत करीत आहेत. अशी मदत त्यांना मिळूं न देणें हें असहकारयोगाचें ध्येय आहे. गांधी यांच्या नेतृत्वाखालीं हिंदीलोक आता निर्भय, धीट आणि स्वावलंबी बनत आहेत. आपल्या तत्वांसाठी हवीं तीं दुःखें भोगण्याची तयारी ते करीत आहेत आणि या साध्याच्या मार्गांत मदत म्हणून असहकारयोगाचें शस्त्र त्यांनी पाजळलें आहे. न्याय कचेरींत स्वतःचा कोणताहि बचाव न करतां शेंकडोंच काय पण हजारों लोक तुरुंगांत गेले आहेत.

गांधी यांच्या मार्गांत लपवाछपवी नाहीं. त्यांच्या शाळेंत तयार झालेलीं माणसें स्वतःस इष्ट असलेली गोष्ट चव्हाट्यावर करतात. सत्यनिष्ठा, निर्भयता आणि अहिंसा, या तीन गुणांचें बाळकडू गांधी आपल्या शिष्यांना पाजतात. रशियांतील क्रांतिकारकपक्ष आणि हिंदुस्थानांतील असहकारयोगी यांच्यांतील फरक येथेंच आहे. हिंदुस्थानांतील सांप्रतची राज्यपद्धति धुळीला मिळविण्यासाठींच आपण बाहेर पडलों आहों, असें ते स्पष्ट सांगतात. आपल्या देशाला पूर्ण स्वातंत्र्य मिळवून यावें, हें आपलें ध्येय ते चोरून ठेवीत नाहींत. हिंदुस्थानास ब्रिटिश साम्राज्यांतील घटक म्हणून त्यांत रहावयाचें कीं त्यांतून त्यानें बाहेर पडावयाचें हें ठरविण्याची पूर्ण मुभा त्याला असली पाहिजे हा आपला उद्देश त्यांनीं जगजाहीर केला आहे. या कामांत कोणा परक्याची मदत त्यांना नको.

गांधी यांचा असहकार योग जसजसा बळावत आहे, तसतसें अधिकाऱ्यांच्या दमननीतीचें प्राबल्यहि वाढत चाललें आहे. सभा पुकारली कीं ती बंद पाडावयाची, वक्त्यांना आणि लेखकांना तुरुंगांत टाकावयाचें इत्यादि ठरीव मार्गांनींहि नौकरशाही पुढें पाऊल टाकीत आहे. तथापि या दमननीतीस न जुमानतां असहकारयोगाचें पाऊल पुढें पडत आहे. हिंदुस्थान आज अहिंसायुक्त क्रांति पहात आहे आणि या कार्यांत हिंदुस्थानास स्त्रीवर्गाचेंहि साहाय्य आहे, ही गोष्ट विशेष आनंदाची आहे. असहकारी सभांना स्त्रियांचे तांडेच्या तांडे खादीचीं वस्त्रें नेसून येतात. परदेशी कपडयाचा तिटकारा लोकांच्या चित्तांत पूर्ण बाणावा म्हणून लक्षावधी रुपयांचीं आपलीं परदेशी वस्त्रें त्यांनीं होळींत टाकलीं आहेत. दंडनीतीचा वासहि आपल्या चळवळीला लागूं नये म्हणून तिचे पुरस्कर्ते अट्टाहासानें मेहनत करीत आहेत. जेथें रक्तपात झाला, तेथें उलट पक्षाच्या कृतीच्या अतिरेकानें लोक बेदील झाल्याचें आढळून आलें. म्हातारे कोतारे, तरुण आणि मुलेंहि तुरुंगांत जात आहेत आणि यांची संख्या शेकडयांनीं मोजतां येण्यासारखी आहे. आपला न्याय करण्याचा अधिकार ब्रिटिश कोर्टास नाहीं, असें ठांसून सांगून हीं माणसें तुरुंगांत जातात. सरकारचे कायदे मोडण्याचा उद्योग आपण जन्मभर करूं, अशी शपथ वाहण्यास हजारों माणसें तयार आहेत; पण आपल्या चळवळीला दंडनीतीचा गंधहि लागूं नये म्हणून कायदेभंगाच्या चळवळीला पुढाऱ्यांनीं अद्यापि प्रोत्साहन दिलें नाहीं. अशा मंडळींपैकीं कोणालाहि पोलिसानें पकडलें म्हणजे जामीन न देतां तो चौकीचा सरळ रस्ता सुधारतो. आपण ब्रिटिश सरकारची सत्ता मानीत नाहीं आणि सरकारी न्यायावर आपला

भरंवसा नाहीं, या तत्वाचा प्रचार तो अशा रीतीनें करीत असतो. कित्येक प्रसंगीं यांतील कांहीं लोक बेताल होऊन पोलिसावर तुटून पडले, अशाहि गोष्टी मधून मधून घडतात. अशा लोकांचा मुलाहिजा गांधी मुळींच ठेवीत नाहींत. हे लोक तत्वभ्रष्ट झाले, असें स्पष्टपणें गांधी जाहीर करतात आणि आपल्या या पातकाचें प्रायश्चित्त करण्यास ते त्यांस सांगतात. मलबार प्रांतीं मात्र मोठी विचित्र घटना घडून आली. शेतकऱ्यांच्या सामान्य आर्तेष्टांचीं दुःखें आणि राजकीय असंतोष यांची मिसळ होऊन त्यांतच धर्मवेडेपणाची भर पडली. इतक्या सगळ्या गोष्टी घडून आल्यानंतर बंडाचा प्रचंड वणवा तेथें पेटला, यांत नवल नाहीं. या बंडामुळें गांधी यांस फार दुःख झालें; पण हिंदुस्थानाच्या प्रचंड खंडांत मलबार, हें एक अगदीं क्षुद्र स्थळ आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. येथें मोपल्यांची एकंदर वस्ती फार झाली तर वीस लक्ष असेल नसेल आणि यांतील अगदीं थोड्यांनी हातीं शस्त्र धरलें. बाकीचा मोठा भाग पूर्ण शांतीनें वागत आहे. गांधी यांस मलबारांत जाण्याची परवानगी मिळाली असती, तर या माथेफिरू सशस्त्र मोपल्यांस त्यांनीं शांत केलें असतें; पण आमच्या 'सदय' सरकाराला हें आवडलें नाहीं. हिंदू आणि मुसलमान यांतील द्वैतभाव वाढविण्यास उपयोगी पडणारी अशी ही सोन्यासारखी संधी चालून आली असतां, तिचा उपयोग करणें सरकाराला अयुक्त वाटलें, यांत नवल नाहीं.

असहकारयोगाचा कार्यक्रम पुढीलप्रमाणें आहे (१) सरकारी पदव्या, दुसऱ्या मानाच्या वस्तु आणि मानाच्या जागा, यांचा त्याग. (२) मद्यपाननिषेध (३) मुलगे आणि मुली यांस सरकारी शाळांतून काढणें, हल्लींच्या शिक्षणपद्धतीमुळें परकीय सत्तेखालीं गुलामगिरींत सितपत पडण्यास चांगल्या चांगल्या हिंदी लोकांस दिक्कत वाटत नाहीं. या पद्धतींतील विषारी नांगी त्यांना झोंबत नाहीं. त्याप्रमाणें कामकरी वर्गाचें रक्तशोषण करून थोड्यांप्रमाणें परान्नपुष्ट होण्यासहि त्यांना लाज वाटत नाहीं. यासाठीं या शिक्षणपद्धतीचा उच्छेद करणें (४) इंग्रजी आणि इतर युरोपीय वाङ्मयाचा अभ्यास ज्यांत दुय्यम प्रतीचा समजला जाईल, अशा शाळा उघडणें. हिंदुस्थानांतील धाद्य भाषांस अग्रस्थान मिळून त्याबरोबरच हस्तकौशल्याच्या धंद्याचें शिक्षण देणें (५) इंग्रजी पद्धतीच्या न्याय, न्यायकचेऱ्या आणि वकील, यांजवर बहिष्कार घालणें (६) परदेशी कपड्याचा त्याग आणि स्वदेशीचा स्वीकार. (७) सरकारी नौकरीतून हिं-

दीलीकांस परावृत्त करणें. त्याचप्रमाणें ब्रिटिश सैन्य आणि पोलीस या नौकऱ्यांतूनहि त्यांस मागें खेंचणें. ( ८ ) कर न देणें.

हा कार्यक्रम तात्पुरता म्हणून मुकरर करण्यांत आला आहे. हा सर्वतोपरी पूर्ण आहे असें नाही आणि तोहि आज साराच अमलांत आणावयाचा आहे, असेंहि नाहीं. गांधी आणि त्यांचे सहकारी यांनीं केवळ बाराच महिने या क्रमाला अनुसरून कार्य केलें आणि एवढया अल्प मुदतींतहि आश्चर्यकारक यश मिळविलें. पुष्कळांनीं अद्यापि आपल्या पदव्यांचा आणि मानांच्या जागांचा त्याग केला नाहीं, हें खरें. त्याचप्रमाणें आपला धंदा सोडणारे वकीलहि अगदीं थोडे आहेत हेंहि खरें आहे. विद्यार्थ्यांसंबंधीं पाहातां कलकत्ता महाविद्यालयाच्या उपाध्यक्षानें सांगितलेली माहीती लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कॉलेजांत तेवीस टक्के आणि शाळांत सत्तावीस टक्के मुलें बाहेर राहिलीं. परिक्षेच्या फीच्या रूपानें मिळणाऱ्या महाविद्यालयाच्या उत्पन्नांत फार मोठी तूट आली. परदेशी कापडावरील बहिष्कार फार चांगल्या रीतीनें यशस्वी झाला. लॅंकेशायरला चिमटा बसत असल्याचीं चिन्हें आजच दिसूं लागलीं आहेत. आतां हिंदुस्थानच्या उभ्या बाजारांत परदेशी कापड पंचवीस टक्क्याहूनहि कमी खपतें. गांधी यांस कांहीं श्रीमंत व्यापाऱ्यांचाहि पाठिंबा आहे, ही गोष्ट टिळक स्वराज्यफंडाच्या वेळीं उघडपणें निदर्शनास आली. या फंडाला अदृष्टपूर्व यश येऊन तीन महिन्यांपेक्षांहि कमी मुदतींत एक कोटी रुपयांहुन अधिक रक्कम उभी राहिली. या तीन महिन्यांच्या अवधींत गांधी यांनीं कांग्रेसची घटना पूर्ण स्वरूपास आणली. तिच्या सभासदांची संख्या आतां सुमारें एक कोटी आहे. याच तीन महिन्यांच्या मुदतींत पंचवीसलाख चरखे फिरले पाहिजेत अशी मागणी गांधी यांनीं आपल्या देशबांधवांजवळ केली होती. ही मागणीहि हिंदी लोकांनीं पुरी केली. गांधी यांस मिळालेल्या यशाचीं हीं प्रत्यक्ष उदाहरणें आहेत. तथापि त्यांनीं केलेलें खरें मोठें कार्य याहून वेगळ्या स्वरूपाचें आहे. स्वातंत्र्याची आवड एकंदर सर्व राष्ट्राच्या मनांत त्यांनीं उत्पन्न केली, आणि त्याबरोबरच लोकांस अहिंसेचा मार्गहि पटविला, हेंच त्यांचें मोठें कार्य आहे. रशियांतील क्रांतिकारक पक्षाचे पुढारी आणि गांधी यांच्या तालमींत तयार झालेले हिंदुस्थानांतील पुढारी, यांच्यांतील फरक येथेंच आहे. गांधीपक्ष कोणतेंहि काम लपवून छपवून करीत नाहीं. त्यांत गुप्तमंडळ्या, गुप्त निवासस्थानें आणि गुप्तकट यांचें नांवहि नाहीं. हिंदुस्थानांत अथवा हिंदुस्थानाबाहेर, ते आणि त्यांचे साहाय्यकर्ते आपापलीं कार्यें दिवसां ढवळ्या चवाठ्यावर करीत

असतात. चालू राजकीय पद्धतीचा समूळ उच्छेद करणें, हें आपलें कार्य आहे, असें ते स्पष्टपणें सांगतात. ब्रिटिश साम्राज्यांत रहावें कीं त्या बाहेर पडावें, हें ठरविण्याचा हक्क सर्व देशाचा असून तो त्यास मिळवून देण्यासाठींच आपली सारी खटपट आहे, ही गोष्ट ते उघड बोलून दाखवितात.

कित्येक स्वतःच उच्च आणि मानार्ह समजणारे लोक नोकरशाहीच्या बाजूस असून गांधी यांच्या चळवळीविरुद्ध ते खटपट करतात, हें खरें आहे. कारण गांधी यांची चळवळ यशस्वी झाली, तर आपला सारा मोठेपणा आणि श्रीमंती हीं नाहींशीं होतील, असें भय त्यांना वाटतें. नोकरशाहीनेंहि असल्या लोकांस आपल्या लुटीच्या कारभारांत दुय्यम भागीदार करून त्यांना वगलेंत मारलें आहे. लोकांची लूट करून आपले खिसे भरणें हा हक्क केवळ मांडवलशाहीलाच मिळाला आहे, असें नसून त्यांत साम्राज्यशाहीहि भागीदार आहे. गेलीं १५० वर्षे पुढारी वर्ग सुधारणांसाठीं ओरड करीत होता; पण सरकारानें ही ओरड मनास आणली नाहीं. आरंभीं तर या पुढारी वर्गाचे मनात स्वराज्याची आकांक्षा मुळींच नव्हती. आपणास मोठया जागांपैकीं थोडयाशा अधिक जागा मिळाव्या आणि शिक्षणाचा प्रसार थोडा अधिक व्हावा, एवढेंच त्यांचें म्हणणें होतें. पुढें १९०५ सालीं हा मनु बदलला आणि स्वराज्याचें निशाण उभारणारा एक पक्ष हिंदुस्थानांत निर्माण झाला. हें झाल्यावरोबर सरकार आणि त्याचे बगलबच्चे या दोघांनाहि आपले दिवस भरले असल्याचें कळून आलें. पंडित मोर्ले यांनीं 'नेमस्तांस काखेंत मारा' ही ओरड सुरू केली आणि याच दिशेनें नेमस्तांच्या तोंडावर थोडेसे तुकडे या बहादूर राजकारणी पुरुषांनीं फेंकले. नेमस्तांनींहि आभारपूर्वक हे तुकडे पदरीं बांधले व सरकारचीं स्तुतिस्तोत्रें गाण्यास सुरवात केली आणि नोकरशाहीशीं संगनमत करून स्वराज्यवाद्यांचा पक्ष हाणून पाडण्याचा विडा उचलला. सरकारनें एका बाजूनें दमन नीतीचा अवलंब करावा आणि नेमस्तांनीं लेखांच्या आणि व्याख्यानांच्या द्वारें लोकमताची दिशा बदलण्याचा उपयोग करावा, अशी कामाची वांटणी झाली.

या गोष्टीला थोडा काळ लोटलो तोंच युरोपांत महायुद्ध सुरू झालें. लॉर्ड मोर्ले यांचें शिष्यमंडळ आणि हिंदुस्थानांतील संस्थानिकवर्ग यांनीं ब्रिटिशांची तळी उचलली आणि ब्रिटिशांच्या विजयावरोबर हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळेल असें ते लोकांस भासवूं लागले. महायुद्धांत हिंदुस्थानाचें रक्त शोषण होऊन तो पांढरा फटफटीत पडला. माणसें, पैसा आणि साहित्य यांचे डोंगराच्या डोंगर

निरनिराळ्या युद्धक्षेत्रांत जाऊन पडले. लक्षावधी माणसें रोग आणि दुष्काळ यांस बळी पडलीं असतांहि हिंदुस्थानानें माघार घेतली नाहीं. एकट्या इन्फ्लुएन्झाच्या साथीनें केवळ सहा महिन्यांत साठ लाख बळी घेतले. अखेरीस ब्रिटिशांना युद्धांत यश मिळालें आणि त्यामागोमागच हिंदुस्थानाला रौलट कायद्याची प्राप्ती झाली. हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यावर हा गदाप्रहारच झाला. युद्ध सुरू असतां गांधी सैन्यभरतीचें काम करीत होते; पण पुढें घडलेल्या या प्रकारांनीं त्यांचें चित्त पालटून त्यांनीं असहकार योग पुकारला. साधी रहाणी, दीनवत्सलता आणि निर्भयपणा या आपल्या सद्गुणांनीं त्या वेळींहि लोकांवर त्यांनीं आपली छाप चांगलीच बसविली होती.

नोकरशाहीनें दमननीतीच्या साऱ्या प्रकारांस सुरुवात केली; पण सरकारी हुकुमांना न जुमानतां गांधी यांच्या अनुयायांनीं ही चळवळ तशीच पुढें चालू ठेवली. स्वराज्याच्या चळवळीचीं पाळेंमुळें आतां हिंदुस्थानांत फार खोल गेलीं असून त्यांचें उन्मूलन करणें, सरकारच्या आवांक्या बाहेर गेलें आहे. त्याचप्रमाणें सरकारच्या खिशांतील ' सभ्य ' गृहस्थांनीं आतां कितीहि धडपड केली, तरी त्यांना ही चळवळ उलथून पाडतां येणार नाहीं. सरकारानें कितीहि दमन केलें, तरी ही चळवळ दडपून टाकणें त्याला शक्य नाहीं. इंग्रज लोकांनीं वसाहतीसारखें स्वराज्य आज लोकांस देऊं केलें, तर या तडजोडीला गांधी पक्षाचा मोठा भाग आज कबूल होण्याचा संभव आहे; पण ही गोष्ट आतां आणखी दिरंगाईवर पडेल तर लोकमत अधिकाधिक क्षुब्ध होऊन या पक्षाला विलक्षण वजन प्राप्त होईल आणि पूर्ण स्वातंत्र्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीनें हिंदुस्थान संतुष्ट होणार नाहीं.

लाला लजपतराय—
( अमेरिकन नेशन. )

---

## २१

' गांधी यांस हिंदुस्थान सरकारनें पकडलें ' या बातमीनें आमच्या चित्ताला जबर धक्का बसला. अलिकडे पुष्कळ विचित्र घटना घडूं लागल्या आहेत; पण इतकी उद्वेकजनक अशी एकहि घटना त्यांत नाहीं. हिंदुस्थानाशीं इंग्रज लोकांचा संबंध कोणत्या प्रकारचा असावा आणि कोणत्या प्रकारच्या संबंधानें इंग्रज

लोकांचा धार्मिक आयुष्यक्रम अधिक चांगला करतां येईल, याचा थोडा तरी विचार करणाऱ्या कोणाहि इंग्रजाला ही बातमी वाचून टाकल्यावांचून राहणार नाहीं. राष्ट्राराष्ट्रांतील परस्पर संबंध कोणत्या प्रकारचे असावेत आणि विशेषतः इंग्रज राष्ट्र इतरांशीं कोणत्या तऱ्हेनें वागतें याचें योग्य अनुमान आयर्लंड व हिंदुस्थान या दोन राष्ट्रांबरोबर होत असलेल्या आमच्या वागणुकीनें ठरविण्यांत येऊं लागलें आहे. युद्ध सुरू झाल्यानंतर अशा प्रकारची परिस्थिति लवकरच जन्मास आली. या देशाशीं जें वागणुकीचें धोरण आम्ही ठरविलें आहे, त्यांत आमची मनःपूर्वकता किती आहे, याबद्दल मोठे चमत्कारिक प्रश्न अनेक लोक आम्हांस विचारूं लागले. या प्रश्नाकडे नुसता कानाडोळा करून आतां भागावयाचें नाहीं. असले चमत्कारिक प्रश्न विचारणारे केवळ ऐरिश किंवा हिंदी लोकच नव्हते. त्याचप्रमाणें इंग्रजी साम्राज्यावर सदोदित तुटून पडणारे केवळ परकीय लोकच असे प्रश्न विचारीत होते, असेंहि नाहीं. जगांत कांहीं तरी अपूर्व कामगिरी करणें, हें इंग्लंडचें कर्तव्य आहे, अशी सद्भावना बाळगणारे अनेक लोक हा प्रश्न विचारूं लागले होते. विशेषतः हिंदुस्थानांत तर इंग्लंडला पडलेले आजचें कोडें ऐरिश कोड्यापेक्षां अधिक विचित्र स्वरूपाचें आहे. यांत विशेषतः आमच्या नीतितत्वांना आव्हान आलेलें आहे. 'तुमची नीति कोणत्या दर्जाची आहे?' असाच प्रश्न हिंदुस्थान आज आम्हांस विचारूं लागला आहे. हिंदुस्थानांतील राष्ट्रीयपक्षाच्या पुढाऱ्यांच्या अत्यंत उदात्त आणि धर्ममय आचारणामुळें या प्रश्नाला आज अधिकच उग्ररूप आलेलें आहे.

खिलाफतीची चळवळ आणि मुसलमानांस दिलेलीं वचनें या गोष्टीहि या प्रश्नापुढें खरोखर फिक्या पडल्या आहेत. युद्धांत उत्पन्न झालेल्या काळजीच्या परिस्थितीच्या वेळीं देऊं नयेत असलीं वचनें आम्ही देऊन चुकलों. कारण हिंदुस्थानांतील मुसलमानांचें साहाय्य मिळवावयाचें झालें तरी, तेवढ्यासाठीं युरोपांत तुर्कीसत्ता आम्ही कायम ठेवूं असलें अभिवचन देण्याचें कांहीं प्रयोजन आम्हांस नव्हतें. त्याचप्रमाणें महंमदीयांस पवित्र वाटत असलेल्या स्थलावर तुर्कीसत्ता कायम राहील, असेंहि सांगण्याचें कारण नव्हतें; पण राजकारणाच्या जाळ्यांत फसून ही चूक आम्ही केली आणि आतां या वचनांची पूर्तता करण्याचें सामर्थ्य आम्हांस नाहीं, असें दिसून आलें. हा प्रश्न कसा सोडवावा, या कोड्यांतून कसें बाहेर पडावें, आतां वचन राखणें अथवा त्याचा भंग करणें यांतून अधिक नीतीचें कृत्य कोणतें, हें ठरविणें, इत्यादि गोष्टी आज आमच्या

अंतःकरणाचा ठाव घेत आहेत. या बाबतींत आमच्याकडून मोठी चूक झाली आहे. आमच्या कृतीचे भलतेच परिणाम होऊन ते आतां आम्हांसमोर उभे राहिले आहेत. हे परिणाम आम्हांस आवडण्याजोगे नसले, तरी वचनाचें उल्लंघन न करणें, हेंच अधिक श्रेयस्कर आहे, असें आम्हास तरी वाटतें.

गांधी यांनीं आम्हापुढें उपस्थित केलेला प्रश्न अधिक साध्या स्वरूपाचा आहे, त्यांत राजकीय अथवा अतरराष्ट्रीय भानगडी नाहींत. गांधी यांची ओळख ज्या लोकांना झाली आहे, ते त्यांच्या साधुपणाबद्दल एकमतानें साक्ष देतात.

पाशवी शक्तीवर अखेरीस चैतन्यशक्तीचा विजय निश्चयानें होईल, या एकाच तत्वावर गांधी यांनीं आपल्या सान्या चळवळींची उभारणी केली आहे, गांधी यांच्या चळवळीस नांवेंच ठेवावयाचीं म्हटलें, तर तीं फक्त एकाच बाबीबद्दल ठेवतां येतील. मानवीसमाजाच्या आजच्या स्थितींत गांधी यांचें तत्व अव्यवहार्य आहे, इतकेंच फार तर म्हणतां येईल. याहून अधिक वाईट टीका त्यांच्या कट्टया निंदकालाहि करतां येणार नाहीं. ' माझे राज्य या जगांत नाहीं, ' असें ख्रिस्त म्हणाला होता. लोकांस हा चिथवितो, असा आरोप ख्रिस्तावरहि झाला होता. हा चळवळ्या आहे म्हणून याला तुरुंगांत टाकणें अवश्य आहे, अशी भाषा ख्रिस्ताच्या वेळींहि प्रचारांत आली होती. सर्व लोकांच्या कल्याणासाठीं एकाचें बलिदान देणें चांगलें आहे, हें तत्व ख्रिस्ताच्या वेळींहि पुढे आलें होतें. गांधी यांच्या कारागृहवासाची खबर ऐकून जुन्या काळच्या या सान्या गोष्टींचें स्मरण आम्हास झालें. दीर्घकाळानंतर तीच गोष्ट आज पुन्हां घडत आहे, असें आम्हांस दिसून आलें. सरकारच्या कृतीचें समर्थन करूं पाहणारीं पत्रें वरील प्रकारचे उद्गार काढीत आहेत. ख्रिस्ताचा न्याय करणारा न्यायाधिश पायलेट अथवा कयालाफास यांच्या कृतीचें समर्थन हल्लींच्या वर्तमानपत्रांच्या याच शब्दांनीं त्याकाळीं कोणालाहि करतां आलें असतें; पण महात्माजींच्या चारित्र्याचें जें वर्णन अनेक प्रकारच्या लोकांकडून वाचलें व ऐकलें आहे, त्यावरून या वर्तमानपत्रांचे सारे लेख मुद्याला अगदीं सोडून आणि एकजात गैर लागू आहेत, असें म्हणण्यास आम्हास मुळींच प्रत्यवाय वाटत नाहीं. महात्माजींच्या खटल्याचा निकाल ऐकून आमच्या चित्ताला खरोखर मोठा धका बसला. या धक्कयापेक्षांहि अधिक शोचनीय प्रकार म्हटला तर हाच कीं ज्या राजशासनपद्धतीनें ही घटना घडवून आणली, ती सारी पद्धतीच ख्रिस्ती धर्माला सोडून आहे, असें सिद्ध झालें, हा होय. महात्माजींना कारागृहवास घडला तो कोणा एकाच व्यक्तीच्या विकृत मनस्थितीचा परिणाम

नसून त्यावद्दल कोणत्याहि एकच व्यक्तीला दोषी धरतां येत नाहीं, ही गोष्ट आम्हास अत्यंत विषादकारक वाटली. हिंदुस्थानांतील राजशासनपद्धतीचें स्वरूप किती धर्मबाह्य आहे, ही गोष्ट या एकाच निकालानें जगाच्या चवाट्यावर मांडली गेली. यांत कोणाहि एकाच व्यक्तीला दोष देतां येत नाहीं, ही गोष्ट आम्हास मान्य आहे. आजपर्यंत आम्हीं निश्चित केलेला मार्ग आणि एका अत्यंत पवित्र साधुपुरुषाचा मार्ग हे परस्परांशीं विसंगत आहेत, इतकी गोष्ट मात्र आज सिद्ध झाली आहे. गांधी यांचा न्याय आम्हीं केला; पण असें करतांना आम्ही स्वतःच गर्हणीय ठरलों.

आतां आम्हावर येणाऱ्या दोषारोपांतून सुटण्यास एकच मार्ग आम्हांस मोकळा आहे. गांधी यांचा हेतु शुद्ध आहे, त्यांची दानत उच्च प्रतीची आहे आणि त्यांच्या मार्गांत दंडनीतीचा अवलंब नाहीं, या साऱ्या गोष्टी कबूल केल्या तरी त्यांचें ध्येय चुकीचें आहे आणि यामुळेंच त्यांना शिक्षा देणें योग्य आहे, इतकेंच नव्हे तर तें अपरिहार्यहि आहे, असें म्हणतां येईल. गांधी यांच्या विरुद्ध एखाद्या पक्षाचा स्वीकार आम्हास करावयाचा असेल, तर या पक्षाचा स्वीकार आम्ही करूं; पण हें करतांना मुद्दां आपल्या स्वतःच्या कृतीचें परीक्षण करण्यास आपण चुकतां उपयोगी नाहीं. गांधी यांची चळवळ कशी निर्माण झाली, या गोष्टीच्या इतिहासाचें पर्यालोचन अगदीं प्रांजलपणें आपण केलें पाहिजे. गांधी यांची चळवळ निर्माण कशी झाली आणि सध्यांच्या पक्व दशेपर्यंत ती कशी पोहोंचली याचा विचार मोकळ्या मनानें करणें अवश्य आहे.

या चळवळीचा अगदीं थोडक्यांत इतिहास असा आहे:–हिंदुस्थानांतील असंतोषाचीं कारणें दूर करण्याकरतां कांहीं वर्षे गांधी खटपट करीत होते. हिंदुस्थानच्या राजशासनांत पुष्कळ उणीवा आहेत, ही गोष्ट सर्वमान्य आहे. या उणीवा दूर करून हिंदुस्थान आणि इंग्लंड यांजमध्यें सलोखा उत्पन्न करावा याशाठीं गांधी यत्न करीत होते. युद्ध सुरु असतांहि आपला हा हेतु त्यांनीं दृष्टिआड होऊं दिला नाहीं. या प्रसंगीं पुष्कळ स्वार्थत्याग करून आणि स्वतःचें वजन खर्चून युद्धांत त्यांनीं पुष्कळ कामगिरी बजावली. युद्धांतील जखमी लोकांची शुश्रूषाहि त्यांनीं मनोभावें केली, अशा रीतीनें या दोन राष्ट्रांत सद्भाव उत्पन्न होईल आणि त्यायोगें हिंदी लोकांस बरेच राजकीय हक्क त्यांना मिळतील अशी आशा त्यांना होती. हिंदुस्थानांतील विद्वान आणि सुसंस्कृत राजकीय पुढारी ज्या दिशेनें आजपर्यंत काम करीत आले, तीच आणि गांधी यांच्या

मार्गांत येथपर्यंत कांहीं फरक नव्हता. या जुन्या राजकीय पुढाऱ्यांचा हेतूहि या दोन राष्ट्रांत सलोखा उत्पन्न करण्याचाच होता. आणि गांधीहि याच दिशेनें काम करीत होते. पुढें युद्धसमाप्तीनंतर हिंदुस्थानानें केलेले उपकार इंग्लंड विसरत आहे, असें गांधी यांस वारंवार आढळून आलें. आपणावरील जबाबदारी ओळखण्यास इंग्लंड कांकूं करीत आहे, असें त्यांच्या मनानें घेतलें. यांपैकीं कांहीं मुद्दे तर अगदीं स्पष्ट स्वरूपाचे होते. रौलट कायदा, पंजाबांतील धुमाकूळ आणि तुर्कीतह या तीन बाबी अशा स्वरूपाच्या होत्या कीं, त्या स्पष्ट खोडून काढणें शक्य नव्हतें. त्याचप्रमाणें तागाच्या व इतर धंद्यांत हिंदुस्थानची होणारी लूट आणि त्याचप्रमाणें पदोपदीं प्रत्ययास येणारा वर्णमूलक पक्षपात या गोष्टीहि त्यांना ठळक दिसूं लागल्या. सांप्रतच्या भांडवलवाल्यांच्या युगांत एकंदर जगाला कसें त्राही त्राही झालें आहे आणि एकंदर युरोपीय संस्कृति कशी अपेशी ठरली आहे, हेंहि गांधी यांना ढळढळीत दिसूं लागलें. या अनेक प्रकारांमुळें त्यांच्या चित्ताला मोठा उद्वेग उत्पन्न झाला आणि एकंदर गोष्टींचा विचार करतां हिंदुस्थान आणि इंग्लंड यांस सहोदरत्व उत्पन्न करण्याचा आपला हेतु बाजूस ठेवला पाहिजे, असें गांधी यांस दिसून आलें. हिंदुस्थान हा धार्मिक भावनांचा देश आहे. धर्मसिद्धांतांचें रक्षण हा त्यांचा जीवनहेतु आहे आणि या मूळ हेतूचें रक्षण करावयाचें असेल, तर पाश्चात्य संस्कृतीचे फायदे दूर झुगारून देण्यास आणि तिच्याशीं पूर्ण घटस्फोट करण्यास तयार होण्यावांचून हिंदुस्थानास दुसरा तरणोपाय नाहीं, असा गांधी यांच्या बुद्धीचा निश्चय झाला. हें साधण्यासाठीं कोणत्याहि दंडनीतीचा उपयोग करावयाचा नाहीं, असें त्यांनीं ठरविलें आपल्या अनुयायांपैकीं या नीतीचा अवलंब कोणीहि करतां उपयोगी नाहीं, अशी गांधी यांची सक्त ताकीद आहे. पूर्ण शांतियुक्त असहकार योग त्यांनीं पुकारला. साऱ्या पाश्चात्य संस्कृतीला 'नेति नेति' म्हणून दूर करून हिंदुस्थानानें आपला सवता सुभा निर्माण करणें हाच गांधी यांचा असहकार योग होय. पाश्चात्यांच्या दृष्टीनें यास संन्यास योग असें म्हणतां येईल. जगांतील दुष्टत्वाचा संपर्क आपणास लागूं नये म्हणून एकादा मनुष्य ज्याप्रमाणें वैराग्य घेऊन आणि जगाचा संबंध तोडून अरण्यवासी होतो, तसेंच हें आहे. आजची जगाची स्थिति पाहिली आणि राष्ट्रांची राष्ट्रें हव्या त्या नीतिबाह्य गोष्टी करण्यास प्रवृत्त होतात, ही वस्तुस्थिति अवलोकनांत आणली म्हणजे गांधी यांचा असहकार योग त्याज्य आहे, असें म्हणण्याचें धाष्टर्य सहसा-

कोणास होणार नाहीं. आतां ज्यांची दृष्टी अगदींच उथळ असेल आणि संसाराच्या जाळ्यांत ज्यांचें जीवित अगदीं पक्कें गुरफटून गेलें असेल, तेवढ्या शेलक्या लोकांना मात्र हा मार्ग सर्वथा त्याज्य वाटेल, हें उघड आहे. सांप्रतचें पाश्चात्य जग इतक्या भयंकर स्थितीला आलेलें आहे कीं, त्याच्याशीं कसलेंहि दळणवळण ठेवणें खरोखरच अनर्थमूलक होईल. या देशाशीं सलोखा उत्पन्न करण्याकरतां आपलीं तत्वें अगदीं अल्पांशानेंहि सोडणें, ही गोष्ट आपणांस अखेरीस हानिकारक होईल, असा गांधी यांच्या दृष्टीचा ठाम निश्चय झाला आहे. याकरितां पाश्चात्य संस्कृतीचा संबंध साफ तोडून टाकण्याशिवाय स्वसंरक्षणाचा अन्य मार्ग गांधी यांस दिसत नाहीं आणि हें साधण्याकरितां दुसऱ्यांचीं पापें आपल्या मस्तकावर घेऊन स्वतःचें बलिदान द्यावें, असें गांधी आपल्या अनुयायांस सांगत आहेत. स्वधर्म रक्षणासाठीं साऱ्या हिंदुस्थानानें अशा रीतीनें प्राणत्याग करावा, अशी गांधी यांची इच्छा आहे. गांधी आतां कारागृहांत आहेत. धर्म रक्षणासाठीं बलिदान करण्यास कोणाची तयारी आहे, हें जाणण्याचें आव्हान सर्व धर्मपरायणांस अशा रीतीनें दिलें गेलें आहे.

चार्लेस—लंडन.

---

(२२)

गांधी कारागृहांत गेले. संत आणि लोकोत्तर पुरुष यांची अखेर अशा रीतीनें व्हावी, ही गोष्ट प्राचीन काळापासून अशीच घडत आली आहे. गतकालच्या राजशासनसंस्थांचा हाच ठरीव मार्ग होता आणि तोच प्राचीनमार्ग आजच्या काळींहि तसाच चालू आहे. प्रचंड धडामोडीच्या वेळीं अर्धवट आणि उसीरां दिलेल्या राजकीय हक्कांची अखेर वाट कशी लागते, याचें स्पष्टीकरण आज पुन्हां एकवार झालें आहे. कांहीं सुदम आणि कांहीं दृढ अशा पद्धतीचा मिश्र राज्यकारभार अखेरीस नेहमींच अवेशी ठरतो. अशा रीतीनें राज्यकारभार करण्यांत राज्यकर्त्यांचा हेतु एकच असतो. हा हेतु फोडा आणि झोडा एवढ्याच शब्दांत सांगतां येईल. मॉंटेग्यू आणि रेडींग हे दोघेहि उदारमतवादी आहेत, असें आम्ही कबूल करतो. गांधी यांना अटक करण्यांत त्यांनीं जी दिरंगाई केली, ती-मुळें जुन्यापुराण्या नोकरशाहीचें पित्त खवळून गेलें. हिंदुस्थानांत लोकनियुक्त राज्यपद्धति सुरू करावी या अंतिम हेतूनें राजशासनांत त्यांनीं ज्या सुधारणा केल्या, त्यामुळें नोकरशाही आधींच भडकली होती आणि त्यांत ही दिरंगाई

म्हणजे आगींत तेल असा प्रकार झाला. या जोडीनें केलेल्या सुधारणांनीं हिंदी लोक संतुष्ट झाले होते, अशातल्या प्रकार मुळींच नाहीं. तेव्हां या सुधारलेल्या राज्यपद्धतीला बळकटी आणण्याकरतां युवराजाला हिंदुस्थानांत आणण्याचा उपक्रम त्यांनीं केला. या सुस्वभावी राजकुमाराचें स्वागत चांगल्या प्रकारें व्हावें म्हणून एकट्या कलकत्त्यांत ५२०९ माणसांस तुरुंग दाखविणें अवश्य असल्याचें दिसून आलें. दडपशाही दिवसेंदिवस वाढत चालली आणि कायदेशीर दडपशाहीबरोबर बेकायदेशीर दुष्टपणाला ऊत आला. हजारों पुढारी तुरुंगांत गेले; पण सारें फुकट. यामुळें असंतोष कमी होण्याऐवजीं तो अधिकच उसळला. अखेरीस मुसलमानांच्या मागण्यांचा एक खलिता हिंदुस्थान सरकाराकडून येऊन थडकला. तुर्की साम्राज्य पुन्हां पूर्ववत स्थापण्यांत यावें, अशी मागणी मुसलमानांनीं केली होती.

हा खलिता प्रसिद्ध झाल्याबरोबर मॅंटिग्यु यांस हिंदी राज्यकारभाराचीं सूत्रें सोडणें भाग पडलें. इंग्लंडच्या राजकीय वातावरणांत मोठें वादळ झालें आणि हिंदुस्थानांत गांधी यांस अटक झाली. या सर्व गोष्टींवरून हिंदुस्थानचा राज्यकारभार यापुढें कसा चालावयाचा याची दिशा निश्चित झाली आहे. हिंदुस्थानांत यापुढें वज्रमुष्टीचें प्राबल्य राहणार आहे. मुसलमानांची मागणी अथवा ब्रिटिश साम्राज्याचे सांप्रतचे हाल, या प्रश्नांशीं आम्हांस तूर्त कांहीं कर्तव्य नसून हिंदुस्थानाची सध्यांची परिस्थिति कशी आहे, एवढेंच आम्हांस पहावयाचें आहे. हिंदुस्थानांतील राष्ट्रीयपक्ष सध्यां किती विस्तृत प्रमाणावर जोरावला आहे, याची साक्ष लॉर्ड रेडिंग यांनीं पाठविलेल्या आणि मॅंटिग्यू यांनीं प्रसिद्ध केलेल्या खलित्यांत चांगली पटते. राष्ट्रीय पक्षाच्या मर्मस्थानीं घाव घालून त्याचा चुरा करण्याकरतां मुसलमानांस आपल्या पक्षाकडे ओढून घ्यावें एवढाच उद्देश या खलित्यानें हिंदी सरकारास साधावयाचा होता. नाहीतर अशा प्रकारें प्रजेच्या मागणीला दुजोरा देण्याचें कृत्य हिंदी सरकारानें केव्हांहि केलें नसतें. कारण आजपर्यंत अशा प्रकारची गोष्ट या सरकाराच्या हातून पूर्वी केव्हांहि घडलेली नाहीं, पण मुसलमानांस लांच देण्याचा हा प्रयत्न इंग्लंडांतील चळवळ्यांनीं विफल करून टाकला. तथापि ज्याच्यामुळें ही चळवळ अद्यापि दंडादंडीपर्यंत पोंहोंचली नाहीं, त्या एकाच गृहस्थाला अटक होऊं नये, ही गोष्ट मात्र या पक्षानें केली नाहीं. ज्याच्या साधुत्वाबद्दल आज साऱ्या जगाची खात्री झाली आहे आणि जी गोष्ट जुलमी अधिकारीसुद्धां कबूल करतात, अशा स्वरूपाच्या

राष्ट्रीय पुढाऱ्याला जेव्हां एकादें सरकार अटक करतें; तेव्हां आपली शासनपद्धति शुद्ध दंडनीतीच्या पायावर उभी आहे, अशी गोष्ट तें स्पष्टपणें कबूल करतें, हें सांगावयास नकोच.

तथापि अशा प्रकारच्या राजशासनसंस्थेचे पाठीराखे इंग्लंडांत आणि अमेरिकेंत पुष्कळ आहेत. केवळ निरुपाय होऊन गांधी यांस अटक करणें हिंदुस्थान सरकारास भाग पडलें, असें या पाठीराख्यांचें म्हणणें आहे. हिंदी राज्यकारभारांत इंग्लंडनें कितीहि चुका केल्या असल्या, तरी अंतर्गत दंग्याधोप्यापासून आणि बाहेरच्या स्वारींपासून हिंदुस्थानचें रक्षण आजपर्यंत एकट्या इंग्लंडानेंच केलें आहे, असें हे लोक मोठ्या हट्टानें म्हणत असतात. इंग्लंडचा प्रबळ हस्त हिंदुस्थानांत नसता, तर अर्वाचीन काळची सुधारणा आणि न्याय यांचा प्रवेश हिंदुस्थानांत झाला नसता आणि ती तेथें टिकूनहि राहिली नसती, असें या पाठीराख्यांचें मत आहे. यांच्या बुद्धिवादानें आमचें निःसंशय समाधान होण्यासारखें नाहीं. ब्रिटिश अमदानी पूर्वीच्या अंदाधुंदीचा अतिरेक यांत केलेला आहे आणि सध्यां जी सुधारणा दिसत आहे, तीहि यांत फुगवून सांगितलेली आहे. सर्व जग सुधारत चाललें म्हणजे त्याबरोबर हिंदुस्थानहि आपोआपच पुढें सरकतें. ही काळप्रवाहाची करणी आहे. त्यांत ब्रिटिशांची अथवा दुसरी कोणतीहि सत्ता तेथें असणें हा काकतालीय न्याय आहे. याकरतां आमच्या सत्तेमुळें अमुक सुधारणा घडून आली, असा कार्यकारणभाव सांगूनें बुद्धिवादाला कधींच मान्य होणार नाहीं. एकादा दरोडेखोर तुमच्या घरांत उघा शिरला आणि दुसऱ्या दरोडेखोरापासून तुमचें रक्षण आपण करतों या सबबीवर तुमचें घर तो धळकावून बसला, तर त्याचा हा बुद्धिवाद तुम्हांस जितका मान्य वाटेल, तितकाच तुमचा सध्यांचा बुद्धिवाद मान्य वाटला पाहिजे. बाहेरून त्यांच्या आमच्या अ... देशांत बंडावे उठले, तर त्यांची जबाबदारी हमी घेऊन स्वसंरक्षण करण्यास हिंदी लोक तयार आहेत. परकीय अमलामुळें वारंवार दुष्काळ पडूं लागले, दारिद्र्य वाढलें, शिक्षण लागामलें आणि एका काळीं धीमंतीच्या वैभवानें लोळणारा देश आज भिकाऱ्यांतला भिकारी होऊन बसला, असा त्यांचा समज आहे. आणि हे सर्व टळान आरण नाहींसें करूं शकूं, असा आत्मविश्वास त्यांना वाटूं लागला आहे. इंग्लंडच्या पायदळांतों काळ्या देशी जवानांच्या प्रमाणांत आपल्या तरुणांची भरती व्हावी आणि कायदे मंडळांची सुधारली जावी, या गोष्टीचा पुरस्कार त्यांनी

आतां आला आहे. स्वराज्य गेलें, तर सुराज्य तरी यावें; पण ब्रिटिश अंमलांत तेंहि घडलें नाहीं, असें ते आतां निक्षून म्हणूं लागले आहेत. हिंदु लोकांनीं ब्रिटिश रियासतीवर जे हे आक्षेप घेतले आहेत, ते थोड्या बहुत फरकानें सरास पाश्चात्य संस्कृतीविरुद्ध लागू पडण्यासारखे आहेत. ज्या दुर्बल राष्ट्रांवर पाश्चात्य संस्कृति जबरीनें लादली गेली, त्या सर्व ठिकाणीं हाच प्रकार घडून आला आहे. अशा रीतीनें इतरांवर सुधारणा लादणे न्याय्य आहे कीं काय, याचा विचार राष्ट्रांनीं आणि त्याबरोबरच अमेरिकेनेंहि करणे अवश्य आहे. ब्रिटिश राज्यानें हिंदुस्थानांत पुष्कळ चांगल्या गोष्टी केल्या आहेत आणि तें आजच कोसळून पडलें, तर तेथें महा अनर्थ ओढवेल हेंहि कबूल केलें, तरी ब्रिटिश राज्याची जी गत आतां लवकरच होणार आहे, तिला तें पात्र नाहीं, असें कोण म्हणेल ? पौर्वात्य लोकांच्या मनांत पाश्चात्य अमलाबद्दल आतां इतका पुरा तिरस्कार बाणला आहे कीं, या अमलांत बऱ्यावाईटाचा खरा अंश किती आहे, याचा विचार करण्याइतकीहि इच्छा त्यास होत नाहीं. हें बुद्धीवादाचें काम अव्यवहार्य पंडितांनीं आतां एखाद्या विश्वविद्यालयाच्या कोठडींत बसून शिळोप्याच्या वेळीं करावें, इतकीच त्याची किंमत आहे, असें सामान्य जनता म्हणूं लागली आहे. आजपर्यंत लुटलें गेलेलें आशीयांतील आणि आफ्रिकेंतील लोक आतां पुरे जागे झाले आहेत. त्यांची मोहीम सुरू झाली आहे. या मोहिमेला अखेरीस कोणतें स्वरूप येईल, हें आज निश्चितपणें सांगतां न आलें; तथापि पाश्चात्य संस्कृतीवर निकराचे हल्ले होण्यास सुरुवात झाली असल्याचें उघड दिसत आहे. आतां इसलामाचें पुनरुज्जीवन होईल कीं दुसऱ्या एखाद्या मानववंशाच्या हातीं जगाचें आधीराज्य जाईल हा प्रश्न आलाहिदा आहे. असे हल्ले होऊं लागले नाहींत, असें म्हणणें निव्वळ शब्दछळ आहे. इजिप्शीयन अथवा हिंदी लोकांच्या सामान्य स्वाभिमानावर त्यांच्या राज्यकर्त्यांकडून हल्ले होत असता इरीगेशनकालवे, रेलवे रस्ते, पोस्ट, टेलिग्राफ इत्यादि सुधारणांचें तुणतुणें वाजविणें म्हणजे पान्यावरोवर भांडणेंच होय. कांहीं काळपर्यंत केवळ आपल्या दारुगोळ्याच्या जोरावर आपलें श्रेष्ठत्व पाश्चात्य संस्कृति सिद्ध करील आणि आरंभाच्या काळांत थोडाबहुत जयहि तिला मिळेल; पण हा तंटा पुढें दीर्घकाळ असाच चालू राहिला, तर या भयंकर युद्धांत दोन्ही पक्षांचाहि विलक्षण नाश होईल, अशी भीति आम्हांस वाटते. कांहीं झालें तरी आजचा हा तंटा अत्यंत चिंताजनक आहे, यांत तिळमात्र शंका नाहीं. या भयं-

आश्रय केला, तर या शोकपर्यवसायी इतिहासाची जबाबदारी त्यांजवर न पडतां आपल्या आधिपत्याचा हक्क असंतुष्ट प्रजाजनांवर जे शुद्ध दंडेलीनें लादूं पाहातात, त्यांच्याच शिरावर पडेल, याबद्दल मात्र आमची पुरी खात्री आहे.

नेशन—( न्यूयार्क अमेरिका. )

---

२३

एका बाजूला वैभवशाली; परंतु सत्ताहीन असा युवराज उभा आहे आणि त्याच्या सन्मुख एक दरिद्री, फक्त शुभ्र कटिवस्त्र नेसलेला आणि कांहीं पादत्राणहि नसलेला, असा गृहस्थ उभा आहे. हृदयभेदी वक्तृत्व आणि उत्कट देशभक्तीची श्रद्धा यांवांचून दुसरें कोणतेंहि शस्त्र अथवा अस्त्र या भिकाऱ्याजवळ नाहीं. या भिकाऱ्याचें नांव गांधी असें आहे. आज भरतभूमीचा खरा मालक हा भिकारी आहे. आसेतुहिमाचल साऱ्या हिंदुस्थानभर त्याच्या शब्दाला वेदवाक्याचा मान मिळत आहे. केवळ कोटयवधि मनुष्यांस त्यानें उचंबळून सोडलें आहे, हीच कायती त्याच्या सार्वभौमत्वाची खूण नसून इतक्या जीवांस त्यानें एकसूत्रांत बद्ध केलें आहे, याच गोष्टीनें त्याचा सर्वगामी अधिकार सिद्ध होतो.

म्याटिन—पारीस.

---

२४

हिंदुस्थानदेश अद्यापि सारा एक झाला नसला, तर आतां तो लवकरच तसा होईल, यांत संशय नाहीं. तशी पूर्ण एकी होण्याला आज जें एक प्रबळ कारण झालें आहे, तें महात्मा गांधी यांची अटक हें होय. यामुळें पुष्कळ मतभेद नाहींसे होऊन देशहिताचे उपाय अधिक एकजुटीनें सुरू होतील. सुप्रसिद्ध रशियन साधु टॉलस्टॉय आणि महात्मा गांधी यांच्या मतांत विलक्षण साम्य आहे. महात्मा गांधी पूर्ण शांततावादी आहेत. ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंड उभारण्यांत ते कोणाला सामील तर होत नाहींतच, पण कोणत्याहि प्रसंगीं लोकांनीं तिचा उपयोग अल्पांशानेंहि करूं नये असा उपदेश ते करतात आणि अशा प्रकारच्या या पुढाऱ्याला हिंदी सरकारानें आज अटक केली आहे.

टॉलस्टॉय हे पुष्कळ वर्षेपर्यंत हाच उपदेश करीत होते. झारशाहीला टॉलस्टॉय हे दीर्घ काळपर्यंत कोट्यासारखे बोंचत होते. झारशाही म्हणजे साऱ्या जगांतली अव्वल प्रतीची दुष्ट आणि शुद्ध दडपशाहीची सत्ता; पण झारशाहीनें सुद्धां

टॉलस्टॉय यांस बंदिवान केलें नाहीं. तसें करण्याची छातीच तिला झाली नाहीं; पण इंग्रजसरकार झारशाहीहून कदाचित् अधिक धाडशी असेल अथवा कदाचित् अधिक मूर्ख असेल. कदाचित या दोन्ही गुणांचा एकत्र परिपाक त्याच्या ठिकाणीं झाला असेल, असेंहि संभवतें.

भरतभूमि ही हिंदी लोकांची पिढीजात मालमत्ता असून इंग्रजांचा हक्क तिजवर नाहीं, असें गांधी यांस वाटतें, हाच त्यांचा मोठा अपराध होय. ब्रिटिश माल कोणीं घेऊं नये, ब्रिटिशांची नोकरी कोणीं करूं नये, ब्रिटिशांनीं चालविलेल्या शाळांत कोणीं जाऊं नये आणि ब्रिटिश कोर्टांत कोणीं वकिली करूं नये, असा असहकार योगाचा मार्ग गांधी पक्षानें स्वीकारला आहे.

गांधी हे या पक्षाचे धाव, प्रवर्तक आणि अध्वर्यु असल्यामुळें सरकारानें त्यांना आज पकडलें आहे. आणि ब्रिटिश सरकाराविरुद्ध ते असंतोष पसरवितात, असा आरोप त्यांजवर आहे. वास्तविक पाहतां हा आरोप खरा आहे, हें उघड आहे आणि हिंदुस्थानांत ब्रिटिश अमलाखालीं भाषणस्वातंत्र्य कितपत मिळतें, हें या गोष्टीवरून अगदीं स्पष्ट दिसत आहे.

गांधी यांनीं कांहीं अपराध प्रत्यक्ष केला आहे, करण्याचा कट केला आहे, अथवा तसा उपदेश केला आहे, म्हणून नव्हे, तर इंग्रजांना असंमत अशा आपल्या कल्पना त्यांनीं उघारून दाखविल्या, एवढ्याचसाठीं गांधी आज अटकेंत आहेत.

त्यांचीं कांहीं विशिष्ट मतें इंग्रजांना नावडतीं आहेत, एवढ्याच गुन्ह्यासाठीं त्यांना अटक झाली आहे, असें आम्हीं मुद्दा ठासून सांगतों. यावरून इतकेंच सिद्ध होतें कीं टॉलस्टॉय यांच्या काळीं राज्यक्रांतीची भीति झारशाहीला वाटत नव्हती; पण इंग्रज सरकारला मात्र ती भीति आज खचित वाटूं लागली आहे.

**चिकागो-हेरल्ड आणि एक्झामिनर.**

---

२५

हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी मॉंटेग्यु यांनीं दिलेल्या राजीनाम्यामुळें साऱ्या जगाच्या राजकीय वातावरणांत मोठी खळबळ उडून गेली आहे. हिंदुस्थान आज स्वराज्याचे हक्क भोगीत आहे, अशा गप्पा अमेरिकन लोक ऐकून आले आहेत. फार काय, पण पारिस येथील तहाच्या परिषदेंत हिंदुस्थानातर्फे एक खास प्रतिनिधीहि बसला होता. फार काय सांगावें, या तहावर सह्या झालेल्या राष्ट्रांत हिंदी

प्रतिनिधींची सही आहे; पण अशा प्रकारचे स्वातंत्र्याचे हक्क भोगणाऱ्या हिंदी राष्ट्राला आपलें मत स्पष्टपणें बोलून दाखविण्याचाहि अधिकार नाहीं, ही मोठ्या नवलाची गोष्ट आहे. तुर्की तह्वाकडे हिंदवासी कोट्यवधी मुसलमानांचीं अंतःकरणें वेधलीं आहेत. अशा स्थितींत हिंदुस्थानाला आपलें मत बोलून दाखविण्याचीहि चोरी आहे. असलें हें स्वराज्य कोणत्या नमुन्याचें आहे, हें जाणण्याची इच्छा पुष्कळ सुबुद्ध अमेरिकनांस होवे, यांत नवल नाहीं.

मांटेग्यु यांनीं आपलें मत बोलून दाखविलें म्हणून नव्हे, अथवा हिंदी सरकारच्या कृतीमुळें नव्हे, तर ती कृति हिंदुस्थानांत उघड झाली म्हणून त्यांस राजीनामा देणें भाग पडलें. शिष्टाचाराचा भंग केल्याचा जो आरोप मांटेग्यु यांजवर आहे, तो किती बाष्कळपणाचा आहे, हें यावरून सिद्ध होतें. तसेंच हिंदुस्थानांत मुस्कटदाबी किती विस्तृत प्रमाणावर चालते, हेंहि यावरून उघड दिसतें. रशियांतील सोव्हियट सरकाराला या बाबतींत हिंदुस्थान सरकारापासून नवीन शिकण्यासारखें असें आतां कांहींच राहिलें नाहीं.

सन–बाल्टिमोर. (अमेरिका.)

---

२६

लोकगंगा हें एक मोठें कोडें आहे. तिचा प्रवाह कोणत्या वेळीं कोणत्या दिशेनें वाहील, याचा नियम सांगवत नाहीं. ही गोष्ट एकाद्या विशिष्ट देशासच लागू आहे, असें नसून साऱ्या जगभर तोच प्रकार आढळून येतो. विशेषतः आजकालच्या दिवसांत तर सामान्य जनतेचें चित्त अतिशय क्षुब्ध आणि अस्थिर झालें आहे. आजच्या स्थितीला तोंड देण्यास काय करावें, हा विचार साऱ्या जनतेच्या मनास आज खळवळून सोडीत आहे. या सामान्य जनसमूहाचीं सूत्रें ज्यांनीं आजपर्यंत आपल्या हातांत खेळविलीं, ते लोक आपल्या कामाला नालायक ठरले होते आणि सामान्य जनतेला काय करावें, हें सुचत नसून ती भांबावून स्तब्ध राहिली आहे. तिच्या ह्या अक्रिय अवस्थेमुळेंच जुन्या विनाशक शक्तींचें कार्य अद्यापीहि चालू आहे. या जुन्या शक्तींनींच महायुद्धाचा वणवा साऱ्या जगभर पेटविला आणि अशा रीतीनें आपला नालायकपणा साऱ्या जगाला सिद्ध करून दाखविला. या सूत्रचालकांच्या नालायकपणाची जी जाणीव जगाला पूर्वी अस्पष्ट होती, ती आतां ढळढळीत झाली आहे. आतां सामान्य जनतेंत अद्यापीहि अक्रियता दिसत आहे, हें खरें; पण ती खरी नसून ती केवळ बाह्य

आहे. ही अक्रियता चिरकालिक स्वरूपाची नाही. लवकरच ती नाहींशी होऊन हा सारा प्रचंड जनसमूह क्रियावान होईल, यांत शंका नाहीं. आज तो स्तब्ध दिसत आहे, याचें कारण इतकेंच कीं, पुढें काय करावें, याचा निश्चय त्यानें अद्याप केला नाहीं. ज्या कोड्यावर आजपर्यंत विचार करण्याचें कारणच जनसमूहाला नव्हतें, तीं सारीं कोडीं आज एकाएकीं दत्त म्हणून उभीं ठाकलीं आहेत. या कोड्यांची आतां अखेरची वासलात लावावयाची, असा निश्चय जनतेनें केला असून हें साधण्याचा मार्ग तो निश्चित करीत आहे. हा निश्चय एकवार झाला, कीं आपल्या कार्यास ती सुरवात करील. तोंपर्यंत जुन्या सूत्रचालकांस आपले मूर्खपणाचे खेळ आणखी चार दिवस खेळण्यास तिनें मोकळिक दिली आहे. आणि या मायेफिरू सूत्रचालकांच्या ज्या कृति सांप्रत चालू आहेत, त्यांवरून आपल्या पापाचे घडे आपल्याच हातानें ते मोठ्या त्वरेनें भरीत आहेत, असें स्पष्ट दिसत आहे. लोक त्यांजकडे आज कानाडोळा करीत आहेत; पण यावरून त्यांच्या कृती लोकांना पसंत पडत आहेत, असें समजण्याचें मात्र कारण नाहीं. उलट पक्षीं त्यांच्यांत जो असंतोष दिवसेंदिवस अधिक फैलावत आहे, त्यावरून आपल्या या जुन्या नोकरांवरील त्यांचा विश्वास पूर्ण उडाला आहे, हेंच प्रत्यहीं सिद्ध होत आहे. युद्धकालापूर्वी लोकनेतृत्वाची जी कसोटी होती, ती आता रद्द झाली आहे. त्या काळीं जनतेकडून ज्यांनीं नेतृत्वाचीं संमतिपत्रें मिळविलीं, ते लोक चालू काळीं निरुपयोगी ठरत आहेत. त्यांच्या सनदा जनतेनें आतां रद्द केल्या आहेत. आतां ही सनद मिळविण्यास लागणारी परीक्षा पूर्वीहून फार कडक झाली आहे. या परीक्षेंत पसार होतील, असे धुरीण जगांत आजकाल फारकरून कोठेंच आढळत नाहींत. पूर्वीच्या परीक्षेंतील विषय आतां वगळले गेले आहेत. एकाद्याचें ध्येय फार उच्च, एवढ्याच कारणामुळें तो आतां नेता होऊं शकत नाहीं. एकाद्याची दानत चांगली, अथवा दुसऱ्या एकाद्याची वर्तणूक फार प्रामाणिकपणाची एवढ्याच गुणावरून नेतृत्वाची सनद जनतेकडून त्याला मिळत नाहीं; तर त्याची त्यागाची सिद्धी कोठपर्यंत आहे, याचाच विचार लोक आधीं करतात. स्वतःचीं सुखें सर्वतोपरी गमावण्यास, आपल्या अडचणी बाजूला ठेवण्यास आणि प्रसंगीं देहदानहि करण्यास तो तयार आहे कीं नाहीं, याचा विचार जनता आधीं करते. आपल्या ध्येयाचा प्रसार साऱ्या जगांत करून तें सर्वांस कबूल करावयास लावण्याची धमक त्याच्या अंगीं आहे कीं नाहीं, याचा विचार जनता आधीं करते.

नेतृत्वपदवीसाठीं हपापलेल्या प्रत्येक उमेदवाराला जनतेचा पहिला प्रश्न हाच, कीं 'बाबारे, तूं अशा प्रकारचा आहेस काय ? नसशील, तर आम्हास तशा लायकीचा दुसरा कोणीतरी शोधावा लागेल!' नेतृत्वाच्या लायकीसंबंधीं सामान्य जनतेच्या चित्तांत पूर्वी अनेक भ्रम होते; पण तिचा आतां भ्रमनिरास झाला आहे. तिचे डोळे आतां लख्ख उघडले आहेत !

आमच्या हिंदुस्थानात तर हा भ्रमनिरास आतां अगदीं पूर्णत्वानें झाला आहे; पण भरतभूमीचें सुदैव बलवत्तर असल्यामुळें इतर देशांप्रमाणे शोधाशोध करण्याचें कारण तिला पडलें नाहीं. आमचा नेता कोण ? या प्रश्नाला तिला तावडतोब उत्तर मिळालें. साऱ्या देशांतून उठलेल्या या एका ध्वनीला प्रत्युत्तर म्हणून महात्मा गांधी पुढें आले आणि उमेदवार म्हणून ते उभे राहिले. त्यांची ही परीक्षा किती यशस्वी ठरली आणि तींत ते कसे उत्तीर्ण झाले, याचा इतिहास आतां साऱ्या जगाला विदित झाला आहे. लोकनेतृत्व संपादावें या आशेनें जे कोणी पुढें येऊं पहात असतील, त्यांनीं या अनुभवानें शहाणें व्हावें. गांधी यांचें जिवंत उदाहरण नजरेसमोर ठेवून त्यांचाच अनुवाद ते करतील, तरच लोकनेतृत्वाची माळ त्यांच्या गळीं पडेल आणि त्यांत काहीं उणीव आली, तर या परिक्षेत ते सपशेल नालायक ठरतील.

गेल्या आठ वर्षांच्या अवधींत जुनें जग मरून जाऊन त्याच्या जागीं नवें जन्मास आलें आहे. आणि हा बदल इतक्या झपाट्यानें झाला आहे कीं, वर्षंभरांत होणाऱ्या घडामोडी आतां महिन्याच्या अवधींत होतात. आणि एका वर्षांत दहा वर्षांच्या कार्याची समाप्ती होऊन जाते. पुष्कळांना हा वेग कदाचित् आवडत नसेल; पण त्याला आतां उपाय नाहीं. तुम्हाला आवडो अगर न आवडो, ही प्रगती अशाच झपाट्यानें चालू राहणार. याकरतां मानवजातीची सेवा करूं पाहणाऱ्या प्रत्येक उमेदवारानें आपली सर्व विचारशक्ति नव्या जगाच्या नव्या परिस्थितीचा विचार करण्याकडे खर्च केली पाहिजे. जुनें जग मरून गेलें आहे, जुनीं कोडीं त्याजबरोबरच अस्तंगत झालीं आहेत. जुन्या जगांत जी उमेदवारी मान्य म्हणून गणली जात होती, तिची गरज या नव्या जगांतील नव्या जगास आतां उरली नाहीं. नव्या जगाला साजेल आणि नव्या परिस्थितीला अनुकूल होईल, अशा प्रकारें आपली वर्तणूक ठेवण्यास जे सिद्ध असतील, त्यांनाच यापुढें नेतृत्वाची परवानगी मिळणार आहे. कांहीं नेते अत्यंत निःस्वार्थी आहेत, यांत संशय नाहीं. त्यांचा हेतु शुद्ध आहे, त्यांत स्वार्थाचा लेश नाहीं, मोठे-

पणाची हाव त्यांना नाहीं, मुत्सद्दी म्हणून जगापुढें मिरविण्याची महत्वाकांक्षा त्यांच्या पुढें नाहीं आणि अशा लोकांना कांहीं वर्षांपूर्वी नेतृत्वाचा मान जनतेनें मोठ्या उत्सुकतेनें दिला असता, हें उघड आहे. हिंदुस्थानांत अशा प्रकारच्या नेत्यांची उणीव मुळींच नाहीं. त्यांची खरी किंमत पारखून योग्य तो मान जनतेनें त्यांना पूर्वी दिलाहि होता आणि अजूनहि जनतेच्या चित्तांत त्यांच्या-बद्दल अनादर नाहीं; तथापि त्यांनाहि आतां नेतृत्व देण्यास लोकांची तयारी नाहीं. त्याचप्रमाणें पूर्वी सरकारावर तुटून पडून आपला स्वार्थ साधणारे लोकहि पुष्कळ होते; पण यांचे हे लपंडाव आतां उघडकीस आले असून त्यांच्या देश-भक्तीचा पोकळपणा जगासमोर आतां उघडा झाला आहे. जुन्या पद्धतीच्या टीका, सरकारच्या कृतीवर आक्षेप घेण्याची पद्धति, सरकारास करावयाच्या सूचना, वगैरे सार्‍या गोष्टी आतां रद्द झाल्या आहेत. ते सारे मार्ग जनतेनें आतां नापसंत केले आहेत. नव्या जगाच्या गरजा भागविण्यास, हे मार्ग अपुरे आहेत, अशी जनतेची पूर्ण खात्री झाली आहे. लोकांपासून वेगळें राहून आपला मान संभाळून, मोठेपणास धक्का लागूं न देतां, लोकसेवक बनूं पाहणें, हें लोकसेवेचें एक सुधारलेलें ढोंग आहे, हें लोकांस कळून चुकलें आहे. आमच्या देशांत असल्या लब्धप्रतिष्ठित पुढार्‍यांची वाण नाहीं. तेल्यातांबोळ्यांत मिसळ-ण्याची लाज वाटणारे पायलीचे पंधरा पुढारी आमच्या देशांत आजहि हवे तितके आहेत. लोकांनीं आपण होऊन नेतृत्वाची माळ घेऊन पुढें यावें आणि आपल्या तळघरांतुन आपणास बाहेर उचलून आणून आपल्या गळ्यांत ती आग्रहानें टाकावी, अशी इच्छा करणारे लोक हिंदुस्थानांत आज शेंकड्यानें मोजतां येतील. आपणास नेतृत्व दिल्यामुळें नुकसान किती होतें, याचा प्रत्यक्ष अनुभव लोकांस यावा, असाच जणूं काय त्यांची इच्छा असते आणि असा अनुभव येऊन लोक-नेतृत्व आपणास शोधीत येईपर्यंत आपल्या गुहेच्या एकांतवासांत राहण्याचा हक्क आपणांस आहे, असें त्यांस वाटत असतें; पण अशा रीतीनें मार्गे राहणारी माणसें बहुतांशीं मृतवत् स्थितींत पडलेली असतात. जिवंतपणाचा जोमच त्यांच्या ठिकाणीं नसतो. राष्ट्राच्या आजच्या उद्योन्मुख अवस्थेंत जिवंत माणसांची जरूर आपणास आहे. याकरतां ही उमेदवारीची सनद ज्यास मिळवावयाची असेल, त्यांनीं आपलें उच्चपद सोडून महात्मा गांधीप्रमाणें आखा-ड्यांत उतरलें पाहिजे आणि स्वतःच्या अत्यंत उज्वल दानतीनें बहिर्‍यांस ऐका-वयास लावून आंधळ्यांस त्यांनीं डोळस केलें पाहिजे. महात्मा गांधींनीं राजका-

रणाला धर्मयुद्धाचें स्वरूप दिलें. हें धर्मयुद्ध जगाच्या इतिहासांत आजरामर होऊन बसेल. साऱ्या जगभर आज जीं पातकें चाललीं आहेत, तीं त्यांनीं चवाठ्यावर मांडलीं आहेत. 'साऱ्या जगाचीं पातकें पचवून भस्म करील, अशा प्रकारची शक्ति ज्याच्या उदरीं आहे, असेच नेते जगाला पाहिजेत.' असें कार्लाइलनें म्हटलें आहे. आज ही अट पुरी करणारा नेता, साऱ्या जगांत एकटा महात्मा गांधी हाच होय. तो नेत्यांचा नेता आहे. लोकनेतृत्व कसें करावें, याचा धडा जगांतील नेत्यानें त्याजपासून शिकला पाहिजे. नेत्यांचें सार्वभौमत्व गांधी यांना प्राप्त होण्याचें कारण हेंच कीं त्यांनीं स्वतःचें नेतृत्व परमेश्वराच्या आधीन केलें आहे. लोकांस भोगावीं लागणारीं सारीं दुःखें गांधी यांनीं स्वतः अनुभवलीं आहेत. अनेक विपत्ती भोगून त्यांचें हृदय वज्रप्राय बनून गेलें आहे. या हृदयाचा प्रत्येक ठोका केवळ लोकसेवेसाठींच पडतो. सांप्रतच्या दुःखगर्तेतून लोकांची मुक्ति व्हावी, या एकाच इच्छेनें या हृदयाचा प्रत्येक ठोका चालू राहिला आहे. यामुळें या ठोक्याला एवढें प्रचंड सामर्थ्य आलें आहे कीं, अन्याय आणि दंभ यांजवर उभारलेल्या मोठ्या प्रचंड आणि विस्तीर्ण इमारती या ठोक्याच्या एकाच प्रहारानें शतधा चूर्ण होऊन जातात. अगदीं सामान्य माणसांपेक्षां अधिक असे कोणतेहि हक्क आपणांस नाहींत, असें गांधी म्हणतात; पण असे अधिक हक्क नसणें, हाच मोठा हक्क होय. त्यांचीं शस्त्रास्त्रें इतकीं साधीं आहेत कीं, दुबळ्यांतील दुबळ्या मनुष्यालाहि तीं निर्भयपणें वापरतां येतात आणि तीं इतकीं साधीं असतांहि आपला कायभाग निश्चयानें उरकण्याइतका तीव्रपणा त्यांच्यांत आहे.

साऱ्या मनोभावना गांधी यांच्या रूपानें व्यक्त झाल्या आहेत. किंबहुना आज गांधी म्हणजे हिंदुस्थान, असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. हिंदुस्थानच्या लोकांस जीं दुःखें आज भोगावीं लागत आहेत, त्या साऱ्यांचा अनुभव आपणांस यावा, एवढाच हक्क मागतात. मनुष्यजातीला आजपर्यंत सुधारणाऱ्या साऱ्या पुरुषांनीं असाच हक्क पूर्वींहि मागितला होता. ख्रिस्ती होणें, या शब्दाचा खरा अर्थ काय, हें जगाला ज्यांनीं पहिल्यानें शिकविलें, त्यालाहि हा हक्क प्राप्त झालेला होता. महात्मा गांधी हेच आपले उद्धार कर्ते आहेत, असें हिंदुस्थान आज म्हणत आहे आणि अशा रीतीनें आपलें नेतृत्व तें कोणास देईल, हेंहि त्यानें सांगून टाकलें आहे. लोकसेवकांची खरी कसोटी आज अनंतकाळापासून ही एकच आहे आणि याच कसोटीला आजच्या नेत्यांनींहि पूर्ण उतरलें पाहिजे, असें भरतभूमि निक्षून सांगत आहे.

**एक लेखक—क्रॉनिकल.**

२७

कायदा आणि न्याय यांत घटस्फोट होण्याचा सध्यांचा काळ आहे आणि आज एका सर्वश्रेष्ठ हिंदूवा न्याय होऊन त्याला तुरुंगाची शिक्षा मिळाली, ही गोष्ट या काळाला सर्वतोपरी शोभणारी आहे, असेंच म्हटलें पाहिजे. या घटस्फोटाच्या कबरीवर हा कळस चढला आहे. हिंदी लोकांच्या चित्तांतून या खटल्याची हकीकत कधींहि जाणार नाहीं. आणि हा इतिहास वाचीत असतां ज्याचें अंतःकरण द्रवलें नाहीं, असा एकहि हिंदी मनुष्य सांपडावयाचा नाहीं. अखिल मानवजातीची सेवा करण्याकरतांच जन्म घेतलेल्या दुसऱ्याहि एका व्यक्तीच्या खटल्याची हकीकत यावेळीं झाल्यावांचून रहात नाहीं. दोन हजार वर्षांपूर्वी न्यायाचा हाच मासला होऊन न्यायाच्या नांवाखालीं एका शोकपर्यवसायी इतिहासाचें पर्यवसान एका नरश्रेष्ठाच्या बलिदानांत झालें. हें बलिदान झाल्यानंतर मनुष्यप्राणी अधिक शहाणा झाला असेल आणि असला नितांत शोकपर्यवसायी प्रसंग पुन्हां घडून येणार नाहीं, अशीहि आशा कोणास वाटली असेल; पण परवांच्या प्रसंगावरून ही आशा फोल ठरली आहे. जें बलिदान परवां झालें, तें आतां तरी अखेरचें होईल आणि असल्या प्रसंगाच्या पुनरावृत्तींनीं मानवजातीच्या इतिहासाला कालिमा लागणार नाहीं, अशीच खटपट सदोदित करणें हें प्रत्येक देशप्रेमी हिंदी मनुष्याचें कर्तव्य आहे. परवांच्या खटल्याच्या हकीकतीस विस्तारानें सांगण्यासारखें असें कांहीं नाहीं. दोन हजार वर्षांपूर्वीच्या कयालाफासचा पुन्हां विजय झाला आणि न्यायदेवतेला लज्जेनें अधोवदन करून आपलें मुख पुन्हां झांकून घ्यावें लागलें. दोन हजार वर्षांपूर्वी ख्रिस्ताच्या शत्रूंनीं ज्याप्रमाणें कायद्याचा बोज राखला, त्याचप्रमाणें या प्रसंगींहि कायद्याचा मान राखला गेला. कायदा हल्लीं ज्या स्थितींत सांपडला आहे, तिची जाणीव असणारांना या खटल्याच्या निकालाबद्दल केव्हांच संशय नव्हता. हल्लींच्या स्थितींत सरकारी हस्तकांचा हात ज्यावर पडला, तो घडपणीं सुटला, असें कधींच व्हावयाचें नाहीं. हल्लींच्या फौजदारी कायद्याचीं कलमें इतकीं विस्तृत आहेत कीं तुमची चळवळ कितीहि निरुपद्रवी असली अथवा तुमचा हेतु कितीहि उच्च असला, तरी या जाळ्यांतून तुम्ही सुटाल, ही गोष्ट काळत्रयीं घडावयाची नाहीं. या जाळ्यांत तुम्हांस अडकवावें, इतकी इच्छा नोकरशाहीला होण्याचा अवकाश की दुसऱ्याच क्षणीं तुमचे पाय त्यांत पुरे अडकतात. अशा स्थितींत महात्माजींनीं गुन्ह्याला एकदम कबुली दिली, ही गोष्ट सर्वथैव योग्य झाली.

दुष्टांच्या कायद्यानें प्रस्थापित झालेल्या सरकाराविरुद्ध असंतोष उत्पन्न व्हावा, अशाच धोरणानें महात्माजींनीं ही चळवळ चालविली होती, यांत शंका नाहीं. फार काय, पण दुष्टांच्या नोकरशाहीविरुद्ध जो जो कोणी लेख लिहितो, त्याचाहि उद्देश असाच असतो, असें म्हणावयास आम्हांस प्रत्यवाय दिसत नाहीं. आज परिस्थितीच अशी आहे कीं, उन्नतीच्या मार्गांत पुढें पाऊल टाकण्यास नोकरशाही-विरुद्ध असंतोष उत्पन्न करण्याशिवाय दुसरा मार्गच शिल्लक नाहीं. सरकारावर होणारी टीका आणि राजद्रोह यांत कायद्यानें फरक केला आहे, हें आम्हांसहि ठाऊक आहे; पण वस्तुतः हा फरक सापरेची साल काढण्याच्या प्रकारांतीलच होय. कारण सरकारच्या कृत्यावर टीकेचा ओघ एकसारखा चालू राहिला म्हणजे सरकाराबद्दल अप्रीति उत्पन्न झाल्यावांचून राहणें शक्य नाहीं. सरकाराबद्दल जी पूज्य बुद्धि म्हणून प्रजेच्या ठायीं असते, तिचा नाश अशा टीकेनें झाल्यावांचून रहात नाहीं. गांधी आणि त्यांनीं चालविलेली चळवळ यांजमुळें सरकार आणि प्रजा यांत राजकीय दृष्ट्या दुफळी झाली असून त्यामुळें प्रजेतला असंतोषहि वाढला आहे, असें जें न्यायाधिशानें म्हटलें तें सर्वथा खरें आहे. प्रजेचें स्वातंत्र्य नष्ट करण्याच्या कामीं १२४ अ हें कलम सर्व कलमांतल्या राजाच्या ठिकाणीं आहे, असें महात्माजींनीं म्हटलें आणि ही गोष्टहि सर्वांशीं खरी आहे. सामान्य नागरिकत्वाचे सारे हक्क या कलमामुळें संपुष्टांत आले आहेत.

कायद्यानें सरकाराबद्दल प्रीति उत्पन्न करतां येत नाहीं. एकाद्या मनुष्याबद्दल एकाद्याला प्रेम वाटत नसलें, तर त्याला आपलें मत बोलून दाखविण्यास हरकत नसावी, हें महात्माजींचें म्हणणें आम्हांस सर्वथैव मान्य आहे. त्याचप्रमाणें महात्माजींनीं आपला अपराध कबूल केला, ही गोष्टसुद्धां त्यांच्या तत्वाला अनुरूप अशीच घडली. आतां, आपणास कायद्यानें सांगितलेली भरपूर शिक्षा द्यावी, अशी जी मागणी महात्माजींनीं केली, तिच्या औचित्याबद्दल पुष्कळांना शंका येण्याचा संभव आहे. केवळ आपल्या धीटपणाचें प्रदर्शन करण्याच्या हेतूनें हा घमेंडखोरीचा प्रकार त्यांनीं केला, असाहि आरोप कोणी त्यांजवर करतील. गांधी यांच्या चारित्र्याची थोडी बहुततरी माहिती ज्यांना आहे, त्यांच्या चित्तांत असल्या प्रकारची दुष्ट शंका कधींच यावयाची नाहीं, हें आम्हांस पक्कें ठाऊक आहे. गांधीजींचें उज्वल चरित्र आणि असला नाटकीपणा या वस्तु स्वभावतःच इतक्या विरोधी आहेत कीं त्यांचा एकत्र वास त्रिकालांतहि होणें नाहीं, हें त्यांच्या साऱ्या अनुयायांना ठाऊक आहे; पण हिंदी राष्ट्राला आज पुष्कळ शत्रू आहेत. आणि

सांपडेल त्या भलत्याबुऱ्या प्रसंगाचा फायदा घेऊन त्यांजवर शिंतोडे उडविण्यास ही मंडळी मागें सरावयाची नाहीं. याकरतां असल्या बालिश आक्षेपालाहि उत्तर देणें फार जरूरीचें झालें आहे. आपणास भरपूर शिक्षा द्यावी ही महात्माजींची मागणी घमंडखोरपणाची नव्हती. 'जा, तुझ्यानें होईल तें करून घे!' असें म्हणण्याचा या मागणीचा रोंख नव्हता, तर ज्या हेतूकरतां महात्माजींवर हा खटला झाला, त्या हेतूची पूर्तता भरपूर शिक्षेशिवाय झाली नसती. शक्य तितका दीर्घ काळपर्यंत महात्माजींना अलग ठेवावें, हीच इच्छा या खटल्याच्या मुळाशीं होती. १२४ अ हें कलम घडविलें त्यावेळींहि तें याच इच्छेनें घडविलें गेलें. जुन्याकाळीं वाटेल त्याला उचलून वाटेल तितका काळ तुरुंगांत टाकावें, असा प्रकार सत्ताधीश करीत असत; आणि १२४ अ हें कलम म्हणजे, याच प्रकाराची सुधारलेली आवृत्ति असून त्याचा उपयोगहि आजपर्यंत असाच झालेला आहे. नोकरशाहीच्या शस्त्रागारांतील हें वज्र आहे, आणि त्याचा उपयोग केवळ राजकीय चळवळी विरुद्धच आजपर्यंत झाला आहे. केवळ शांतता आणि कायद्याचा मान राखण्यासाठीं अथवा आपला राज्यकारभाराचा गाडा सुरळीत हांकण्यासाठीं या शस्त्राचा उपयोग नोकरशाही करीत नसून तो केवळ राजकीय दृष्टीनेंच ती करीत असते. आक्षेपकांची टीका विनतोड झाली आणि तिला उत्तर देण्याची सोय राहिली नाहीं, ती टीका लोकांस पूर्णपणें पटून लोकांत खळबळ उडाली आणि त्यामुळें आपल्या रक्षणाचीं साधनें धोक्यांत येऊं लागलीं, असें दिसून येतांच या कलमाच्या तटबंदीचा आश्रय नोकरशाही करते आणि या गडावर ती एकदां सुखरूप पोंचली की तिला हायसें होतें. याकरतांच हें कलम साऱ्या फौजदारी कायद्याचा राजा आहे, असें महात्माजींनी म्हटलें. अशा स्थितींत याचा उपयोग करावयाचा तो तितक्याच महत्वाच्या कामीं झाला पाहिजे व त्यानें मोठा कार्यभाग उरकला पाहिजे, हें अगदीं स्वाभाविक आहे. एखाद्या प्रचंड वाफेच्या घणाचा उपयोग करून माशी चिरडणें ही गोष्ट अर्थातच हास्यास्पद होईल. याकरतां आपणास अल्पशिक्षा झाली, तर नोकरशाहीचें समाधान होणार नाहीं, आणि १२४ अ कलमासारख्या वज्रप्रहाराचा मोजहि राहणार नाहीं, ही गोष्ट ध्यानीं आणून भरपूर शिक्षेची मागणी महात्माजींनीं केली, हेंच उचित होय. गेल्या महायुद्धांत हिंदेनबर्गव्यूह म्हणून जी संरक्षक रचना प्रसिद्ध झाली होती, तिच्याच तोडीस १२४ अ कलम हें नोकरशाहीच्या दृष्टीनें समजावयाचें आहे.

कोणत्या राजकीय अपराधाचा किती अंशाचा दुष्परिणाम होतो, हें ठरविण्याचें कांहीं कोष्टक कोणाला उपलब्ध झालें नाहीं. आणि अशा निश्चित माप-

नाच्या अभावीं नोकरशाहीची इच्छा तृप्त करणें, हा एकच मार्ग न्यायाधीश म्हणविणाऱ्या व्यक्तीला मोकळा असतो. महात्माजींना दिलेली सहा वर्षांची शिक्षा आसुरी आहे, असे पुष्कळांना वाटेल. असल्या प्रकारच्या आसुरी शिक्षे-विरुद्ध लॉर्ड मोर्ले यांनीं एका काळीं ओरड केली होती, असेंहि आम्हांस स्मरतें; पण तेव्हांचा काळ निराळा आणि आतांचा निराळा. आतां असल्या आसुरी शिक्षेबद्दल फारशी फिकीर न वाटण्याइतकी लोकांची तयारी झाली आहे! ही शिक्षा देतांना न्यायाधिशाचें चित्तहि राजकीय विचारांतच गुरफटलेलें होतें, हें त्यानेंच सिद्ध करून दाखविलें आहे. टिळक यांना पूर्वी सहा वर्षांची शिक्षा झाली होती, आणि ही शिक्षा गांधी यांना दिल्यास त्यांना कुरकुरण्याचें कारण नाहीं, असें न्यायाधिशानें स्वतःच बोलून दाखविलें आहे. त्याचप्रमाणें त्याचे पुढील शब्द-हि त्याची अंतर्गत भावना स्पष्ट करतात. तो म्हणतो, 'हिंदुस्थानांतलें सांप्रतचें वातावरण बदलून गांधी यांच्या शिक्षेची मुदत कमी करण्याजोगी परिस्थिति प्राप्त झाली, तर माझ्याहून अधिक आनंद कोणाला होईल, असें नाहीं.' या कायदेशीर पांडित्याचा आमच्या सरळ भाषेंतील अर्थ असा:—'नोकरशाहीला तुम्ही सळो का पळो करून सोडलें आहे आणि तुम्हांला मोडणें सुरक्षितपणाचें होईल असें नोकरशाहीला वाटूं लागेपर्यंत तुम्हांस जनतेंतून बाहेर काढणें इष्ट आहे.' न्यायाधिशाच्या कायदेशीर भाषेचें सरळ भाषेंत भाषांतर असें आहे. यांतील मुद्दा लक्षांत घेतला म्हणजे नोकरशाहीच्या अमलांत लोकांना खरे हक्क आणि खरें स्वातंत्र्य कितपत आहे, याबद्दल कोणाच्या मनांत कांहीं शंका असली, तर ती पार होऊन गेली पाहिजे; तथापि केवळ नोकरशाहीच्या मर्जी-वर गांधी यांची सुटका होण्याचा काळ फार लांबेल, असें होऊं नये, इतकीच आमची इच्छा आहे. गांधी यांच्या अटकेमुळें आमच्या चळवळीला मोठा धक्का बसला आहे, ही गोष्ट लपवून ठेवण्यांत अर्थ नाहीं. गांधी यांची नेतृत्वकुशलता आणि त्यांचें वजन यांस आज हा देश मुकला आहे. गांधी यांची जागा भरून निघणें ही गोष्ट सहजासहजीं घडणारी नव्हे. तथापि या तडाक्यानें आमच्या देशापेक्षां सरकारचेंच नुकसान अधिक होईल, हें उघड आहे. गांधी यांच्या कारागृहवासामुळें हिंदुस्थानांत घडून येणारी जूट दुसऱ्या कोणत्याहि उपायांनीं साध्य करतां आली नसती.

हिंदुस्थानांत जी दमननीति सुरू करून हजारों लोकांस सरकारानें कारागृहांत पाठविलें, त्या नीतीच्या मंदिराचा कळस या कृत्यानें सरकारानें चढविला आहे.

सरकार आणि प्रजा यांजमधील तंटा आज इतक्या भीषण स्वरूपाचा झाला आहे कीं, लोकांचा जोम चिरडून टाकण्यासाठीं आपल्या शस्त्रागारांतील साऱ्या निर्वाणीच्या शस्त्रास्त्रांचा उपयोग करणें सरकारास भाग झालें आहे. हा उपयोग करीत असतां सामान्य नीतितत्वांचा विसरहि सरकारला पडला आहे, ही गोष्ट गांधी यांना मिळालेल्या शिक्षेवरूनच सिद्ध होते. ज्याच्या दानतीवर कसलाहि कलंक आजपर्यंत आला नाहीं, ज्याचें ध्येय उच्चतम, ज्याचें चारित्र्य अत्यंत पवित्र अशा अत्यंत पूज्य आणि अजातशत्रु विभूतीला सहावर्षांसारख्या दीर्घकाळापर्यंत तुरुंगांत डांबून ठेवताना, या नोकरशाही चित्ताला यत्किंचितहि दिक्कत वाटली नाहीं. महात्मा गांधी यांच्या स्वरूपांत आज आपणास केवढ्या उच्च स्वरूपाचा नेता मिळाला आहे, हें या खटल्यावरून स्पष्ट सिद्ध झालें आहे.

आज आपल्या परीक्षेची मोठी कठिण वेळ येऊन ठेपली आहे. महात्माजींच्या कारागृहवासामुळें आपली चळवळ नामशेष झाली अथवा तिचें रूप विकृत होऊन तिचें पर्यवसान रक्तपातांत झालें, तर सरकारचा विजय होऊन त्याचें हें कृत्य न्याय्य होतें, असें सिद्ध होईल. उलटपक्षीं ही चळवळ पूर्वीच्याच जोमानें आणि त्याच शुद्ध स्वरूपानें चालू राहिली, तर सरकारच्या पदरीं पूर्ण अपेशाचें माप पडेल. आपली श्रद्धा कोणत्या प्रतीची आहे, हें साऱ्या जगाला निःसंशय सिद्ध करून दाखविणें हें आज हिंदी लोकांच्या हातीं आहे.

हिंदु–मद्रास.

---

२८

हिंदुस्थानचे महात्मा गांधी यांनीं जें कार्य सुरू केलें आहे, त्याचें महत्व एकट्या हिंदुस्थानापुरतेंच नसून तें जगद्व्यापक आहे. त्या कार्याचा विचार आज तुम्हापुढें करण्याचें मीं योजिलें आहे आणि अशा वेळीं पूर्वीच्या एका अशाच प्रसंगाची आठवण मला झाल्यावांचून रहात नाहीं. साऱ्या जगांत आज लोकोत्तर श्रेष्ठ असा पुरुष कोण, या प्रश्नाचा विचार आपण केल्याला फार दिवस झाले नाहींत. या व्यासपीठावरून मीं महात्मा गांधी यांची योजना त्यावेळीं मीं केली होती; आणि आजहि माझ्या चित्ताची अशीच खात्री आहे. ती वेळ आणि आजची वेळ यांत आज केवढें अंतर पडलें आहे पहा! त्या वेळीं गांधी यांचें नांव हिंदुस्थानच्या सरहद्दीबाहेर फारसें ठाऊक नव्हतें. आणि मला तरी केवळ महत्त्वेंच

तें कळलें. मला जी तुटपुंजी माहिती त्या वेळीं मिळाली, त्या वेळीं धर्मकार्याच्या बाबतींत एक शककर्ता आणि लोकोत्तर दानतीचा पुरुष निर्माण झाला आहे, असें माझ्या चित्ताला वाटलें. या वेळीं महात्माजीसंबंधीं विशेष कांहींच माहिती मला मिळाली नव्हती. ही माहिती मिळविण्यासाठीं मीं केलेले सारे प्रयत्न विफल झाले होते; पण त्या वेळेची ही स्थिति आज पार बदलून गेली आहे. सान्या वर्तमानपत्रांच्या पहिल्याच पृष्ठावर गांधी यांचें नांव झळकूं लागलें आहे. या देशांतील (अमेरिका) मासिकांत आणि समालोचकांत किती तरी निबंध या विषयांसंबंधीं प्रसिद्ध झाले आहेत. त्याचप्रमाणें इंग्लंड आणि युरोपांतील देश यांतहि किती तरी मजकूर प्रसिद्ध होत आहे. न्यूयार्क वर्ल्ड हें अमेरिकेंतील मोठें वजनदार पत्र आहे. या पत्रानें आपला एक प्रमुख बातमीदार हिंदुस्थानची स्थिति निरीक्षण करण्याकरतां पाठविला. या बातमीदारानेंहि गांधी आणि त्यांची असहकार योगाची चळवळ याजविषयीं बरेच निबंध लिहिले. केवळ थोड्याशा महिन्यामागेंच गांधी ही एक अप्रसिद्ध व्यक्ति होती; पण एवढ्या अवधींत आज महात्माजींची कीर्ति सान्या जगांत दुमदुमून राहिली आहे आणि ती यावच्चंद्रदिवाकरौ चालेल, अशींहि चिन्हें आज दिसूं लागलीं आहेत. अवघ्या जगाचें लक्ष आज या एकाच व्यक्तीकडे वेधून राहिलें आहे. १९१८।१९१९ या दोन सालांत वुड्रोवुइलसन यांनीं जें स्थान मिळविलें होतें, अथवा १९२०।२१ सालीं निकोले लेनीन हे ज्या पदावर आरूढ झाले होते, तें स्थान एका वामनमूर्ति पौर्वात्यानें आज मिळविलें आहे. कोणत्याहि सरकारी अमलदारीची जागा या गृहस्थाच्या हातीं नव्हती. याला उज्वल कीर्ति अथवा अतुल सामर्थ्य यांपैकीं कशाचीहि इच्छा नाहीं आणि आजमितीला हा महात्मा ब्रिटिश तुरुंगांत लोखंडी गजाच्यामागें झुकून जात आहे!

केवळ एकाच व्यक्तीच्या आयुष्यक्रमांत अशी प्रचंड उलथापालथ होईल ही गोष्ट अगदीं अकारण घडलेली नाहीं. ती घडण्याला तशींच बलवत्तर कारणें असलीं पाहिजेत. आपणापासून दूर अशा या जगाच्या भागांत आज ज्या गोष्टी घडत आहेत, त्यांपैकीं दोन चार गोष्टींचा विचार केला म्हणजे तेथें वारा कोणत्या दिशेनें वहात आहे, हें आपल्या लक्षांत येईल आणि आजच्या सुप्रभातीं हेंच काम करण्याचें मीं योजिलें आहे.

हिंदुस्थानांत आज राष्ट्रीयपक्षाची कल्पनातीत वाढ झाली आहे. थोड्याशा वर्षांपूर्वी स्वराज्यवाद्यांच्या पक्षांत कांहीं माथेफिरू आणि कांहीं अत्याचारी एव-

हेच लोक होते. वसाहतींचें स्वराज्य हेंच ध्येय त्यावेळीं मोठा जनसमूह आणि त्याचे बौद्धिक पुढारी यांच्यापुढें होतें. साम्राज्यांत राहून वसाहतींना जो अधिकार आहे, तो आपणांस मिळाला म्हणजे अधिक कर्तव्य कांहीं उरलें नाहीं, असा समज त्या वेळीं होता. यापलीकडे जाण्याची इच्छा त्या वेळीं कोणाला नव्हती आणि ती सफल होण्याची आशा त्याहून नव्हती. खालचा सामान्यवर्ग अज्ञानांत गढलेला होता आणि देशांत काय चाललें आहे, याची खबरहि त्याला नव्हती; पण आज ब्रिटिश अम्मल झुगारून देण्याची चळवळ वणव्याप्रमाणें देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत धडाडून पेटली आहे. आतां तेथील देशी संस्थानिक, त्यांचे बगलबच्चे, देशांतील मुलकी सरकारी कामगार आणि त्यांचे नौकरचाकर, कांहीं सुशिक्षित व श्रीमंत लोक एवढेच ब्रिटिश सत्तेला आज पूर्ण पाठिंबा देत आहेत, हें खरें आहे. देशांत कांहीं उलथापालथ होणें ही गोष्ट श्रीमंतांना नेहमींच भयप्रद वाटत असते. राज्याचें गाडें आजपर्यंत चालत आलें, तसेंच तें पुढें चालावें, अशी त्यांची स्वाभाविक इच्छा असते; पण ब्रिटिशांची सत्ता हिंदुस्थानांत दृढमूल व्हावी अशी इच्छा करणाऱ्या या लोकांची झाडून मोजदाद केली, तर ती संख्या दहाबारा लाखांहून अधिक होणार नाहीं. बाकी येथून तेथवर सारा जनसमूह ब्रिटिशांच्या सत्तेपासून मोकळा होण्याच्या इच्छेनें भडकून गेला आहे. रवींद्रनाथ टागोर यांजसारख्या अव्वल दर्जाच्या पुरुषापासून तों थेट अखेरच्या महारामांगापर्यंत सर्व जनता हें जूं झुगारून देण्याची इच्छा करीत आहे. हिंदुस्थानांतील लोकसंख्या तीस कोटीहून बरीच अधिक म्हणजे साऱ्या जगाच्या वस्तीच्या पंचमांशाइतकी आहे, ही गोष्ट तुम्ही लक्षांत घ्या. एवढा प्रचंड जनसमूह आज खवळून उठला आहे आणि मनुष्यवस्तीचा एवढा मोठा भाग आज धडपड करूं लागला आहे, ही एकच गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे या देशाकडे साऱ्या जगाचे डोळे कां लागले आहेत, हें तुमच्या लक्षांत येईल.

दुसरा मुद्दा असा कीं या चळवळीचें पुढारीपण सर्वानुमतें आज गांधी यांस मिळालें आहे. महात्माजींची कीर्ति सर्वतोमुखी होण्याचें हें दुसरें कारण आहे. थोड्याच वर्षांपूर्वी गांधी यांच्या मनांत इंग्लंडविषयीं भेदभाव वसत होता आणि हिंदुस्थानांत ही सत्ता अबाधित चालावी अशीहि त्यांची इच्छा होती. साम्राज्य सरकाराच्या हातून गांधी यांस अनेकवार शिफारसपत्रें आणि बक्षिसेंहि मिळालीं आहेत. महायुद्धाच्या वेळीं त्यांनीं संयुक्त राष्ट्रांनाच पाठिंबा दिला. आणि आपणाला बने तोंपर्यंत ब्रिटिश दरबारीची सत्ता आणि सामर्थ्य ही कायम

राखण्याचा यत्नहि त्यांनीं केला. युद्धसमाप्तीनंतरहि थोड्याबहुत प्रमाणाच्या स्वराज्यापलीकडे अधिक कशाचीहि मागणी त्यांनीं केली नाहीं; पण पुढें जी एक गोष्ट घडून आली, तीमुळें गांधी यांची बुद्धि मुळापासून पालटली. अमृतसर येथें सेनापती डायर यानें आपला तोफखाना गरीब दुबळ्या हिंदी जमावावर फिरवून तीनचारशें माणसें मृत्युमुखीं पाठविलीं आणि जखमी किती झालीं याची तर मोजदादच नाहीं. यांत निरपराधी म्हातारींकोतारीं आणि बायकापोरेंहि होतीं. या वेळेपासून महात्माजी इंग्लंडचे उघड शत्रु झाले. इंग्लंडच्या अमलापासून हिंदुस्थानास मुक्त करण्याकरतां त्यांनीं यत्नकंकण बांधलें. हिंदी राष्ट्रीय महासभेनें त्यांच्या असहकार योगाला अनुमती दिली. यानंतरच्या वर्षी त्याच महासभेंत फार मोठ्या बहुमतानें त्यांच्या कार्यक्रमाला दुजोरा मिळाला आणि त्याच वेळीं मुख्य नेत्याच्या जागीं त्यांची योजनाहि झाली. आज साऱ्या हिंदुस्थानाच्या भवितव्यतेचीं सूत्रें या एका व्यक्तीच्या मुठींत आलीं आहेत. गांधी बोलले म्हणजे सारा देश बोलल्यासारखें आहे. गांधी करतील तें साऱ्या देशाला शिरसावंद्य. गांधी यांस अटक म्हणजे साऱ्या देशाचा उपमर्द आणि अपमान. साऱ्या राष्ट्र पुरुषांचा जीवात्मा कधीं काळीं कोणा एकाच व्यक्तीच्या रूपानें अवतरणें शक्य असेल, तर हिंदी राष्ट्र पुरुषाचा आत्मा गांधी यांच्या रूपानें अवतरला आहे, असें म्हणण्यास मला मुळींच प्रत्यवाय वाटत नाहीं.

गांधी यांची कीर्ति आणि त्यांचें वजन यांची एवढी अश्रुतपूर्व वाढ कां झाली, याचें तिसरेंहि एक कारण आहे. ब्रिटिश सरकारानें हिंदुस्थानांत दडपशाही सुरू करून गांधी यांच्या वजनांत आणखी भर घातली. वास्तविक पाहतां अशा प्रकारच्या आणीबाणीच्या प्रसंगीं राजशासनांनीं दडपशाहीचा अंगीकार कां करावा, या कोड्याचा उलगडा फक्त एक गोष्ट गृहीत धरली म्हणजेच होतो. मनुष्यमात्राची मानसिक अवस्था आणि पूर्वीचा इतिहास या दोहोंचें गाढ अज्ञान आणि पूर्वीच्या अनुभवावरून शहाणें न होण्याची इच्छा या राजशासनांत असते, असें गृहीत धरल्यावांचून या कोड्याची संगति दुसऱ्या कोणत्याहि उपपत्तीनें लागावयाची नाहीं. दडपशाहीनें कोणतीहि इष्ट कार्यसिद्धि होत नाहीं, हा अनुभव जुना आहे. अगदीं प्राचीन अथवा अर्वाचीन काळाच्या इतिहासांतून असें एक तरी उदाहरण कोणीं मला दाखवावें, असें आव्हान मी करतों. साऱ्या जुन्या अथवा अर्वाचीन इतिहासांत असा एकहि प्रसंग सांपडावयाचा नाहीं. सरकारास अनिष्ट वाटत असलेली गोष्ट नाहींशी करण्याकरतां त्यानें

दडपशाहीचा अंगीकार केला आणि तीमुळें ती गोष्ट नामशेष झाली, असें एकवारसुद्धां घडलेलें नाहीं. ब्रिटिशांनीहि या शस्त्राचा वारंवार उपयोग केला आहे, आणि तितक्याहि ठिकाणीं तो अपेशी ठरला आहे. इ. स. १७७५ सालीं अमेरिकेंत हें शस्त्र निष्फळ ठरलें. इ. स. १८२० आणि १८४० सालांच्या दरम्यान खुद्द इंग्लंडांत त्याला यश आलें नाहीं. दक्षिण अफ्रिकेंत पुन्हां तोच अनुभव आला. आणि नुकती कालचीच गोष्ट—आयर्लंडांतहि तें अपेशी ठरलें आणि याच परंपरेला अनुसरून उद्यां हिंदुस्थानांतहि दडपशाहीची वाट तीच लागणार आहे. दडपशाहीला एका बाबींत मात्र यश मिळतें. ज्यांच्यावर तिचा अंमल गाजतो, त्यांचें कार्य जगजाहीर होण्यास दडपशाही हीच उपयोगी पडते. 'चार चौघांस आमची माहिती आमचे स्नेही करून देतात,' असें शेक्सपीयर म्हणतो. त्या महाकवीच्या या विधानाला एक पुस्ती जोडून मी असें म्हणतों कीं, आमचे भयंकर शत्रूहि आमची प्रसिद्धि साऱ्या जगांत करतात. हिंदीलोकांनीं केवळ स्वप्रयत्नाच्या बळावर स्वातंत्र्यासाठीं केवढींहि महत्वाचीं कार्यें उभारलीं असतीं, तरी ब्रिटिश नोकरशाहीच्या नुकत्याच सुरू झालेल्या दडपशाहीशिवाय त्यांच्या कार्याचा इतका प्रसार साऱ्या जगभर झाला नसता आणि आज त्यांना मिळत असलेली सहानुकंपाहि जगाकडून मिळाली नसती. अलीबंधूंना अटक होण्याबरोबर, ही बातमी महंमदी मुलखाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत वणव्यासारखी पसरली. जगांतल्या एखाद्या कोनाकोंपऱ्यांत राहणाऱ्या मुसलमानालाही हिंदुस्थानांच्या या स्वातंत्र्याच्या झगड्यांत आपण साहाय्य करावें असें वाटूं लागलें. लजपतराय तुरुंगांत गेले हें ऐकतांच हजारों इंग्रजांचीं आणि अमेरिकनांचीं अंतःकरणें खळवळून गेलीं. कारण लजपतराय हे विद्वान आणि सभ्य गृहस्थ आहेत, हें त्यांना ठाऊक आहे. अशा प्रकारच्या सुसंस्कृत गृहस्थालाहि मोकळें राहतां येऊं नये, इतकी विकट परिस्थिति तरी कोणती असावी, याचें अनुमानच त्यांस होईना. आणि हाच न्याय जगांतील लोक आज गांधी यांसहि लागू करतात. गांधी यांस जगांतील कोट्यवधी लोक जाणतात; आणि त्यांच्या पुतीची जी कांहीं माहिती त्यांना आहे आणि ज्या परिस्थितींत ते आज सांपडले आहेत, तीवरून हे कोट्यवधी लोक उद्यां त्यांची भक्तीहि करूं लागतील. साम्राज्यमदाच्या तुरुंगाला हा महात्मा बळी पडला, असेंच हे लोक उद्यां म्हणूं लागतील.

हिंदुस्थानांत सध्या काय प्रकार चालू आहेत आणि तेथील परिस्थिति कशा प्रकारची आहे, याचें ज्ञान आम्हांसहि एका गोष्टीवरून होण्यासारखें आहे. ब्रिटिश

युवराजांनीं हिंदुस्थानाला नुकतीच भेट दिली, ही योजना ज्यांनीं केली, त्यांच्या मूर्खपणाला दुसरी तोड मला तरी कोठेंच आढळत नाहीं. हिंदी लोक ब्रिटिश राजसत्तेला किती एकनिष्ठ आहेत, हें स्पष्टपणें दाखविण्याकरतांच ही भेटीची योजना झाली, असें आम्हास सांगण्यांत येतें. हिंदी लोक खरोखरच राजनिष्ठ असते, तर युवराजांच्या आगमनाचें खरोखर कांहीं कारणच नव्हतें. अशा स्थितींत हा भेटीचा प्रसंग घडून आला आणि परिस्थिति इतकी विचित्र कीं जो प्रकार घडावयास नको होता, त्याचें प्रदर्शन साऱ्या जगापुढें झालें. अपेक्षित असलेली गोष्ट घडून येणें बाजूस राहिलें आणि नको होतें तें नशिबीं आलें. युवराज हिंदुस्थानांत येणार हें जाहिर झाल्याबरोबर गांधींनींहि आपलें बहिष्काराचें शिंग फुंकलें. या निरपराध राजपुत्राबद्दल त्यांच्या मनांत कांहीं वयक्तिक वैषम्य होतें, अशांतला भाग नाहीं. भांबावलेल्या सरकारानें आपल्या दुष्कृत्यावर पांघरूण घालण्याकरतां या बिचाऱ्या राजपुत्राला पुढें केलें. अशा स्थितींत नोकरशाहीचा डाव फसवून तिच्या अमलाबद्दल खरें लोकमत काय आहे, हें स्पष्ट करण्याकरतां, या संधीचा फायदा गांधी यांनीं अशा प्रकारें घेतला. राजपुत्राचे पाय हिंदुस्थानाच्या किनाऱ्याला लागल्यापासूनच बहिष्काराला सुरुवात झाली. युवराजांची स्वारी जेथें जेथें गेली, तेथें तेथें हिंदी लोकांच्या पाठी मात्र त्यांना दिसल्या आणि अखेरीस अलाहाबाद येथें तर सर्वत्र शुकशुकाट पसरला होता. या शहराच्या वेशींतून युवराजांनीं प्रवेश केला, तेव्हां एकाद्या मृत नगरीचें चित्र त्यांच्या डोळयांसमोर उभें राहिलें. लांबचलांब पण निर्जन रस्ते व घरांचीं दारें आणि खिडक्या बंद केलेल्या, असा प्रकार त्यांना आढळून आला. आणि याच वेळीं गांवा बाहेरील एका जागीं हजारों हजार लोक स्वराज्याची दवंडी पिटण्याकरतां जमा झाले होते आणि स्वराज्याची चळवळ यशस्वी करण्याकरतां शपथा घेत होते. युवराजांच्या भेटीनें जर कांहीं कार्यभाग साधला असेल, तर हिंदुस्थानांत अतिशय असंतोष पसरला आहे, एवढी गोष्ट मात्र या भेटीनें जगाला जाहीर झाली. त्याचप्रमाणें गांधी आणि त्यांनीं चालविलेलें धर्मयुद्ध यांचीहि माहिती आज साऱ्या जगाला या भेटीनें झाली. दुसऱ्या कोणत्याहि उपायांनीं हा कार्यभाग हिंदी लोकांना साधतां आला नसता.

साऱ्या मनुष्य जातीचें लक्ष हिंदुस्थानाकडे वेधण्याजोग्या ज्या कांहीं गोष्टी गेल्या थोड्या महिन्यांच्या अवधींत घडून आल्या, त्यापैकीं कांहींची चर्चा येथें केली. महात्मा गांधी हे कोण आहेत आणि हिंदुस्थानांत ते कसली चळवळ

साचें सत्यकथन पक्के ध्यानांत धरून आणि पूर्ण विनीत अंतःकरणानें मी महात्मागांधी यांची तुलना येशूख्रिस्ताशीं करतों. प्लुटार्क यानें ग्रीस आणि रोमच्या शूर पुरुषांची चरित्रे लिहिलीं आहेत. त्याचप्रमाणें येशूख्रिस्त आणि गांधी यांची चरित्रें जोडीनें कोणी लिहील, तर या दोहोंत असलेलें विलक्षण साम्य पाहुन वाचक खरोखर थक्क होऊन जाईल. क्रुसावर खिळवून येशुख्रिस्ताचे प्राण हरण झाले आणि एवढी एकच गोष्ट हें साम्य तंतोतंत साम्य होण्यांत उणी आहे; पण आजचें ब्रिटिश साम्राज्य ज्या मार्गानें आपलें पाऊल पुढें टाकीत आहे. त्याच मार्गानें कालचें रोमनसाम्राज्यहि गेलें होतें. तेव्हां कालच्या रोमनसाम्राज्यानें केलेल्या इतिहासाची तंतोतंत पुनरावृत्ति करून ब्रिटिशसाम्राज्य गांधी यांस *वधस्तम्भाचा रस्ता दाखवील असेंहि होण्याचा संभव आहे.

गांधी यांचें उद्दिष्ट कार्य केवळ हिंदुस्थानापुरतें नसून साऱ्या जगाकरतां तें आहे, असें आपणास दिसून येईल. आणि त्यांच्या कार्याच्या याच अंगाबद्दल विवेचन करण्याचें मीं योजिलें आहे. गांधीं हे राजकीय पुढारी नसून ते धर्मप्रणेते आहेत, याच मुद्यावर मला विशेष जोर द्यावयाचा आहे. हें धर्म कार्य ते कसें करीत आहेत याचा उलगडा त्यांच्या स्वतःच्या दानतीवरून आणि चरित्रावरून होण्यासारखा आहे. हिंदी लोकांवर गांधी यांची एवढी अपूर्व छाप कां पडली, याचा विचार आपण केला; म्हणजे त्यांच्या धर्म कार्याची गुरु किल्ली आपल्या हातांत येते. हिंदुस्थानांत आज त्यांचें वजन सर्व व्यापी आहे, याबद्दल कोणीहि शंका घेणार नाहीं. ३०–३२ कोटी लोकांच्या हृदयावर एवढें स्वामित्व मिळविलेला दुसरा पुरुष आज साऱ्या जगांत हयात नाहीं. केवळ यामुळेंच हा देखावा आज अद्वितीयच म्हटला पाहिजे. प्यालेस्टाईन प्रांतांत येशुख्रिस्ताच्या मागें ज्याप्रमाणें स्त्रीपुरुषांचे घोळकेच्याघोळके धांवत, त्याचप्रमाणें आज गांधींच्याहि मागें लोकांच्या थवेच्याथवे धांवतात. एकाद्या गांवीं त्यांचें व्याख्यान व्हावयाचें असलें, तर त्यांचे शब्द ऐकण्याकरतां तेथें लाख पाऊण लाख माणसें सहज जमा होतात. गांधी चमत्कार करतात, असें मानणारे लोक हिंदुस्थानांत आज पुष्कळ आहेत. खेड्यापाड्यांतील अज्ञ व भोळसर जनसमूह सायंकाळच्यावेळीं पिंपळाच्या पारावर गप्पा मारीत असतां गांधी यांनी केलेल्या चमत्कारांचें रसभरीत वर्णन एकमेकांस सांगत असतात. त्यांचें महात्मा हें नांव त्यांना गर्वांतीमुळे झालें आहे. सामान्य जनांच्या दृष्टीनें ते मानवकोटींतून

* येशुख्रिस्ताला जेरुसलेम जवळ ज्याठिकाणीं क्रुसावर चढविलें, तें स्थान.

निघून गेले असून त्यांची गगना देव कोटींत झाली आहे. या प्रकाराशीं तुलना कर-ण्यास एकादें उदाहरण आपणास हवें असेल, तर फार प्राचीन काळच्या इतिहासांत प्रवेश करून जगाचा एकादा दूरचा कोनाकोपरा आपणास शोधावा लागेल. आणि इतकें करूनहि हें साम्य तंतोतंत सर्व दृष्टीनें जुळेलच असें नाहीं. कारण त्यांच्या इतका प्रचंड अनुयायी वर्ग असलेला आणि ज्याची आपल्या पुढाऱ्यावर इतकी एकनिष्ठा आहे, असा दुसरा पुरुष ज्ञात इतिहासांत आजपर्यंत झालेला नाहीं, अशी साक्ष एका अधिकारी आणि वयस्थ गृहस्थानें दिली आहे.

या अद्वितीय परिस्थितीचें कारण केवळ बाह्य उपाधींत शोधून सांपडावयाचें नाहीं. पाहिल्याबरोबर मोह पडावा, अशाप्रकारचें कोणतेंहि साधन गांधी यांज-पाशीं नाहीं. त्यांची शरीरयष्टी नयनमनोहर नाहीं, किंबहुना प्रेक्षकांच्या पोटांत दया उपजावी, इतकी ती किरकोळ आहे त्यांच्या शरीराचें वजन शंभर पाऊन्डाहू-नहि कमी आहे. तीस वर्षेपर्यंत अत्यंत उग्र अशा तापस वृत्तीनें राहून ज्यानें देह कष्टविला, त्याची शरीररचना ज्या प्रकारची असेल, असें आपल्या मनांत येतें, तशीच गांधी यांची देहरचना आहे. कांहीं प्रसंगीं बोलतांना उभें राहण्या-चीहि शक्ति त्यांना नसते आणि अशा वेळीं खुर्चीवर बसूनच चार शब्द आपल्या श्रोत्यांना ते सांगतात. त्यांच्या बाह्य आकारांत त्यांचे डोळे मात्र विलक्षण पाणीदार आहेत. जणूं काय जड देहाचें बंधन भस्मसात् करण्यासाठीं आंत पेट-लेला ज्ञानाग्नी त्यांच्या डोळ्यांतून बाहेर पडूं पहात आहे. गांधी विलक्षण उत्तान बुद्धीचे पुरुष आहेत, असेंहि नाहीं. केवळ बुद्धिमत्तेच्या दृष्टीनें ते अद्वितीय ना-हींत. त्यांची मानसिक शक्ति सर्वविषयग्राहक आहे, असेंहि नाहीं. बुद्धिमत्तेच्या बाबतींत लियो टॉलस्टॉय यांच्या पासंगासहि ते पुरणार नाहींत. येथें कांहीं साम्य पहावयाचें म्हणजे एका बाजूस इंद्राचा ऐरावत आणि दुसऱ्या बाजूस श्याम भटाची तट्टाणी, असाच प्रकार व्हावयाचा 'युद्ध आणि शांति' 'ॲना कॅरे-नीना' 'माझा धर्म' असल्या प्रकारचीं ग्रंथरत्नें या हिंदु गृहस्थाच्या बुद्धींतून कधीं काळीं तरी निपजतील, असें मला वाटत नाहीं. गांधी मोठे आहेत खरे; तथापि असे ग्रंथ प्रसवण्यास त्यांची मनोभूमिकाच योग्य नाहीं. या भूमिकेवर त्यांची बुद्धि वावरतच नाहीं. हाच प्रकार त्यांच्या वक्तृत्वालाहि लागू आहे. वक्तृत्वासंबंधीं मला निश्चितपणें बोलतां येत नाहीं आणि याचें कारण हेंच कीं ही कला मोजण्याचें आमचें आणि पौर्वात्यांचें माप अगदीं वेगळें असूं शकेल. संगीताच्या बाबतींत ज्याप्रमाणें या कल्पना परस्परांपासून अगदीं भिन्न आहेत,

काढण्यांत येते, त्याच प्रमाणें तशा परिस्थितींतहि हें घडून आलें असतें. हिंदुस्थानांतील ही चळवळ उद्यांच नामशेष झाली अथवा तिचा विजय होऊन हिंदुस्थानाला स्वातंत्र्य प्राप्त झालें, तरी गांधी यांचें कार्य पुढें चालू राहील. वुइलियम वॅलेस, वॉशिंगटन, ग्यारिबॉल्डी इत्यादि पुरुषांनीं स्वातंत्र्यासाठीं युद्धभेरी वाजवून तरवार उपसली, रणांगणावर जाऊन रक्तपात केला आणि कोणी स्वदेशासाठीं जीवहि बळी दिला; तथापि यांच्या वर्गांत गांधी यांस घालतां येत नाहीं. गांधी शस्त्रधारी नाहींत, तरवारीला ते स्पर्श करीत नाहींत. स्वातंत्र्यासाठी कसल्याहि प्रकारची लढाई करावयाची नाहीं, हा त्यांचा बाणा आहे. ते दुष्टाचाहि प्रतिकार करीत नाहींत. दंडनीतीहून अधिक श्रेष्ठ अशा विश्वशक्तीचें आराधन तें करतात. शारीरिक बळाहून चैतन्याचें बळ अधिक श्रेष्ठ आहे, असा त्यांचा पक्का विश्वास असल्यामुळें ते शारीरबळाचे भक्त नसून चैतन्य शक्तीचे उपासक आहेत. यावरून महात्माजी एकाद्या राष्ट्राचे राजकीय नेते नसून साऱ्या जगाचे ते धर्म प्रणेते आहेत, ही गोष्ट आपल्या लक्षांत येईल. अप्रतिकाराचें तत्व ज्यांनीं हृदयाशीं धरलें, त्या साऱ्यांचा वर्ग हाच. अशा व्यक्तींचें महत्व एकाद्या विशिष्ट स्थलापुरतें अथवा देशापुरतें नसून तें विश्वव्यापी असतें. गांधी चैतन्य सागरांतील रहिवाशी आहेत आणि त्यांच्या राहण्याचें व हालचालीचें ठिकाणहि तेंच. त्यांचा वादविवाद राजे आणि सत्ताधारी प्रधान यांजपाशीं चालत नसून जीवात्मा आणि परमात्मा यांजपाशीं होत असतो. त्यांचें कार्य राजे अथवा प्रधान यांच्याशी नसून तें परमात्म्याशीं निगडीत झालें असतें. एकाद्या विशिष्ट देशाला पारतंत्र्यांतून मुक्त करावें, इतकाच त्यांचा हेतु नसून अवघ्या मनुष्य जातीला मुक्तीचा मार्ग दाखवावा, हें त्यांचें कार्य आहे. इतिहासांत ज्या उच्च भूमिका आजपर्यंत होऊन गेल्या, त्यापैकीं कोणत्यातरी वर्गांत गांधी यांस आपणास घालावयाचेंच असेल, तर बुद्ध, जरदुष्ट्र आणि विशेषतः येशुख्रिस्त यांच्याच वर्गांत त्यांस बसवावें लागेल. कालांतरानें हे अनेक मंत्रद्रष्टे एशियाखंडांतच निर्माण झाले. एकामागून एकानें जन्म घेऊन स्वचरितानें अवघ्या मनुष्यजातीस सदुपदेश केला. मानवी जीवनाचा खरा अंतिम हेतु काय, हें स्वतःच्या उदाहरणानें साऱ्या जगाला दाखवून मनुष्यजातीला मुक्तिमार्गाला लावण्याची खटपट त्यांनीं केली. या पवित्र वंशांतील एक विभूति आज आपणासमोर उभी आहे. तिनें हिंदुस्थानांत जन्म घेतला आहे. तिचें नांव महात्मागांधी असें आहे.

उतरूं लागले. ज्या ठिकाणीं माणसें, जनावरांप्रमाणें खपतात आणि अखेरीस हाल अपेष्टांत मरतात आणि ज्या ठिकाणीं अश्रुपात, रक्त आणि शरीराचा घाम यांच्या नद्या वाहतात, अशा ठिकाणीं ते पोहोंचले. जगांतील नीचतम मनुष्य जीं जीं दुःखें भोगतो, जे जे जुलूम सोसतो आणि जीं जीं संकटें त्याच्यावर ओढवतात, त्या साऱ्यांचा अनुभव स्वतः घ्यावयाचा असा निश्चय त्यांनीं केला. फार काय; पण अस्पृश्य म्हणून गणलीं जाणारीं माणसेंहि ते स्वतःहून कमी लेखीनातसे झाले. त्यांच्यांत मिसळून आणि त्यांच्याच सारखें वागून जगाकडून स्वतःला तुच्छ म्हणवून घेण्यांत जो कटुतम अनुभव असतो, तोहि त्यांनीं मिळविला. गांधी यांनीं अनुभवलेलें नाहीं, असें भयंकर दुःख जगांत एकहि नाहीं. यानंतरहि राजकीय सुधारणांचा जो जो यत्न त्यांनीं केला, त्यांत भोगावीं लागणारीं दुःखें त्यांनीं स्वतः प्रथम भोगलीं आणि नंतर इतरांस त्या उपदेशाची दीक्षा दिली. दक्षिण आफ्रिकेंतील सरकारच्या अन्यायाचा प्रतिकार करण्याकरतां हिंदु 'कुलींना' उत्तेजन देऊन आणि त्यांचें पुढारीपण स्वतः पत्करून कायदे मोडण्यास त्यांनीं सुरुवात केली. ही सारीच कथा फार मनोहर आहे. या ठिकाणीं उघड्या जमिनीवर गांधी यांनीं प्रथम शयन केलें. त्यावेळीं नुसती जमीन हा बिछाना आणि आकाश हें पांघरूण. जन्मभर दरिद्री राहण्याचा संकल्प प्रथम करून नंतर तशी शपथ आपल्या अनुयायांकडून त्यांनीं घेवविली. जीवित धारणेसाठीं त्यांनीं स्वतः प्रथम जमीन खेडली आणि नंतर तो उपदेश इतरांस केला. सांप्रत ते केवळ एकवस्त्र राहतात. त्यांच्या या एकवस्त्राची कथा साऱ्या अमेरिकेभर गाजून आपणास विदित झाली आहे. गांधींच्या एखाद्या कट्या दुस्मानाबरोबर भाषणाचा उपक्रम तुम्हीं केला तर या कटिवस्त्राची हकीकत सांगून तोच त्यांच्या खुळ्या आततायीत्वाचा परिणाम आहे, असें तो प्रथम सांगेल. अशी ही कटिवस्त्राची कथा आहे तरी काय? आपल्या असहकार योगाच्या कार्यक्रमांत गांधी यांनीं परदेशी कपड्यावर पूर्ण बहिष्कार घातला आहे. आपल्या अनुयायांपाशीं जें विलायती कापड होतें त्याची होळी त्यांजकडून गांधी यांनीं करविली आणि यापुढें सर्वांनीं चरख्यावर सूत कांतून हातानें विणलेल्या कापडाचा उपयोग करावा, असा उपदेश सुरू केला. विलायती कापडाचा पूर्ण त्याग करावयाचा म्हटलें तर देशांत पुरेसें कापड पैदा होत नसल्यामुळें साऱ्यांचें आणि विशेषतः गरीबांचे फार हाल होऊन लंगोटीशिवाय अधिक कपडा त्यांच्या वां ^ट्यास यावयाचा नाहीं, अशी ओरड कांहीं अर्थशास्त्रवेत्त्यांनीं सुरू केली.

गोष्टी आपण ऐकतों; पण त्यांनाहि लाजवील अशी उग्र तपश्चर्या गांधी यांनीं केली आणि ती अद्यापिहि चालू आहे. त्यांचें खाणें पिणें आणि त्यांची रोजची सामान्य दिनचर्या हीं त्यांच्या कडक वैराग्याला शोभण्यासारखींच असतात. मनुष्यजातीची स्थिति सुधारावी म्हणून प्रयत्न करीत असतां जे आघात त्यांजवर कोसळले, त्यांच्या निवारणाचा यत्न तर त्यांनीं केला नाहींच; पण उलट आपल्या शस्त्रागारांत या नव्या शस्त्रास्त्रांची भरच पडत आहे, अशा थाटानें त्या सान्या आपत्तींचा स्वीकार त्यांनीं आनंदानें केला. एक माथेफिरू त्यांजवर हत्यार घेऊन धावला असतां यत्किंचितहि न डगमगतां अगदीं शांत चित्तानें ते त्याजपुढें उभे राहिले. दक्षिण आफ्रिकेंत तुरुंगांत जाण्याचा प्रसंग त्यांजवर चार वेळां आला. रस्त्यांतील दंगेखोरांनीं तीन वेळां त्यांस बेदम मार दिला. आणि एकावेळीं हा आतां मेला, असें समजून त्यांनीं त्यांना गटारांत फेकून दिलें. पाठीवर बसलेल्या चाबकाच्या फटक्याचे वण अद्यापिहि जिवंत आहेत. त्यांच्या तुरुंगांतील लोखंडी गजांना त्यांचे हातपाय कित्येक तास जखडून टाकलें होते आणि या साखळदंडाच्या खुणा त्यांच्या मनगटावर अद्यापिहि आहेत. 'मनुष्याच्या नशिबीं जे जे हाल भोगण्यासारखे असतात, त्या सान्यांतून मी पार गेलों आहें,' असे उद्गार गांधी यांनीं स्वतःच काढले आहेत. ख्रिस्ताला जीं दुःखें भोगावीं लागलीं, त्यांची यादी सेंट पाल यांनीं दिली आहे. ती यादीसुद्धां गांधी यांच्या अपेष्टांच्या यादीपुढें तुच्छ होय. आणि इतकीं दुःखें गांधी यांनीं भोगलीं याचें कारण हेंच कीं अशा रीतीनें दुःखें भोगणें हाच जीविताचा कायदा आहे, असें समजून तीं त्यांनीं जाणूनबुजून भोगलीं. तितिक्षा हेंच त्याचें महाअस्त्र आहे. आणि तें त्यांनीं अशा रीतीनें घडविलें आहे. गांधी यांची मूर्ति हिंदी जनसमूहापुढें उभी राहते, तेव्हां पूर्ण तितिक्षेच्या शस्त्रास्त्रांनीं आपला नायक सज्ज झाला आहे, असें चित्र तिच्या डोळ्यांपुढें उभें राहतें. गांधींबद्दल विचार तिच्या मनांत आला म्हणजे हा सारा गतकालीन इतिहास तिच्या मनांत उभा राहतो. गांधी यांस तुरुंगांत डांबून त्यांच्या स्वीकृत मार्गापासून त्यांना परावृत्त करूं पाहणारें अथवा त्यांच्या अनुयायी वर्गास त्यांच्या भक्तीपासून पराङ्मुख करूं पाहणारें सरकार मूर्खत्वाच्या कोणत्या कोटींत पोंहोंचलें असलें पाहिजे, याचा हिशेब तुमच्य ध्यानीं सहज येईल.

आतां या सर्वांहूनहि श्रेष्ठ अशा प्रकारच्या गांधी यांच्या आणखी एका गुणाचा विचार आपणास कर्तव्य आहे. सर्वभूतीं प्रेम हा गुण त्यांच्या आंगीं ओतप्रोत

भरून राहिला आहे. हिंदुस्थानांतील ह्या महात्मा इतका प्रेममय बनून गेला आहे कीं त्याला एकादी जोड शोधून काढण्यासाठीं आपण पाहूं लागलों, तर आपल्या चालू काळींच; पण भूतकाळाच्या अखंड इतिहासांतहि ती सांपडावयाची नाहीं. राग, दुष्टपणा, प्रतिकारबुद्धि, द्वेष इत्यादि सारे दुर्गुण त्यांच्यांतून लोपले आहेत. आणि त्यांच्या अंतःकरणांत शुद्ध प्रेमाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि भावनेचा लेशसुद्धां उरलेला नाहीं. अमुक एका विशिष्ट स्थळांतील माणसांनाच ते आपले बांधव समजत नसून त्यांची ही प्रेमगंगा जगांतील अखिल मानवजातीपर्यंत पोहोंचली आहे. तींत स्नानपानादि व्यवहार करण्यास कोणासहि मज्जाव नाहीं. लहानथोर, गरीब श्रीमंत, इत्यादि सर्वांनाच तिच्या पोटांत आश्रय मिळतो. प्रत्यक्ष परमेश्वराप्रमाणेंच ही प्रेमगंगा अखिल वस्तुजाताला आपल्या पोटांत थारा देते. काळागोरा हा वर्णभेद तिच्या दृष्टीला दिसत नाहीं. हिंदू आणि मुसलमान यांतील दीर्घकालीन तंटे आतां मिटविले असून या दोहोंत आतां पूर्ण बंधुभाव नांदत आहे. जातिभेदाच्या पोटीं असलेलें समाजाच्या उपयुक्ततेचें तत्व मान्य करूनहि गांधी यांनीं त्यांतील वैषम्य नाहींसें करून टाकलें आहे. ब्राह्मण आणि अतिशूद्र यांना गांधी यांनीं एकत्र आणलें आहे. एकाच तळयांत यांनीं पाणी प्यावें अशी त्यांची इच्छा आहे. आपल्या प्रेमांतून इंग्रजांना सुद्धां त्यांनीं वगळलेले नाहीं. आपल्या शत्रूवरहि प्रेम कर हें वचन खिस्तानें जितकें तंतोतंत पाळलें, तितकें तें गांधीहि आज पाळतात. इंग्रज लोकांवर माझें मनापासून प्रेम आहे, हे शब्द त्यांनीं हजारों वेळां उद्गारले आहेत. माझ्या कार्यांत इंग्रजांच्या मदतीचीहि जोड मला पाहिजे, असें हजारों वेळां त्यांनीं म्हटलें आहे. एके प्रसंगीं दक्षिण आफ्रिकेंतील तुरुंगांत ते शरपंजरीं पडले होते. ते जगतात कीं मरतात, याचीहि शंका होती. अशा भयंकर स्थितींत असतां आपल्या मारेकऱ्याविरुद्ध खटला भरण्याचा उपदेश त्यांना कोणीं केला, तेव्हां तसें करण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. ते म्हणाले, ' त्याला जें बरोबर वाटलें तें त्यानें केलें. स्वतःला जें बरोबर वाटतें तें करण्यासाठीं त्यानें जीवाचीहि परवा ठेवली नाहीं, अशा एकनिष्ठ मनुष्यावर शिक्षा भोगण्याचा प्रसंग मी आणणार नाहीं. अथवा त्याला दुःख होईल, असेंहि मी कांहीं करणार नाहीं. तो खरा कर्तृत्वशाली आहे. त्याच्यावर प्रेम करून माझ्या पक्षाला मी त्याला ओढून घेईन !' आणि पुढें थोड्याच दिवसांत गांधी यांचे हे शब्द अक्षरशः खरे झाले. त्यांचा पूर्वीचा तो मारेकरी त्यांचा पक्का अनुयायी बनून गेला.

अमृतसर येथें निःशस्त्र प्रजेची कत्तल ज्यांनीं उडविली, त्या जनरल डायरविषयीं सुद्धां गांधी यांची भावना अशीच सौंदर्यपूर्ण होती. ते म्हणतात, 'त्याच्याशीं कोणतेंहि सहकार्य करणें मला शक्य नाहीं. त्याचा अधिकार मला मान्य नाहीं अथवा त्याच्या आज्ञा पाळणेंहि मला शक्य नाहीं; पण उद्यां तो तापानें आजारी पडला, तर त्याची सेवाशुश्रूषा करून त्याला बरा करण्याची खटपट मी करीन.' गांधी यांच्या ठिकाणीं कसल्याहि प्रकारचा विषम भाव म्हणून नाहीं. द्वेष अथवा सूड असल्या प्रकारच्या दुर्गुणांच्या भावनेची अखेरची छटासुद्धां त्यांच्या चित्तांत शिल्लक उरलेली नाहीं. ते केवळ प्रेमाची मूर्ति बनून गेले आहेत. त्यांच्या प्रत्येक कृत्यांत, बोलण्याचालण्यांत आणि अवयवांच्या सामान्य हालचालींत सुद्धां त्यांच्या हृदयाचें प्रतिबिंब स्पष्ट उमटलेलें दिसतें. दुःखाग्नीनें सारीं पापें जाळून टाकून जी उग्र तपश्चर्या त्यांनीं केली, तीमुळें सारें किल्मिष जळून जाऊन त्यांचा जीवात्मा पवित्र झाला आहे. जो उपदेश आजपर्यंत त्यांनीं केला, त्याचें सत्यत्व स्वतःच्या उदाहरणानेंच आज ते पटवीत आहेत. ते म्हणतात, 'क्रोधवश झाल्यानें कोणताहि कार्यभाग साधत नाहीं. दुष्टत्वाला आपण साधुत्वानें जिंकलें पाहिजे. असत्याचा प्रतिकार सत्यानें केला पाहिजे, लुच्चेगिरीला सरळपणानें आणि मोकळ्या मनानें प्रत्युत्तर दिलें पाहिजे. आपल्या छातींत धडकी भरविण्यासाठीं शस्त्रांचा उपयोग कोणी करूं लागला, तर त्याचा प्रतिकार शांतीच्या धैर्यानें केला पाहिजे.'

गांधी यांचें हें अंतःस्वरूप हिंदवासीयांच्या पुरें ओळखीचें झालें आहे आणि या त्यांच्या सद्गुणांचा पगडा हिंदी लोकांच्या मनावर बसल्यामुळें महात्माजींचे ते पक्के भक्त बनून गेले आहेत. महात्माजींच्या या गुणामुळेंच त्यांचें स्वतःचें आणि त्यांच्या कार्याचें स्वरूप केवळ एकदेशीय न राहतां त्याला विश्वव्यापकता प्राप्त झाली आहे. केवळ ऐहिक जड जगांत वावरून सारा जन्म फुकट न घालवितां या देहांत असतांहि उच्चतर वातावरणांत राहण्याची किल्ली गांधी यांच्या हातीं आली आहे. स्वतःला कडक शिस्त लावून घेऊन तिच्या जोरावर आपल्या आत्म्यावर पडलेलें जडतेचें ओझें त्यांनीं नाहींसें केलें. मनुष्य देहांत राहून ईश्वराच्या दूताची योग्यता त्यांनीं आपल्या आंगीं आणली. नम्रता, विनय, स्वार्थशून्यता आणि सर्वांभूतीं प्रेम या गुणांना त्यांचें चारित्र्य इतकें पूर्णावस्थेस पोहोंचलें आहे कीं, अशा प्रकारचीं माणसें क्वचित्‌च आपल्या दृष्टीस पडतात. किंबहुना हजार दोन हजार वर्षांत असा एखादाच प्राणी मानवकोटींत जन्म घेतो.

आणि अशा प्रकारचा हा महात्मा तुरुंगांत खितपत पडला आहे. वास्तविक पाहतां जगाचा न्याय निवडणाऱ्या न्यायाधिशाची योग्यता अशा महात्म्यांच्या आंगीं असते. एखाद्या येशूख्रिस्ताला अथवा गांधीला मोकळेपणीं वावरूं देण्या-सहि ज्या मानवी समाजाला भीतिदायक वाटतें, तो समाज जगण्यास योग्य नाहीं, असें निःसंशय समजावें. त्याची घडी भरली असल्याचें हें पूर्वचिह्न आहे आणि त्याच्या मरणाची घंटा आधींच वाजून गेली आहे.

महात्मा गांधी हे अप्रतिकाराच्या तत्वाचे पक्के पुरस्कर्ते आहेत. त्यांची चळवळ एकदेशीय नसून ती विश्वव्यापी आहे, असें मी म्हणतों, त्याला हा दुसरा पुरावा आहे. पण गांधी अप्रतिकाराची जी व्याख्या करतात, ती मात्र नीट ध्यानांत धरली पाहिजे. ते म्हणतात, 'दुष्टाच्या क्रियेनें घाबरून जाऊन निष्क्रिय राहणें, म्हणजे अप्रतिकार नव्हे; तर जुलमी मनुष्याच्या इच्छाशक्तीविरुद्ध आपली सारी चैतन्यशक्ति एकवटून सात्विक निश्चलता धारण करणें, म्हणजे अप्रतिकार.' या तत्वाप्रमाणें गांधी स्वतः वागतात एवढ्यांतच त्यांचें खरें महत्व नसून या तत्वाचा व्यापार विशाल प्रमाणावर करण्याचा यत्न करून त्यांत त्यांनीं यश मिळविलें आहे. अनेक प्रकारच्या सामाजिक अडचणीसुद्धां याच तत्वावर ते दूर करीत आहेत. राजकारणांतील अडचणी आणि संपत्तिशास्त्राचीं कोडींहि याच तत्वाच्या अनुरोधानें सोडवितां येतात, असें आज ते सिद्ध करीत आहेत. न्यूटन अथवा डारविन यांनीं आपलीं मतें दृक्प्रत्ययानें स्थापन करून ज्याप्रमाणें नवा मनु सुरू केला, त्याचप्रमाणें गांधीहि समाजशास्त्रांत आज नवा शक चालू करीत आहेत.

अप्रतिकाराचें तत्व जन्मास येऊन दीर्घकाळ लोटून गेला आहे; पण प्रत्यक्ष सृष्टींत मोठ्या प्रमाणावर त्याची उपयुक्तता सिद्ध होण्याच्या मार्गांत दोन मोठ्या अडचणी आजपर्यंत आल्या आहेत. या तत्वाचा अंगीकार ज्यांनीं प्रथम केला, त्यांनीं त्याचा प्रत्यक्ष आचार स्वतःपुरताच केला, ही पहिली अडचण होय. या तत्वाचा पुरस्कार करणारे कांहीं पंथहि निघाले ही गोष्ट खरी; तथापि त्यांच्या कार्यांचा परीघहि केवळ त्या पंथापुरताच होता. या तत्वाचा उपयोग सर्रास कोणत्याहि मानवसमाजास करतां येईल, असें आजपर्यंत सिद्ध झालें नव्हतें. येशुख्रिस्त, सेंट फ्रान्सीस, वुइलियम लाईड ग्यारिसन, हेनरी डेव्हिड थोरो, लियो टॉलस्टॉय हे व्यक्तिशः या तत्वाचे पुरस्कर्ते होते. या सर्वांची मनोभूमिका अलौकिक होती, हे व्यक्तिशः मोठे तेजस्वी आणि वजनदार पुरुष होते. या तत्वाचा वास्तविक

उपयोग किती प्रकारें करतां येईल, हें आपल्या खाजगी आयुष्यक्रमांत त्यांनीं दाखविलें; पण हेंच तत्व विश्वव्यापी करण्याचा म्हणजे तें सामान्य जनसमूहांत अवतरविण्याचा यत्न यांपैकीं कोणीहि केला नाहीं. यामुळें या तत्वाचें स्वरूप एकदेशीय राहिलें. अशीच हकीकत कांहीं पंथांचीहि झाली आहे. खिस्ती शकाच्या पहिल्या एकदोन शतकांत कांहीं पंथ निर्माण होऊन या तत्वाच्या अनुरोधानें ते चालत होते. त्याचप्रमाणें क्वेकर, मेनोनाईट, डुखोबार, हे अर्वाचीन काळांतील पंथहि याच तत्वाला अनुसरणारे आहेत; पण हें तत्व विश्वव्यापी करण्यांत या पंथांनाहि यश आलें नाहीं. टॉलस्टॉयसारखे सत्पुरुष या तत्त्वासाठीं स्वसमाजापासून ज्याप्रमाणें विभक्त झाले, त्याचप्रमाणें हे पंथहि सामान्य मानवजातीपासून विभक्त झाले आहेत. त्यांची नजर स्वतःच्या पंथाच्या क्षितिजाकडे पोहोंचत नाहीं. यामुळें या पंथाचीहि वास्तविक किंमत थोरो, टालस्टॉय, इत्यादि व्यक्तीपेक्षां अधिक नाहीं. अप्रतिकाराचें तत्व काय करूं शकेल, एवढयाचा सामान्य निर्देश हे पंथ आणि हे असामान्य पुरुष करतात; पण एकंदर मानवसमाजाची रचना या तत्वाच्या पायावर करतां येईल, हें मात्र त्यांनीं सिद्ध करून दाखविलेलें नाहीं. या तत्वाच्या मार्गांतील ही पहिली अडचण झाली.

दुसरी अडचण अशी कीं या तत्वाचा पुरस्कार ज्यांनीं ज्यांनीं केला, तीं सारीं माणसें ऐहिकाला तुच्छ समजणारीं असून त्यांच्या मनाचा विशेष ओढा पारलौकिक सुखाकडे होता. मध्ययुगीनकालांतील या तत्त्वाचे पुरस्कर्ते बहुधा बैरागी होते. जग सोडून त्यांनीं अरण्यवास पत्करला होता आणि फार तर स्वतःचा शिष्यसमुदाय मात्र त्यांजबरोबर असे. या पलीकडे सामान्य जनसमूहाशीं कोणताहि संबंध त्यांनीं ठेवला नव्हता. अर्वाचीनकाळांतील सर्वश्रेष्ठ पुरस्कर्ता लियो टॉलस्टॉय हा होय; पण यालाहि आपल्या तत्वासाठीं स्वजनद्रोह पत्करावा लागला. कुटुंबांतून वेगळें व्हावें लागलें, देशांतून उठावें लागलें, जन्मजात धर्मपंथाचा त्याग करावा लागला आणि संसारांत राहून वैराग्यासारखें आयुष्य क्रमावें लागलें. अखेरीस एकादें जखमी झालेलें सावज ज्याप्रमाणें झाडांच्या जाळीचा आश्रय करतें, त्याप्रमाणें घरदार सोडून त्यांना एकाकी पळावें लागलें. व्यक्तिशः हे सारे पुरुष अत्यंत उदात्तचरित होते. बाह्यतः स्वार्थत्याग आणि अंतस्थ पावित्र्य हे गुण यांच्या ठिकाणीं पूर्णपणें होते; पण हे सद्गुण अंगीं जोडण्याकरतां सामाजिक बंधनें त्यांना तोडावीं लागलीं. स्पष्ट बोलावयाचें म्हणजे मनुष्यजातीतून त्यांना उठावें लागलें. उत्तुंग गिरिशिखरावर ते चढले आणि सामान्य मनुष्याचा

कौतुकाचा विषय ते होऊन राहिले; पण तेथपर्यंत ते पोहोंचले कसे, हें मात्र कोणासहि टाऊक नाहीं. शुद्ध व्यावहारिक दृष्टीनें यांच्या कर्तबगारीची किंमत शून्यप्राय ठरली. मानवी जीविताचें कोडें त्यांनी सोडविलें खरें; पण तें त्यांनीं उलगडून दाखविलें नाहीं. ते त्यापासून पराङ्मुख झाले. त्या कोड्याला हात न लावतां ते स्वतः त्यापासून अलग झाले. टॉलस्टॉय यांच्या जोडीला बसविण्याइतकें उदात्तस्वरूपाचें चरित्र मानवजातीच्या साऱ्या इतिहासांत मिळावयाचें नाहीं; पण अर्वाचीनकाळच्या मानवसमाजाला जीं भयंकर कोडीं आज भेडसावीत आहेत, त्यांच्या निराकरणाचा कोणताहि मार्ग टॉलस्टॉय यांनीं त्याला दाखविलेला नाहीं.

या दोन मोठ्या अडचणींमुळें अर्वाचीन काळीं या तत्वाचा उपयोग मोठ्या प्रमाणावर करतां येईल असें सिद्ध करण्यास या तत्वाच्या पुरस्कर्त्यांस मोठी अडचण पडते. आज मितीला चालू असलेले भांडवलवाले आणि मजूर यांचे तंटे तोडण्यास अथवा राष्ट्रांतील परस्पर युद्धें थांबविण्यास या तत्वाचा उपयोग होईल असें निश्चितपणें सांगण्यास त्याच्या पुरस्कर्त्यांचें मन धजावत नाहीं. केवळ एकाद्या व्यक्तीपुरतें हें तत्व चांगलें असेल अथवा आपल्या वरील सामाजिक जबाबदारी टाळण्याची इच्छा ज्याला असेल, त्याला या तत्वा मार्गे लपतां येईल हें खरें; पण ज्याला समाजांत रहावयाचें आहे आणि त्याच्या अहमहमिकेंत आयुष्य ज्याला काढावयाचें आहे, त्याला या तत्वाचा उपयोग किती होईल असा प्रश्न त्याचे आक्षेपक करीत असतात आणि या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठींच गांधी यांचा अवतार झाला आहे. या तत्वाची कास आजपर्यंत ज्यांनीं धरली, त्यांहून गांधी यांचें कार्य अगदीं वेगळ्या स्वरूपाचें आहे. आपल्या या चालू युगांत कोणी पाहिली नाहीं, अशी क्रांति या तत्वाच्या जोरावर स्वजनाकडून ते घडवून आणीत आहेत. हिंदुस्थानांत सुरु असलेलें युद्ध हें वस्तुतः स्वातंत्र्याचें युद्ध आहे आणि त्याचा जो कार्यक्रम महात्मा गांधी यांनीं आखून दिला आहे, तो अगदीं अननुभूत स्वरूपाचा असून त्यापासून जो धडा मानवजातीला मिळणारा आहे, तोहि चिरकाळ टिकणारा आहे. या युद्धांत कोणत्याहि प्रसंगीं कोणीहि दंडनीतीचा अवलंब करूं नये, अशी गांधी यांची पहिली अट आहे. आणि त्याच जोडून असहकारयोगाची दुसरी पायरी त्यांनीं पुढें आणली आहे. केवळ वर वर पाहणारास हें तत्व शुद्ध निषेधक अथवा नेति नेति या स्वरूपाचें आहे, असें वाटतें. ब्रिटिश नोकरशाहीशीं कोणत्याहि प्रकारचें सहकार्य करूं नये, विज-

पासून कांहीं बक्षीस घेऊं नये, तिच्या न्याय कचेऱ्यांचा उपयोग करूं नये, तिनें काढिलेल्या शाळांत मुलें पाठवूं नयेत, इंग्लिश माल घेऊं नये, नौकरशाहीला कर देऊं नये आणि तिचे कायदेहि मानूं नयेत, अशा प्रकारचा हा कार्यक्रम आहे. केवळ उथळ दृष्टीनें पाहणारास शुद्ध निषेधापलीकडे यांत कांहीं दिसत नाहीं. या कार्यक्रमाच्या पोटांत असलेलें विधायक-तत्व त्याच्या लक्षांत येत नाहीं. पण या कार्यक्रमाची ही जड भाषा सोडून त्याच्या तळाशीं आपण बुडी मारली म्हणजे अत्यंत उज्वल स्वरूपाचा विधायक मार्ग आपणास दिसूं लागतो. हिंदुस्थान केवळ स्वतःच्या बळावर स्वायत्त होऊं शकतो, हें विधान येथें आपल्या दृष्टीस स्पष्टपणें पडतें. या मार्गानें जाणारा समाज राजकारणी आणि सांपत्तिक अशा दोन्ही दृष्टींनीं स्वावलंबी बनलेला आपल्या दृष्टीस पडतो. आणि जो समाज पूर्ण स्वावलंबी आहे, त्याचें स्वातंत्र्य निराळें जाहीर करण्याचें कारणच नाहीं. स्वतःचें काम तुम्ही स्वतः करा, आपल्या कामासाठीं कोणाच्या तोंडाकडे पाहूं नका. आपल्या रीतिभातींना आणि संस्कृतींना पोषक अशा समाजशासक संस्था तुम्ही स्वतंत्र निर्माण करा आणि हें सारें करीत असतां तुमच्या परकीय राज्यकर्त्यांपासून जो उपद्रव तुम्हास होईल, तो शांत चित्तानें भोगा; असा गांधी यांच्या उपदेशाचा थोडक्यांत सारांश आहे. तुमचा मार्ग राज्यकर्त्यांच्या मार्गाहून भिन्न होऊं लागला, म्हणजे आपला जुना मार्ग प्रस्थापित करण्याकरतां राज्यकर्ते खटपट करतील. या खटपटींत त्यांजपासून तुम्हांस पुष्कळ इजा होण्याचा संभव आहे; पण तसें झालें तरी त्यांचा द्वेष करूं नका आणि त्यांचा सूड घेण्याची इच्छा करूं नका. इतकेंच नव्हे तर उलट त्यांना आशीर्वाद द्या, अशी गांधी यांची शिकवण आहे. केवळ प्रेमाच्या पायावर या नव्या सामाजिक रचनेची उभारणी गांधी करीत आहेत. सर्वांनीं परस्परांची सेवा करावी, हें या नव्या रचनेचें मूलभूत तत्व आहे. स्वजनांविषयींचें प्रेम ज्याप्रमाणें सेवेच्या द्वारें व्यक्त करावयाचें त्याचप्रमाणें शत्रूवरील प्रेम क्षमा बुद्धि आणि दयाशीलता यांच्या द्वारें व्यक्त करावयाचें. आपणावर दंडनीतीचा प्रयोग कितीहि झाला, तरी दंडाला प्रतिदंडाचें उत्तर देऊन स्वतःचा नाश करून घेण्याची इच्छा ज्या समाजाला नाहीं, त्यानें स्वतःला निराधार समजण्याचें कारण नाहीं, असें गांधी निश्चयानें म्हणत आहेत. दंडाचा प्रतिकार त्याची उपेक्षा करून त्यानें करावा, दंड भोगून दंडातीत व्हावें आणि सुसंघटित कार्यक्रमाच्या जोरावर आपण आपली नवी समाजरचना करावी, असा गांधी यांचा उपदेश आहे. शत्रूची संघ-

टना एकपट असली, तर आपण दसपट सुसंघटित रचना करावी. शत्रु एक पट स्वार्थत्यागी असेल, तर आपण दसपट स्वार्थत्यागी व्हावें. शत्रूची शिस्त एकपट असली, तर आपली दसपट अधिक कडक असावी.

गांधी यांनीं जो हा अप्रतिकाराचा कार्यक्रम आंखून दिला आहे, त्यांतच त्याच्या स्वरूपाचा विश्वव्यापीपणा मला स्पष्ट दिसून येतो. आपल्या सांप्रतच्या समाजरचनेंत ज्या भयंकर अडचणी आज साऱ्या जगभर उपस्थित झाल्या आहेत, त्या साऱ्या नाहींशा करण्याचें सामर्थ्य या कार्यक्रमांत मला दिसतें. हा कार्यक्रम गांधी यांनीं आपल्या देशापुरता आणि हिंदी लोकांपुरताच लागू केला आहे; *पण या मानवी सरहद्दी ओलांडून जाण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. या प्रचंड खटाटोपांत या महात्म्याला यश आलें, तर मानवजातीच्या इतिहासांत या तत्वाची एवढ्या विस्तृत प्रमाणावर होत असलेली उपयुक्तता प्रथमच सिद्ध होईल.* केवळ एकाद्या व्यक्तीपुरतेंच हें तत्व उपयोगी आहे, अथवा संसारांतून उठून ज्याला अरण्यवास पत्करावयाचा असेल त्यालाच तें उराशीं बाळगण्याजोगें आहे, हा त्याजवर येणारा आजपर्यंतचा आक्षेप कायमचा दूर होईल. महात्मा गांधी यांना यश आलें, तर कोणत्याहि कार्यांच्या सिद्धीसाठीं दंडनीतीचा अवलंब करावयास नको असें सिद्ध होईल. कोणाला स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावयाचें असो अथवा स्वसंस्कृतीवर येणारें परचक्र टाळावयाचें असो, त्याला या तत्वाच्या आधारानें आपलें कार्य साधणें शक्य आहे, असें सिद्ध होईल. प्रत्येक कामांत दंडाला शरण जाण्याहून अधिक चांगला असा मार्ग साऱ्या मानवजातीस उपलब्ध होईल. 'गांधी यांना यश आलें तर?' असें मी बोललों काय? छे छे! असे संशयात्मक शब्द उच्चारण्याचें आतां कारणच उरलें नाहीं. गांधी यांच्या गळ्यांत यशःश्रीनें आधींच माळ घातली आहे. आपल्या मार्गाची उपयुक्तता महात्माजींनीं निःसंशय सिद्ध केली आहे. गांधी यांना अटक झाली, त्याच-दिवशीं त्यांची विजयपताका फडकूं लागली. या एका क्षुद्रशा दिसणाऱ्या व्यक्तीच्या सात्त्विक धैर्याचें भय साऱ्या जगांतील प्रचंड पाशवीशक्तीहून इंग्लंडला आज अधिक वाटत आहे. सर्व आपत्ति शांतपणें गिळून टाकणारी, आलेले सर्व भोग निमूटपणें भोगणारी आणि अखेरीस सर्व चांगलेंच होणार आहे, असा दृढतम आत्मविश्वास बाळगणारी ही वामनमूर्ति पाहून इंग्लंड आज भयानें गांगरून गेलें आहे. मानवजातीच्या डोक्यांत कांहीं शहाणपणं शिल्लक असेल, तर पाशवी शक्तीचें युग अस्तास गेलें असून शांति आणि बंधुभाव यांचें युग उदयास येत आहे, ही गोष्ट तिच्या ध्यानीं येईल.

गांधी यांच्या विश्वव्यापी कार्याचा आणखी एक भाग तुम्हांस सांगून आजचें भाषण मी संपविणार आहें. गांधी यांचे शत्रू एक मोठा आरोप त्यांजविरुद्ध करीत असतात. गांधी हे एक भ्रमिष्ट आततायी असून आजपर्यंतची सारी संस्कृति मोडून टाकण्याची त्यांची इच्छा आहे, असें या शत्रूंचें म्हणणें आहे. गांधीवरील हा आरोप अनेक प्रसंगीं, अनेकांच्या तोंडून बाहेर पडलेला आहे. गेल्या तीनशें वर्षांच्या संस्कृतीनें केलेलीं सारीं कार्यें उध्वस्त करण्यासाठींच गांधी खटपट करीत आहेत, असें त्यांस वाटतें. हिंदुस्थानांतील सारीं इस्पितळें बंद करावीं, रेल्वेरस्ते उखडून टाकावेत, छापखान्याची मोडतोड करावी, आणि गिरण्यांचे तबेले बनवावेत, अशी गांधी यांची इच्छा असल्याचें हे लोक सांगतात. मानवी समाजाच्या प्रथमावस्थेंत जो स्थिति होती, ती एका तडाक्याबरोबर परत आणावी, अशी गांधी यांची इच्छा असल्याचा आरोप त्यांजवर आहे; पण सांप्रतच्या काळीं आपणास ठाऊक असलेल्या या साऱ्या यंत्रविद्येचा उपयोग स्वतः गांधी हेच वारंवार करीत असतात, इतकें सांगितलें म्हणजे ते नासधुस करणारे भ्रमिष्ट आततायी नाहींत, हें आपोआपच सिद्ध होतें. दक्षिण आफ्रिकेंत एका माथेफिरूनें त्यांना भयंकर जखम केली, तेव्हां आपण होऊनच ते इस्पितळांत गेले आणि त्यांची योग्यता माहीत असलेल्या एका इंग्रज स्त्रीनें त्यांची शुश्रूषा करून त्यांना बरें केलें. सांप्रत साऱ्या हिंदुस्थानभर ते आगगाडींतूनच प्रवास करतात. त्याचप्रमाणें जरूर लागेल तेव्हां मोठ्या वेगाच्या मोटरगाडीचाहि उपयोग ते करतात. त्यांनीं स्वतः छापखाना बाळगला असून त्याचा सदुपयोग ते करतात. यावरून ते शुद्ध आततायी नाहींत, हें तुम्हांस उघड दिसून येईल.

तथापि गांधी यांजवरील या आक्षेपांत सत्याचा जो अंश आहे, तोहि तुम्हांस सांगितला पाहिजे. हिंदुस्थानाच्या प्राचीन संस्कृतीवर अर्वाचीन पाश्चात्य संस्कृतीचा निकराचा हल्ला सुरू झाला आहे. हा हल्ला परतवून आपली पूर्वपरंपरेची संस्कृति आपल्या लोकांत पुन्हां स्थापावी, अशी गांधी यांची इच्छा आहे, हें मात्र खरें. गांधी हे केवळ राजकारणी पुरुष नसून धर्माचें पुनरुज्जीवन करण्याकरतां त्यांचा अवतार झाला आहे, या माझ्या मताला विशेष पुष्टि मिळते, ती येथेंच. हिंदुस्थान देशावर आज असलेला परकीय अंमल दोन प्रकारचा आहे. आणि हीं दोन जोखडें हिंदुस्थानच्या लोकांस दोन प्रकारांनी निःसत्व करीत आहेत. राजकीय दृष्ट्या ब्रिटिश नोकरशाहीचा जो अम्मल तेथें आहे, त्यामुळें राजकीय परि-

स्थितीची जुन्या परंपरेची घडी विस्कटून जाऊन ही नवी पाश्चात्य शासनसंस्था तेथें रूढ होऊं पहात आहे. हा राजकारणी हल्ला परतविण्याकरतां तेथील राष्ट्रीयपक्षानें सांप्रतची चळवळ सुरू केली आहे. दुसरी गोष्ट अशी की, पाश्चात्य देशांतील भांडवलशाही आतां हिंदुस्थानांत शिरत आहे. अर्वाचीन काळीं जितके शास्त्रीय शोध झाले आणि त्यांच्या द्वारें जितकी यंत्रकला निर्माण झाली, त्या सारीचा उपयोग करून मूठभर भांडवलवाले लक्षावधी लोकांस लुटीत आहेत. थोड्याशा लक्षाधिशांनीं कोट्यधीश व्हावें आणि बाकीच्या कोट्यवधी लोकांनीं उपाशी मरावें, ही आजच्या जगाची स्थिति या भांडवलशाहीनें निर्माण केली आहे. ब्रिटिश साम्राज्याच्या अमलापासून हिंदुस्थानाची सुटका होणें गांधींना जितकें अगत्याचें वाटतें, तितकेंच या भांडवल शाहीच्या अमलापासून आपल्या देशानें मुक्त रहावें, हेंहि त्यांना अगत्याचें वाटतें. आज ब्रिटिश नोकरशाहीचा राजविषयक अमल गेला; पण पाश्चात्य पद्धतीच्या आगगाड्या गिरण्या, व्यापारी कंपन्या इत्यादि वस्तू जशाच्या तशाच शिल्लक राहिल्या, तर स्वातंत्र्य फळाची नुसती नरोटी मात्र हिंदी लोकांच्या हातीं लागल्यासारखें होईल, असें गांधी यांचें मत आहे. अशा स्थितींत असलेल्या स्वातंत्र्याची प्राप्ती होणार नाहीं. हिंदुस्थानच्या कपाळाची गुलामगिरी अशानें सुटणार नाहीं. साऱ्या मानव जातीला धुळीस मिळवित असलेली ही भांडवलशाही हिंदी लोकांच्याहि घोकादीस बसेल. बाहेरून डौलदार दिसणाऱ्या आपल्या पाश्चात्य सुधारणेच्या पोटांत प्राणहारक कालकूट विष भरलें आहे आणि तींत जीवनदायी तत्व कांहीं नाहीं, असें गांधी यांचें मत आहे. हें सुधारणेचें प्रचंड यंत्र बनवून आपण तें सुरू केलें; पण आतां तें यंत्र आपणावरच उठलें आहे. आपलें जिवीत तें भक्षण करूं लागलें आहे. या प्रचंड राक्षसानें आपणांस मुरळ पाडून शुद्ध कांचनकप्राप्ती गाण्याला आपणांस जुंपलें आहे. संपत्तीच्या लगबगाटानें आपले डोळे त्यानें दिपवून टाकले आहेत. जड्याहाच्या खालच्या पायरीपर्यंत या राक्षसानें आपणास ढकलून दिलें आहे. आमची नीतितत्वांची आणि धर्मपरायणतेची सारी इमारत त्यानें धुळीस मिळविली आहे. नीति आणि धर्म यांची शुद्ध ध्येयेंहि आम्ही विसरलों आहों. ही धर्मदृष्टि बाजूस ठेवली आणि केवळ जडदृष्टीनें विचार केला, तरी या अर्वाचीन संस्कृतीनें आमचें कांहीं हित झाल्याचें दिसत नाहीं. कारण या साऱ्या संस्कृतीचें पर्यवसान भयंकर महायुद्धांपासून दुसऱ्या कशांतहि होत नाहीं, हा अनुभव आपणास नुकताच आला आहे. अशाल्या प्रकारच्या प्रचंड

उत्पाताची ही संस्कृति हिंदुस्थानांत प्रवेश करीत असल्याचें गांधी यांच्या नज-रेस आलें. अनेक संकटपरंपरेचा वणवा, पाश्चात्यदेशांत पेटवून आणि त्याचीच मशाल हातीं घेऊन हा भस्मासूर आतां आशिया खंडाकडे येत आहे, असें गांधीस दिसूं लागलें. या भस्मासुरानें जपान देश चुटकीसरसा पादाक्रांत करून टाकला. त्याचा हात चीन देशांतहि शिरला आहे आणि दुसऱ्या हातानें हिंदुस्थानाचें काळीज तो ओढूं पहात आहे. इतका देखावा पाहिल्याबरोबर त्याजविरुद्ध गांधी यांनीं आपली रणभेरी वाजविली. अफू, दारू, इत्यादि मादक पदार्थांच्या व्यापारावर त्यांचे हल्ले सुरू झाले. गिरण्या नाहींशा करून चरके आणि हातमाग सुरू करा, असा उपदेश ते स्वजनास करूं लागले. पाश्चात्य सुधारणेच्या जड वादा-पासून आणि त्यांतून उद्भवणाऱ्या शापापासून हिंदुस्थानास वांचविण्यापलीकडे दुसरें कांहींहि करण्याची गांधी यांची इच्छा नाहीं. आणि अद्यापि कडेलोट झाला नाहीं तोंच आपले संरक्षक उपाय योजण्याची तजवीज त्यांनीं केली. जुनी परं-परा पुन्हां दृढमूल करणें, याशिवाय हा भस्मासुराचा हल्ला परतविण्यास दुसरी तोड नाहीं हें उघड आहे. हल्लींचें व्यापारी युग अखिल मानव जातीस शापदग्ध करीत आहे. या आगीपासून मातृभूमीस वांचविण्याची खटपट गांधी करीत आहेत. माणुसकीला शुद्ध लांछन होऊन बसलेली हल्लींची मजूरदारीची पद्धत म्हणजे शुद्ध गुलामगिरी होय. या गुलामगिरीपासून स्वदेशाचें रक्षण झाल्यास पहावें, इतकाच गांधी यांचा उद्देश आहे. हिंदुस्थानाची ऐहिक भरभराट व्हावी, अशी गांधी यांची इच्छा नाहीं, तर प्राचीन भरतभूमीचा जीवितहेतु रक्षण करावा, इतकीच त्यांची इच्छा आहे. जुन्या काळचें आपल्या लोकांचें साधें जीवनचरित्र त्यांस पुन्हां मिळवून देण्याची त्यांची इच्छा आहे. त्यांचा जुना बंधुभाव, त्यांची जुनी सहिष्णुता आणि त्यांची जुनी ईशभक्ति त्यांस पुन्हां प्राप्त करून देऊन त्यांचें आध्यात्मिक बळ जिवंत ठेवावें एवढ्याचसाठीं हा प्रचंड खटाटोप गांधी यांनीं आरंभिला आहे.

गांधी हे आजच्याकाळचे मोठे धर्मप्रवर्तक आहेत, असें विधान मीं आरंभीं केलेलें तुमच्या लक्षांत असेलच. आणि या माझ्या विधानांत कितपत तथ्य आहे, हेंहि तुमच्या लक्षांत असेलच. जगाला धर्माचें वळण लागावें आणि पूर्व व पश्चिम या दोन्ही दिशांस सांप्रतच्या भयंकर स्थितींतून मुक्त करावें, असा त्यांच्या कार्याचा विश्वव्यापी हेतु आहे. बाह्यतः त्यांचें कार्य आज हिंदुस्थाना-पुरतें दिसत आहे; तथापि स्वदेशाचा उद्धार करीत असतां, साऱ्या जगाचा

उद्धार ते करीत आहेत. आपल्या मातृभूमींतूल भांडवलशाहीला दडपा रकरण्याकरतां जी चळवळ ते करीत आहेत, तिचा प्रतिध्वनि साऱ्या जगभर उमटल्यावांचून राहणार नाहीं. कार्य आणि प्रतिकार्य या दोन्ही वस्तु नेहमींच्या सहचारी आहेत. आणि याच नात्यानें गांधी यांच्या हिंदुस्थानांतील कार्याचा प्रसार सर्व जगभर होऊन आजची धर्मग्लानी दूर होईल. महाप्रतापी सीझरच्या काळांत रोमन साम्राज्याची जी दशा झाली होती, तीच दशा आपली चालू संस्कृति आज भोगीत आहे. आपल्या पाशवी बळानें सारें जग तिनें पादाक्रांत केलें आहे. आणि साऱ्या जगांतील संपत्ति आणि मनुष्यबळ यांचा उपयोग स्वार्थसाधनाकडे ती करीत आहे; पण एका बाजूनें तिचा बाह्य भपका वाढता दिसत असतां आंतून ती पोकळ होत चालली आहे. तिच्या पोटांत विघटनेची क्रिया सुरू झाली आहे. रोमन इतिहासांतील अगदीं आणीबाणीच्या प्रसंगांत ख्रिस्ताचा जन्म झाला आणि विनाशाप्रत जाऊं पाहणाऱ्या जगाला त्यानें नवजीवनाचा मार्ग दाखविला. ख्रिस्तानें केलेल्या कार्यामुळें आज दोन हजार वर्षे जग जीव धरून राहिलें आहे. आजहि आपण रोमन साम्राज्याचीच स्थिति पुन्हां भोगीत आहों, अशा स्थितींत गांधी यांचा अवतार झाला. आज आपणांस नवजीवन देण्याचें कार्य तेहि करीत नाहींत काय? आणि या दृष्टीनें जगदुद्धारक अशी संज्ञा त्यांना लावण्यास काय हरकत आहे?

हिंदुस्थानांत जें कार्य गांधी आज करीत आहेत, त्याचें महत्व केवळ स्थानिक नसून तें सर्वव्यापी कसें आहे, हें तुम्हांस आतां कळून चुकलें असेल. ख्रिस्ताच्या चरित्राशीं गांधी यांच्या चरित्राचें जें साम्य आहे, त्याची आठवण मला वारंवार होते. येशुख्रिस्त दैवी संपत्तीचा पुरुष होता. सर्वत्र प्रेमभावाचा उपदेश त्यानें केला आणि अमूर्त प्रेम प्रत्यक्ष करण्याकरतां अप्रतिकाराचें तत्व त्यानें पुढें आणलें. सैतानाला गादीवरून खालीं ओढून त्या जागीं परमेश्वराची स्थापना करावी आणि स्वर्गाचें राज्य पृथ्वीवर अवतरवावें, या हेतूनें त्यानें खटपट केली. गांधी आज हेंच करीत आहेत. व्यक्ति दृष्ट्या गांधी सत्पुरुष आहेत. प्रेमाचें साम्राज्य स्थापण्याची खटपट तेहि करीत आहेत आणि अप्रतिकाराचा उपदेश तेहि करतात. साम्प्रतची समाजरचना बदलून तिच्या जागीं नवी रचना आणावी आणि या रचनेंत जडवादाचें साम्राज्य नाहींसें होऊन त्या जागीं धार्मिक जीवन यावें अशी खटपट ते करीत आहेत. ख्रिस्ताचा अवतार पुन्हां होणार असें भविष्य आहे. हें भविष्य खरें होईल असें मला वाटत नाहीं; पण माझा तसा विश्वास असता, तर

खिस्त गांधींच्या रूपानें अवतरला आहे, असें प्रतिपादन मीं निःसंशय केलें असतें. खिस्ताचा अवतार पुन्हां होणार या भविष्यांत ऐतिहासिक सत्य नसले, तरी काव्य-दृष्टीनें तें खरें आहे. आणि या दृष्टीनें पाहतां गांधी हे खिस्तच आहेत, असे आपण कां म्हणूं नये ? 'खिस्ताचा आसुड' या नांवाचें एक लहानसें पुस्तक पाल रीशार यांनीं लिहिलें आहे. त्यांतील दोन वाक्यांकडे माझें विशेष लक्ष वेधलें.

' खिस्त पुन्हां अवतरला, तर साम्राज्याचा रहिवासी होण्यापेक्षां गुलामगिरींत पडलेल्या लोकांतच जन्म घेणें, त्याला अधिक पसंत पडणार नाहीं काय ?'
' खिस्त कधीं काळीं अवतरला, तर गौरवर्ण वंशांत तो जन्म घेणार नाहीं. कारण तसें झालें तर इतर वर्णीयांचा विश्वास त्याजवर बसणार नाहीं.'

गांधीं यांच्या ठिकाणीं हेंच भविष्य खरें झाल्यासारखें दिसत नाहीं काय ? आणि यावरूनच आपल्या चालू युगाचे ते खिस्त आहेत, असेंहि सिद्ध होत नाहीं काय ? वास्तविक पाहतां खिस्त खरोखर अवतरला आहे कीं नाहीं, हा प्रश्न पूर्वीप्रमाणेंच आतांहि महत्वाचा नाहीं. त्याची ओळख पटवून कोण घेईल आणि त्याचा अनुयायी कोण होईल इतकाच महत्वाचा प्रश्न आहे.

जॉन हेन्स होम्स्.

---

# उपसंहार.

लोकगंगेची लाट आपल्या विरुद्ध उसळली म्हणजे, तिच्या नेत्यावर हव्या त्या वाममार्गानें गदाघात करून आपल्या सूड बुद्धीचें प्रदर्शन करण्याची खोड जगांतल्या बहुतेक राजशासन संस्थांना अनादि काळापासून-निदान इतिहासाच्या अस्तित्वाच्या काळापासून जडलेली दिसून येते. आज महात्मा गांधीसारखा संत शिरोमणि या लोकगंगेंतून उचलून सहा वर्षासाठीं तुरुंगांत डांबून ठेवण्यांत ब्रिटिश राजशासन संस्थेनें जो मार्ग स्वीकारला तो नवीन नसून इतिहासांत असलेल्या प्रकरणाच्या आवृत्त्यामागून आवृत्त्या निघाल्या असून जगानें आजवर त्या पाहिल्या आहेत. महात्मा गांधी यांच्यासारखा थोर दानतीचा, पूर्ण संस्कृतीचा आणि मनःपूर्वक शांततावादी गृहस्थ सध्यांच्या काळीं जगांत एवढाच एक आहे, असें म्हणावयास मला यत्किंचितहि प्रत्यवाय वाटत नाहीं. मनुष्य प्राण्यांच्या सामुदायिक व्यवहाराला कायद्यांची आवश्यकता आहे, हें कोणासहि कबूल करावयास पाहिजे; परंतु मनुष्यप्राण्यांचे व्यवहार अधिक सुखसोयींचे अधिक उपसर्गरहित आणि अधिक साम्यवादी व्हावेत, हें जें कायद्यांतलें मूळभूत तत्व, तेंच नष्ट करून कायदा जेव्हां बळमुष्टीचा आश्रय करतो; तेव्हां हें तत्व ओघानेंच पायाखालीं तुडविलें जाऊन मनुष्य जातीला काळोखी लावण्याचें सामर्थ्य मात्र या कायद्यांत हळूहळू निर्माण होऊं लागतें. याच स्वरूपाच्या कायद्याला पुढें करून ज्यांनी या महात्म्याला पकडण्याची अनुज्ञा दिली, ज्यांनी त्यांना न्यायासनापुढें उभे केलें आणि ज्यांनी त्यांना न्याय देण्याची क्रिया उरकून घेतली, त्या एकंदर समष्टीच्या चारित्र्याचा, दानतीचा आणि त्यांच्या मनोरचनेचा द्विदेव एका बाजूला मांडला आणि दुसऱ्या बाजूला गांधीच्या चारित्र्याचा हिशेब मांडला म्हणजे ज्याला हिशेब कळतो, अशा कोणाहि गृहस्थाचें मन विषादानें भरून गेल्यावांचून राहणार नाहीं. राजशासनसंस्थेच्या या कृतीनें कायदा, हुकमत आणि कायद्याच्या अनुरोधानें उत्पन्न होणारा न्याय, यांचा मान कदाचित राखला गेला असेल असें आपण क्षणभर कबूल करूं; पण मनुष्याचें मनुष्यत्व मगरमिठीच्या रागळें केवळ महात्मा गांधीवर मात करतों यावी म्हणून हरेश पायाळें लागले, हा या हिशेबांतल्या जमा-खर्चांतला मुख्य विचार . . . . आकडा आहे. राजशासन संस्थेच्या दानतीचें आणि संस्कृतीचें

दिवाळें या आंकड्यामुळें कसें निघालें, हें आतां साऱ्या जगाला विदीत होऊन चुकलें आहे.

ज्या महापुरुषानें ही राजशासनसंस्था उघडी करून तिचें हिडिस स्वरूप जगाच्या निदर्शनास आणून दिलें, ते महात्मा गांधी आहेत तरी कसे ? ते अगदीं सीधे साधे गृहस्थ आहेत. आंत एक बाहेर एक हें त्यांना मुळींच माहीत नाहीं. त्यांच्या बुद्धीला जें पटतें, तें ते अगदीं सरळ, सोप्या व स्पष्ट भाषेंत बोलून दाखवितात व लिहून दाखवितात. संदिग्धता, द्व्यार्थ आणि कायद्याच्या तारेवरचा नाच हीं तुम्हांस त्यांच्या एका शब्दांतहि आढळावयाचीं नाहींत. कोणतीहि गोष्ट करतांना ते मनुष्याचें मनुष्यत्व वाढीस लागेल कीं अधोगतीकडे चळेल, याचा मुख्य विचार करतात. ते हिंदुस्थानांतल्या अगदीं गरीबांचें अन्न खातात आणि गरीबांतल्या गरीबांचें वस्त्र वापरतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे इतकेंच कीं हिंदुस्थानच्या अगदीं कंगाल जनतेपैकीं ते एक आहेत आणि दुसऱ्या कोणी त्यापेक्षां निराळे आपणास समजावें अशी त्यांची इच्छाहि नाहीं. अशा या भिकाऱ्याला सगळें जग आज महात्मा म्हणून संबोधीत आहे. बुद्ध आणि ख्रिस्त हेहि भिकारीच होते. त्यांच्याचप्रमाणें आज भरतभूमींतले हजारों आणि लाखों लोक त्यांच्या पावलावर पाऊल टेऊन चालत आहेत आणि नुसतें कटीवस्त्र नेसलेल्या या भिकाऱ्याच्या हुंकारानें ब्रिटिश राजशासन संस्था भयभीत, कर्तव्यमूढ व गोंधळून गेली आहे.

चमत्कार आहे, तो पुढेंच आहे. महात्मागांधींना पकडल्यावर लोकगंगेचा ओघ उलटेल आणि कदाचित तो ओसरून जाईल अशी आशा राज्यकारभाराची धुरावाहणारांनीं बाळगिली होती व सरकारच्या राज्यरथाला खांदा देणाऱ्या–मवाळ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या एका पक्षाचीहि अशीच समजूत होती. हे विचारे मवाळ गांधींच्या उदयाबरोबर निस्तेज झाले होते. राष्ट्रानें त्यांची योजना देशाच्या शत्रूस्थानी केली होती; तेव्हां गांधींच्या कारागृहवासाबरोबर काजव्याप्रमाणें पुन्हां चमकून घेण्याची आशा मवाळांना सहजच उत्पन्न झाली; परंतु हा सर्व अजमास चुकीचा ठरला. लोकगंगा ओसरून जाण्याऐवजीं ती दुथडी मात्र वाहूं लागली असल्याचें या सर्वांच्या अनुभवास आलें. या बाबतींत राजशासन संस्थेचे सर्व अजमास चुकले आहेत. महात्माजींना पकडल्यावर लोक आपल्या मळ्याला मिठ्या मारतील, कांहीं संतप्त होऊन दंगाधोप्याला प्रवृत्त होतील आणि मग तोफेच्या गडगडाटानें पुन्हां आगगाम आपल्या शक्ति

त्याची गरज लोकांना भासवितां येईल, अशी राज्यधुरा वाहणारांची समजूत होती व या कार्यांत ही धुरा वाहणारांशीं मवाळ वगैरे अनेक पक्ष भागीदार होते; पण काळाच्या विचित्र करणीनें या सर्वांच्या तोंडाला पानें पुसलीं असून लोकगंगेच्या प्रचंड ओघांत या असल्या खुळसट कल्पना कोणीकडच्या कोणीकडे वाहून गेल्या आहेत. कायद्याचा मान राखण्याची साधी गोष्ट देखील सरकारला साध्य झाली नाहीं. ब्रिटिश राजशासन संस्थेच्या या कृतीचा अमेरीकेंत केवढ्या मोठ्या प्रमाणावर धिक्कार करण्यांत आला, हें आतां हिंदुस्थानांतल्या प्रजेला आणि सरकारला या दोघांनांहि पूर्ण माहीत झालें आहे. करावयाला जावें एक आणि व्हावें भलतेंच अशी या बाबतींत ब्रिटिश सरकारची अवस्था झाल्याचें माझ्या अनुभवास आलें आहे. सरकारनें वाटेल तें अवसान आणलें व आपल्या या घोरतर चुकीच्या समर्थनासाठीं हिंदुस्थानांतल्या परान्नपुष्टांना त्यानें वाटेल तें वदवावयास लावलें, तरी असल्या हात चलाखीनें आतां हिंदुस्थानांतल्या साधारण जनतेला फसविणें शक्य नाहीं, हें माझ्या प्रत्यक्ष अनुभवास आलें आहे आणि या देशाला खरोखर आशेचा किरण असेल, तर तो हाच आहे.

दिसावयाला ही गोष्ट अगदीं साधी दिसते; पण या साध्या गोष्टींतच भरतखंडाचें भावी वैभव मला सामावलेलें दिसतें. मी हिंदुस्थानांत पोहोंचलों, तेव्हां महात्मा गांधी तुरुंगांत जाऊन दोन महिने लोटले होते. सगळ्या देशावर गांधीजींची छाया पसरली होती; पुढें आतां कसा डाव टाकावयाचा या विचारांत सरकार होतें, मवाळ हुरळून गेले होते, सुशिक्षित गोंधळले होते, पोकळ देशहितैषि ऐश्वर्यस्वप्न पहात होते आणि धुंदीखेले स्वार्थांच्या कल्पनेंत गुंतून गेले होते; परंतु सर्व साधारण जनता अढळ होती. अगदीं खालच्या दर्जापर्यंतची सर्व प्रकारची जनता आजहि गांधींच्याच मार्गानें चालली आहे. गांधीवर त्यांचा अढळ विश्वास व अढळ श्रद्धा असून गांधींच्याच मार्गानें आपलें कल्याण होणार आहे, ही त्यांची भावना अगदीं दृढ झाली आहे. याचें कारण हें कीं, गांधी हे पोकळ वावदुक नसून त्यांच्या वाणींत रोकडेपणा आहे. लाखों आणि लाखों लोकांना आपलें अन्न आणि वस्त्र आपल्या हातांत असून आपण आतां उपाशीं मरणार नाहीं, असें निश्चयानें वाटूं लागलें आहे. चरखा ही एक त्यांनीं हिंदी राष्ट्राला अशी अप्रतिम देणगी दिली आहे कीं, या देशांतल्या लोकांना ती कामधेनूप्रमाणें वाटत असून इतर राष्ट्रांतल्या पुष्कळांच्या पोटांत सुदर्शन चक्राप्रमाणें या चक्राचें भय उत्पन्न झालें आहे. आजपर्यंत झालेल्या हिंदुस्थानांतल्या पुढाऱ्यांत जनत

गांधींना सर्व श्रेष्ठ समजते याचें कारण हें कीं, त्यांच्या चळवळींत देऊंदिलाऊं असला वायदा नसून जें काय आहे, तें रोख ठोख आहे आणि ही सर्व चळवळ धर्माच्या पायावर उभारली आहे, हें या साधारण जनतेच्या चित्ताला पक्कें भिनलें आहे.

अशाच एका अगदीं साध्या गृहस्थाला मी विचारलें, 'महात्माजींना पकडलें, आतां पुढें काय ?' तेव्हां तो म्हणाला, " गांधींना आमच्यांतून उचलून नेतां आलें; पण त्यांनीं दिलेलें चैतन्य आतां आमच्या जवळून कोणासहि नेतां येणार नाहीं." हें उत्तर ऐकून मी अगदीं चक्क झालों. एखाद्या विद्वानानें हें उत्तर मला दिलें असतें, तर त्या उत्तरांत कृत्रिमतेचा वास मला आला असता; परंतु हा गृहस्थ अगदीं लंगोट्या होता. त्याला त्याच्या देशी लिपींत जेमतेम सही तेवढी करतां येत होती. हाच एक गृहस्थ नव्हे तर अशा अनेक गृहस्थांना मी हा प्रश्न केला आणि त्या सर्वांकडून हा एकच जबाब मला मिळाला. यावरून हें माझ्या लक्षांत आलें कीं महात्माजींनी हिंदुस्थानांत जी ही धर्मगंगा आणून सोडली आहे, ती केवळ वळवाच्या पावसानेंच वाहणारी नसून तिचा ओघ जिवंत आहे. महात्माजी मनुष्य आहेत, अर्थात ते नश्वर आहेत. परंतु वरच्या उत्तरांतून असा स्पष्ट ध्वनि उमटतो कीं, महात्माजी तुरुंगांत असोत अथवा ते काळाच्या भक्ष्यस्थानीं पडोत; त्यांनीं जी भगीरथाप्रमाणें धर्मगंगा भरतखंडांत आणली आहे, ती अव्याहत वहात राहणार. महात्माजींची ही चळवळ धर्माच्या पायावर उभारली गेल्यामुळेंच ती राष्ट्राच्या रोमरोमांत भिनून गेली आहे. ती इतकी भिनून गेली आहे कीं, राष्ट्राचा आत्मा जो-साधारण जनता, त्या जनतेला राष्ट्रविघातक काय आणि राष्ट्रसंवर्धक काय हें आतां चागलें कळूं लागलें आहे. आपले शत्रु कोण आणि आपले मित्र कोण हें आतां तिला चांगलें ओळखतां येतें. ब्रिटिश राजशासनसंस्थेपासून घेण्यासारखें काय आहे आणि टाकण्यासारखें काय आहे, हें तिला उत्तम कळतें. या लोकगंगेला हें आतां निश्चयानें वाटतें कीं, ब्रिटिश-रियासतीच्या शाळा म्हणजे आपणास सर्वप्रकारानें निस्तेज करण्याचे कारखाने आहेत, त्यांच्या न्याय कचेऱ्या म्हणजे कायद्याच्या पांघरुणाखालीं आपणांस सर्व प्रकारानें निःसत्व करणाऱ्या संस्था आहेत, वकील हे सरकारच्या स्टांप खात्याचें उत्पन्न वाढविणारे दलाल आहेत आनि कौन्सीलें म्हणजे राष्ट्राचो मान खंडणा करण्याचे अड्डे आहेत. राष्ट्राच्या उदयोन्मुख काळ येण्यास जें भांडवल लागतें, त्याचा हक्प्रत्यय मला अशा रीतीनें आल्यावर महात्मागांधीविषयीं माझ्या

चित्तांत असलेली पूज्य भावना अधिकच शुद्ध व भव्य झाली. माझी जिज्ञासा-वृत्ति साहजिकच वाढली आणि मी साबरमती येथें जाऊन त्यांच्या सत्याग्रहा-श्रमाचें सकौतुक दर्शन घेऊन त्यांचें चरित्र व चारित्र्य याविषयीं मिळेल तितकी माहिती मिळविली.

महात्मा गांधी हे शुद्ध धर्मप्रवर्तक आहेत. धर्माच्या प्रभावळींत जीं जीं किरणें असावयास पाहिजेत, तीं सर्व त्यांच्या प्रभावळींत असल्यामुळें ज्याला जसे डोळे आहेत, तसे ते त्याला दिसतात. कित्येक क्षुद्र बुद्धीचे व स्वार्थविवश लोक त्यांना अगदीं निराळ्या दृष्टीनें पाहतात. कोणाला ते राजकारणी पुरुष वाटतात. तर कोणी त्यांना अराजनिष्ठ म्हणतात. कोणाला त्यांची असहकारिता अव्यवहार्य वाटते, तर कोणाला त्यांचे मार्ग शुद्ध रानटीपणाचे वाटतात. इतकेंच नव्हे तर कित्येक त्यांचेच देशबंधू त्यांच्यावर याहीपेक्षां दुष्ट आरोप करण्यास दिक्कत बाळगीत नाहींत; परंतु या डोळस म्हणविणाऱ्या अंधांच्या वडबडींत सत्याचा अल्पांशहि नसून या आंधळ्यांचा हा शब्दछळ म्हणजे सूर्य किरणांतून रंग वेगवेगळे काढून त्यानें घर रंगविण्याइतकेंच हास्यास्पद आहे. कदाचित या शब्द-छळांत कपटाचाहि अंश असेल; पण महात्माजीप्रमाणेंच मीहि या सर्व स्वार्थ-साधु टीकाकाराकडे दुर्लक्ष करतों आणि या मिथ्या व स्वार्थविवश टीकाकारांची योग्यताहि खरोखर तितकीच आहे. हे टीकाकार आचारानें व विचारानें आपल्या बुद्धीचा समतोलपणा कधींच गमावून बसले आहेत. दुसऱ्याच्या संपत्तीचा अप-हार करण्याची सवय जडलेल्या या भोगासक्त जिव्हांना गांधींचा त्यागाचा मार्ग कधींच आवडणार नाहीं. आज हिंदुस्थानांत हिंदु धर्मियांचेंच प्राबल्य अधिक आहे. या धर्माची उभारणी वस्तुतः त्यागाच्या पायावर झाली आहे. तथापि, आतां शेंकडों आणि हजारों हे आर्यधर्मी ऐश्वर्यासच आपला धर्म समजत असून त्यासाठीं वाईटांतलें वाईट कृत्य करण्यासहि त्यांना दिक्कत वाटत नाहीं. यांतले कांहीं आपणास राष्ट्रहितैषी म्हणवितात; परंतु, वस्तुतः हे लोक हिंदु-स्थानच्या प्रत्यक्ष शत्रूहूनहि नीच आहेत. हिंदुस्थानांत ही जी धर्मग्लानी पस-रली आहे, ती दूर करून पुन्हां त्यागाच्या मार्गावर आपला वैदिक धर्म आणावा, एवढ्यासाठींच महात्मा गांधींचा अवतार झाला आहे.

तर मग हा धर्मप्रवण महात्मा ब्रिटिश राज्यशासन नष्ट करण्यासाठीं एवढ्या अट्टाहासानें को प्रयत्न करीत आहे ? मायेच्या दृष्टीनें हा प्रश्न मला मायदृष्टीनें सोडवयास पाहिजे; पण तत्त्वदृष्ट्या हा प्रश्न मला फार निराळ्या शब्दानें सोडावा

लागेल. माणसांनी माणसासारखें व्हावें एवढयासाठीं ते जनतेला अशा मार्गानें नेत आहेत कीं, त्या मार्गाला लागल्यावर केवळ दंडनीतीवर उभारलेली कोणतीहि राजशासनसंस्था आपोआपच भलतीकडे राहून जनता नीट देवत्वाच्या दिशेला पुढें पुढेंच जात राहील. ऐश्वर्यवादी राजशासन संस्था, पाश्चात्यांच्या संसार्गानें निर्माण झालेल्या समाईक भांडवलाच्या वगैरे दुसऱ्या ऐश्वर्यवादीसंस्था व इतर ऐश्वर्यवादी व्यक्ती, यांना महात्मा गांधींचा जो एवढा संताप येतो आणि या महात्म्याला पाळामुळासुद्धां खणून काढण्यासाठीं हे सर्व एकजुटीनें जो असुरी प्रयत्न करीत आहेत, त्याच्या मुळाशीं पाहूं गेल्यास त्यांना वाटत असलेलें निरैश्वर्य भय तुम्हांस स्पष्ट दिसून येईल. वस्तुतः गांधी हे जावयास पाहिजे त्याच मार्गानें जात आहेत व जनतेसहि अधोगतीकडे जाऊं न देतां आपल्यामागून नेत आहेत. मनुष्यत्वाच्या आणि देवत्वाच्या कोणत्याहि कायद्याचें उल्लंघन यांत निश्चयानें नाहीं. असे असतां गांधीच्या मार्गांत जर राजशासनसंस्था आपण होऊन आडवी पडूं लागली, तर या राजशासनसंस्थेशीं दोन हात करणें, गांधींनाहि भाग आहे. यावरून ही गोष्ट कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखी आहे कीं, गांधी हे राजकारणी पुरुष नसून राजकारण हें त्यांच्या मार्गांत आडवें आलें आहे. ते खरे महात्मा, खरे शूर, खरे दृढप्रतिज्ञ आणि खरे योगी व स्थितप्रज्ञ असल्यामुळें ही राजकारणाची धोंड आपल्या मार्गांतून सहज लीलेनें दूर करीत आहेत. ते आज तुरुंगांत असले, तरी त्यांचें कार्य अविरतपणें चाललें आहे. आणि तेंहि अगदीं साधारणप्रतीच्यां शिष्यवर्गाकडून चाललें आहे.

महात्मागांधी हे तुरुंगांत गेल्यामुळें देशाचें भयंकर नुकसान झालें आहे, ही गोष्ट नाकबुल करण्यांत अर्थ नाहीं; तथापि यामुळें देशाचा एक मोठा फायदाहि झाला आहे. या देशाचे शत्रू कोण आणि मित्र कोण ही गोष्ट यामुळें स्पष्टतेनें जनतेच्या नजरेस आली आहे. गांधी जेव्हां आपल्या पावलानें सर्व देशभर पापबीजें पददलित करीत हिंडत होते; तेव्हां त्यांच्या प्रभावानें दिपून जाऊन पुष्कळ पोकळ देशहितपी राष्ट्रीय म्हणविण्याचें ढोंग करीत असत; पण गांधींचीं पावलें शृंखलाबद्ध होण्यावरोवर आज त्यांनीं हा बुरखा टाकला असून आपण खरोखर कोण आहों, हें त्यांनीं देशाला जाहीर केलें आहे. जणूं काय हे लोक गांधी तुरुंगांत जाण्याची वाटच पहात होते. महात्माजी तुरुंगांत गेल्यावर एक प्रकारचें औदासिन्य सगळ्या हिंदुस्थानावर पसरलें, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. यामुळें त्यांच्या विश्वव्यापी चळवळीला शिथिलता-

आल्यासारखी दिसत आहे; पण हें क्षणमात्र टिकून राहणार आहे. त्यानंतर दुसऱ्याच क्षणीं ही लाट अशी जोरानें उसळेल कीं सर्व जग थक्क होऊन जाईल. मी जरी अमेरिकन असलों, तरी एकंदर मानवजातीच्या कल्याणाची अरुण छटा मला हिंदुस्थानच्या पूर्व क्षितिजांत दिसत आहे आणि माझ्या आशेला जो ध्रुवतारा दिसत आहे, तो म्हणजे जनतेंतला खालचा थर होय. सांप्रत पसरलेली दुही, पक्ष, भेद या सर्वांचें आलोचन करून भरतभूमीचें थोडें तीक्ष्ण दृष्टीनें निरीक्षण केल्यावर बंगाल प्रांतांतल्या एका असहकारवादी शेतकऱ्याला मीं विचारलें, 'तुमच्या देशांत आतां पुष्कळ घोटाळे माजले आहेत. या देशाला आतां *स्वराज्य मिळणें अशक्य आहे, असें नाहीं तुम्हांला वाटत ?' यावर तो म्हणाला,* "काय म्हणतां ? अशक्य ! अशक्य ध्येयाचा उपदेश महात्मा गांधी कधींहि करीत नाहींत. आम्ही स्वराज्य मिळविणारच आणि तें मिळणारहि."

"*पण तें आतां तुम्ही मिळविणार कसें ?*"

"साहेब, ब्रिटिश सरकारला राज्य कोणीं मिळवून दिलें हें तुम्हांला माहीत आहे ? आमच्या अशुद्ध दानतीनें ! आमच्या सुराजउद्दौलाच्या विरुद्ध आम्हींच लढलों आणि सोन्याचा बंगाल ब्रिटिशांच्या पदरांत आम्हीं टाकला. मग बंगालचें संरक्षण करण्यासाठीं म्हणून आमचीच योजना झाली आणि केवळ स्वार्थाचें विष पिऊन भोंवतालचे प्रांत आम्ही मिळवून दिले. शीख, महाराष्ट्रीय, मद्रासी, हे आम्ही सर्व एकमेकांचे बंधु असतां व एकाच भरतभूमीचे पुत्र असतां एकमेकांशीं शत्रूप्रमाणें वागून एकमेक दुसऱ्यांचे प्रांत ब्रिटिशांच्या पदरांत टाकतां टाकतां सगळें हिंदुस्थान भेदनीतीच्या पाशाला बळी पडून आम्ही त्यांना मिळवून दिलें. या पापकर्माचें प्रायश्चित आतां आम्हांस घ्यावयास पाहिजे आणि त्याचा अगदीं सोपा, पुण्यमय, पूर्णशांततेचा आणि अमेरीस सर्व जगतास कल्याणप्रद असा मार्ग महात्मा गांधींनीं आम्हास दाखवून दिला आहे. हा मार्ग म्हणजे अप्रतिकार आणि असहकारयोग. आम्ही आतां सरकारला कोणतेंहि *साहाय्य करणार नाहीं आणि मानवजातीच्या कल्याणाला जेवढें आवश्यक असेल,* तेवढेंच करीत राहूं."

हा शेतकरी कलकत्ता युनिव्हर्सिटीचा ग्रॅज्युएट असून सरकारी चांगल्या हुद्यावर होता. महात्मा गांधी यांचा असहकारयोग त्याच्या चित्ताला पटल्यावर ती नौकरी सोडून तो आपला शेतीचा उद्योग पाहूं लागला. शेती व चरखा या दोन साधनांवर त्यानें आपल्या कुटुंबाची गुजराणूक चालविली असून पूर्वीपेक्षां त्याला पुष्कळ

श्रम करावे लागतात; तथापि तो मोठा उत्साही व आनंदी दिसला. त्याचे वरील शब्द ऐकून मला ब्रिटिशांनीं कमावलेल्या हिंदुस्थानासंबंधानें The Empire which was won in a day may vanish a night या म्हणीची आठवण झाली आणि ब्रिटिश राजशासन संस्थेलाहि हेंच दुःस्वप्न दिसूं लागलें आहे. ऐश्वर्यवादी दुसऱ्या संस्था व इतर व्यक्ती याच दुःस्वप्नानें भयभीत झाल्या आहेत आणि म्हणून हे सर्व मिळून असहकारयोगाचें कंबरडें मोडण्याचा अट्टाहास करीत आहेत; परंतु महात्मा गांधींनीं निर्माण केलेलें हें वज्र आतां नष्ट होणें शक्य नाहीं. हिंदुस्थानांतली जनता कधीं काळीं तरी भेदनीतीला पायाखालीं तुडवून असंतुष्ट होईल व ती आपल्याविरुद्ध उभी राहील, हें भय ब्रिटिश राजशासनपद्धतीला पूर्वीपासूनच होतें व म्हणून या राजशासन संस्थेनें जनतेला शस्त्रशून्य करून देहानें व शिक्षण देऊन मनानें दुर्बळ करून ठेवलें होतें. अशा स्थितींत शस्त्रसंन्यास धर्मांत हिंदी प्रजेचीं तपेंच्या तपे गेल्यावर हें असहकारयोगाचें वज्र निर्माण होणें ओघानेंच प्राप्त झालें. हें वज्र नष्ट करण्यासाठीं सरकारनें हात उचलला आहे, हें खरें; पण या हाताचे स्नायू शिथिल होत असून मूठ वळेल कीं नाहीं ही शंका सरकारालाहि आल्याचें दिसत आहे. हा असहकार योग म्हणजे राजशासन संस्थेला पक्षाघाताचा विकार होण्याचीं लक्षणें होत, हें आतां सगळ्यांच्या लक्षांत येऊन चुकलें आहे.

या बंगाली शेतकऱ्याची मी आणखी तीन चार वेळ गांठ घेऊन त्याच्याशीं पुष्कळ चर्चा केली. माझ्या प्रवासांत पुष्कळ लोक मला भेटले; पण त्यांतले कांहीं ब्रिटिशराजशासन संस्थेचे इतके गोडवे गात कीं, ते केवळ स्तुति पाठक आहेत, हें ओळखण्यास मला वेळ लागला नाहीं. उलट पक्षीं या राजशासनपद्धतीवर गरम होणारे कांहीं लोक मला असे भेटले कीं माथेफिरूपेक्षां दुसऱ्या योग्य सदरांत त्यांना समाविष्ट करतां यावयाचें नाहीं. पण वरील बंगाली गृहस्थ शांतवृत्तीचा आणि समतोलबुद्धीचा असल्यामुळें तीन चार वेळां मिळून त्याच्याशीं संभाषण करण्यांत मीं एकंदर दहा बारा तास खर्च केले. विशेषतः असहकारयोगाच्या तत्वाप्रमाणें त्यानें आपली वागणूक ठेवलेली असल्यामुळें आणि जगांत आजपर्यंत होऊन गेलेल्या असहकारयोगी तत्ववेत्त्यांच्या ग्रंथांचा त्यानें अभ्यास केलेला असल्यामुळें त्याच्याशीं विचारविनिमय करण्यानें मला पुष्कळ उपयोग झाला. गांधींच्या मार्गानें स्वराज्य मिळणें शक्य नाहीं, असे भासवून अथवा प्रामाणिकपणें असें सांगून स्वराज्यासाठीं पाश्चात्य पद्धतीचे उपाय जे लोक सुच-

वितात, त्यासंबंधानें मी कांहीं प्रश्न विचारल्यावरून तो म्हणाला, "बार्डोलीचा कार्यक्रम बदलून महात्माजींनीं खादी व बहिष्कारत्रयी यांसच विशेष प्राधान्य दिलें हें पुष्कळांस पसंत नाहीं. कौन्सिलांतल्या रंगभूमीवर तलवार गाजवून नट ऐश्वर्य संपादन करण्याचा लोभ पुष्कळांना उत्पन्न झाला आहे. वस्तुतः गांधींनीं बार्डोलीचा कार्यक्रम थांबविला म्हणून कोणीहि निरुत्साह होण्याचें कारण नाहीं. महात्माजींचा बाकीचा कार्यक्रम एवढा विश्वव्यापी व कल्याणप्रद आहे कीं त्या एका कार्यासाठीं आम्हांला आयुष्यभर श्रम करावे लागले तरी आम्ही ते केले पाहिजेत. नुस्ती खादी म्हटली, तरी तीसाठीं अजून आम्हांस किती तरी काम करावयाचें आहे. आम्ही आमच्या हातानें कातलेल्या व विणलेल्या कापडाचाच उपयोग करावयाचा, एवढयावरून हें अगदीं उघड होतें कीं, आम्ही आमच्या देशाच्या कापसाचा व्यापार सर्वस्वी आमच्या हातांत घ्यावयास पाहिजे. गांधींच्या मार्गानें यश येणार नाहीं, असें म्हणणारांनीं क्षणमात्र तरी आपली नजर इतक्या लांब पोंहोंचविली होती काय ? शेतकऱ्यांच्या बाबतींतहि हिंदुस्थानाला अशीच प्रचंड घडामोड करावयाची आहे. राष्ट्रानें आपल्या देशांतल्या धान्याची घडामोड आपल्याच हातांत ठेवावयास पाहिजे. या व्यवहारांत असलेला परक्यांचा हात दूर करण्याचा प्रयत्न गांधींना नांवें ठेवणारांनीं थोडा तरी केला काय ? हिंदुस्थानांतल्या प्रत्येक शेतकऱ्यास त्याच्या पोटापुरती जमीन आणि एक लहानसें घर असावयास पाहिजे. राष्ट्राला हा प्रश्न सोडविल्यावांचून गति नाहीं; परंतु गांधींना नांवें ठेवणारांनीं हा प्रश्न सोडविण्याचा कधीं विचार तरी मनांत आणला होता का ? महात्माजींच्या मार्गानें स्वराज्य मिळणार नाहीं, असें जे वल्गना करतात, ते केवळ वावदूकच असते, तर एवढी काळजी नव्हती; पण हे वावदूक स्वार्थी व मित्रे असल्यामुळें राष्ट्राला कल्याणप्रद असें त्यांनीं कांहीं केलें नाहीं आणि करणारहि नाहींत."

या गृहस्थाचे हे विचार हिंदुस्थानच्या खरोखरच फार फायद्याचे आहेत. राष्ट्रानें टिळकस्वराज्य फंडाप्रमाणेंच एक भला मोठा निधि जमवावा, देशांतला कपाशीचा व धान्याचा व्यापार आपल्या हातीं घ्यावा, सर्वत्र लहान लहान पेढया स्थापून हुंडणावळ मिळवावी, अगदीं अल्प व्याजानें रकमा मिळवाव्यात च शेतकऱ्यांना ऋणमुक्त करून नवीन शेतीहि निर्माण करावी, अशी या गृहस्थाची मोठी उपयुक्त योजना आहे. ही योजना अत्यंत निरुपद्रवी आहे; पण ती जर हिंदुस्थानानें यशस्वी करून दाखविली, तर सगळें जग खडबडून जागें

होण्याइतकी तिच्यांत शक्ति आहे. असले निरुपद्रवी; पण आवश्यक उद्योग करावयाचे बाकी असतां, महात्माजींच्या मार्गानें स्वराज्य लाभणार नाहीं, असें निर्लज्जपणानें म्हणून जे लोक राजशासनसंस्थेशीं सहकारित्व करण्यास धावतात, त्यांच्या देशभक्तीबद्दल जर राष्ट्राला संशय आला, तर तो अकारण आला, असें म्हणतां येणार नाहीं.

तुम्ही ज्याला स्वराज्य म्हणतां, त्याचें स्वरूप मला थोडक्यांत सांगाल का? असा प्रश्न मीं त्या गृहस्थाला केल्यावर तो किंचित हंसून म्हणाला, " तत्वदृष्टया हा शब्द थोडा चुकीचा आहे. ऐश्वर्याचा वास थोडा फार या शब्दाला येतो; तथापि आम्ही त्याऐवजीं दुसरा शब्द वापरणार नाहीं. प्रत्येक व्यक्तीनें व प्रत्येक कुटुंबानें उपसर्गरहित आचरण ठेवल्यानें जी समाजस्थिति निर्माण होईल, तिला आम्ही स्वराज्य म्हणूं. ही उपसर्गरहित आचरणाची प्रवृत्ति राष्ट्रांत जसजशी वाढत जाईल तसतसें आमचें जीवन शुद्ध, धर्ममय व चैतन्ययुक्त होऊन न्यायकचेर्‍या, कायदे आणि राजशासन हीं सर्व हळू हळू अस्तंगत होतील."

या म्हणण्यांतला गर्भितार्थ माझ्या लक्षांत सहज आला. 'उपसर्गरहित!' हा शब्द गोड असेल; पण सरकारला कोणताहि कर न देण्याचा ध्वनीहि याच शब्दांतून उमटतो, हें त्याला सुचवून मी म्हणालों, " असें उपसर्गरहित आचरण जर तुमच्या राष्ट्रांत वाढीस लागलें, तर सरकार गप्प बसणार नाहीं. आज होत आहे यापेक्षांहि तुमच्यावर अधिक जुलूम होईल आणि तुमच्या घरांत शिरून सक्तीनें करभार वसूल केले जातील."

तो म्हणाला, " हें होणारच; पण ते सर्व जुलूम आम्ही निमूटपणें सोसूं आणि अशा वेळीं आमच्यावर जुलूम होत आहे, असें आम्ही वदणार देखील नाहीं. 'कोणी तरी येऊन लुटालूट करून गेले!' एवढेंच फार तर कोणी विचारल्यास त्याला मी कळवीन. या जुलमालाहि आमच्या उपसर्गरहित आचरणानेंच आपोआप आळा पडेल. शनीच्या वक्रदृष्टीनें विक्रमाचे हातपाय तुटून त्याचा जसा नुसता मांसपिंड राहिला होता, तीच अवस्था आमच्या सदाचरणानें राजशासनसंस्थेचीहि होईल."

मी त्याचें सगळें म्हणणें ऐकून घेऊन राजशासनसंस्था नष्ट झाल्यावर हिंदुस्थानची कशी चमत्कारिक अवस्था होईल, याचें भयप्रद चित्र त्या बंगाली शेतकऱ्यापुढें उभें केलें आणि त्याला विचारलें, 'अशा स्थितींत अफगाणिस्थान, तिबेट वगैरे देश तुमच्यावर राज्यलोभानें उलटले तर तुम्ही काय कराल?'

तो म्हणाला, "हा अगदीं जुना प्रश्न आहे. ते हिंदुस्थानावर केव्हांहि स्वारी करणार नाहींत. आमच्या चळवळीनें जर ब्रिटिशासारख्या मातब्बरांचाहि राज्य-लोभ संपुष्टांत आला, तर तोच राज्यलोभ इतर राष्ट्रांच्या पोटांत कधीं उत्पन्न होईल हें संभवतच नाहीं. शिवाय हीं शेजारचीं राष्ट्रें हिंदुस्थानावर केव्हांहि स्वारी करणार नाहींत, असें आम्हांस खात्रीनें वाटतें. हिंदुस्थानानें एकदां शस्त्रसंन्यास केल्यावर या शेजारच्या राष्ट्रांना झाला तर शस्त्रसंन्यासाचाच लोभ उत्पन्न होईल. हिंदुस्थानाभोंवतालचे हे लहान लहान देश आपल्या शक्तीच्या-बाहेर सध्यां लष्करी खर्च करीत आहेत. ब्रिटिश लोक आपणास केव्हां गिळंकृत करतील हें भय त्यांना रात्रंदिवस आहे. जर हिंदुस्थानाला असहकारयोगांत पूर्ण विजय मिळाला, तर या शेजारच्या देशांना हायसें होऊन आपला लष्करी खर्च ते दुसऱ्याच क्षणीं कमी करून टाकतील. याशिवाय दुसरा चमत्कार होईल तो निराळाच. हिंदुस्थान मुक्त होतांच इराण, इजिप्त आणि टर्कीचें साम्राज्य यांचें ग्रहण आपोआप सुटेल."

या बंगाली गृहस्थाचें हें म्हणणें मला कबूल करावें लागलें. याशिवाय यांत दुसराहि एक मुद्दा आहे. "आम्ही हिंदुस्थान सोडलें तर सर्व हिंदुस्थानांत बंडावे माजून सगळ्या देशांत रक्तपात सुरू होतील" असें जेव्हां ब्रिटिशसाम्राज्याचे चाहते अभिमानानें म्हणतात, तेव्हां त्यांना ओघानेंच असा प्रश्न विचारणें भाग होईल कीं, एवढ्या लांबलचक दीडशें वर्षांच्या अवधींत ज्या देशाला तुम्हाला स्वसंरक्षणाचें शिक्षण देतां आलें नाहीं, त्या देशाला आणखी किती हजार वर्षांनीं स्वसंरक्षणास समर्थ कराल, तें तरी एकदां शपथेवर सांगा. थोड्याच दिवसां-पूर्वी मी साऱ्या दक्षिण एशियाचा प्रवास पुरा केला असल्यामुळें केवळ ब्रिटि-शांच्या साम्राज्यवादाच्या भयानें लहान लहान मुसलमानी राष्ट्रांना आपल्या आवांक्याबाहेर लष्करी खर्च करावा लागत आहे आणि यामुळें देशांतली जनता या खर्चानें अगदीं गांजून गेली आहे. म्हणजे वस्तुस्थिति अशी आहे कीं, पर-चक्राचें भय हिंदुस्थानाला नसून या लहान लहान राष्ट्रांना मात्र आहे. असें असतां हा परचक्राचा बागुलबोवा जेव्हां चांगले चांगले सुशिक्षित उभा करतात, तेव्हां त्यांच्या अज्ञानाबद्दल हंसावें की रडावें, हेंच समजत नाहीं.

हिंदुस्थानांत मवाळ म्हणून जो एक महात्मा गांधींच्या विरुद्ध पक्ष आहे, त्यांत-त्यांतहि कांहीं गृहस्थांनी संभावितपणाचे योगायोग आहे. यांतले कांहीं लोक खरो-खरच प्रामाणिक आहेत. त्यांनीं जरी शुद्धीचे मार्ग पत्करले आहेत, तरी त्यांची

देशभक्ति अगदींच हिणकस आहे, असें नाहीं; परंतु पुष्कळ मवाळ केवळ धुंकि-झेले, अगदींच कोत्या बुद्धीचे आणि कांहीं तर केवळ सांगकामे असल्याचें मला आढळून आलें. यासंबंधाची एक लहानशी गोष्ट येथें सांगितली असतां वावगी होणार नाहीं. बंगाल प्रांतांतली सफर संपवून मुंबईकडे जात असतां, मध्यप्रांतांत माझ्या गाडींत तीन मवाळगृहस्थ एकाच वेळीं येऊन बसले व राष्ट्रीय पक्षाला शिव्या देण्याचा त्यांनीं सपाटा चालविला. युरोपीयन गृहस्थासमोर हा असला शिमगा करणें त्यांना मोठें मानाई वाटलें असावें. युरोपियन म्हटला कीं, तो राष्ट्रीय पक्षाला पाण्यांत पाहणारा असतो, ही समजूत बहुतेक सर्वांचीच दृढ झाली आहे. मीहि त्या मवाळावरोबर राष्ट्रीय पक्षाला शिव्या देऊन त्यांच्या पोटांत शिरलों. हे बिचारे मोठया संकटांत पडले होते. कौंट टॉलस्टाय यांनीं झारशाही विरुद्ध लिहिलेलीं चारदोन पत्रें गांधीच्या पक्षानें छापून राष्ट्रांतल्या या उदारमतवादीयांकडे पाठवून उत्तर देण्यास त्यांना आव्हान केलें होतें. टॉलस्टॉय सारख्या असामान्य बुद्धीमत्तेच्या साधूनें लिहिलेल्या त्या पत्रांना उत्तर देणें हें या उसन्या बुद्धीच्या मवाळांना मुळींच शक्य नव्हतें. मी कोणी तरी एक अमेरिकन आहे, असें समजल्यावर त्यांतील एक विशेष विद्वान गृहस्थ मला म्हणाला, "टॉलस्टॉयविरुद्ध कांहीं पुस्तकें अमेरिकेंत प्रसिद्ध झालीं आहेत, त्याची माहिती आपण आम्हांस द्याल काय?" या संबंधानें मला जी माहिती होती, ती सांगून मी म्हणालों, "रशियांत टॉल्स्टॉय यांचें वजन जेव्हां अतिशय वाढलें; तेव्हां झारशाही व क्याथोलिक पंथाचे पाद्री यांनीं कांहीं विद्वानांना मलिदा चारून त्यांच्याकडून कांहीं चोपडीं प्रकाशित करविलीं. अमेरिकेंत टॉलस्टॉय यांची कीर्ति अतिशय पसरलेली असल्यामुळें हींच चोपडीं अमेरिकेंत तेथल्या भाषेंत प्रसिद्ध झालीं; पण हें सगळें रशियन सरकारचें कारस्थान आहे, ही गोष्ट थोडयाच दिवसांत बाहेर पडली आणि त्यामुळें अमेरिकेंत टॉलस्टॉय यांच्या नांवाला अधिक पूज्यता येऊन त्यांचें नांव सर्वतोमुखी मात्र झालें." तेव्हां असल्या चोपडयांचा तुम्हाला कांहीं उपयोग होणार नाहीं, हें माझें म्हणणें ऐकून ते बिचारे हिरमुसले झाले. हा प्रकार मोठासा महत्वाचा आहे असें नाहीं; तथापि मवाळ पक्षाची मनोरचना कशाप्रकारची आहे, याची थोडीच कल्पना येण्यासारखी आहे.

आज १५० वर्षें हिंदुस्थानांतल्या लोकांना ब्रिटिश राजशासन संस्थेनें जें शिक्षण दिलें, त्याचा सगळा हा परिणाम आहे. इतिहास, वाचन पुस्तकें, अर्थशास्त्र वगैरे हीं केवळ परदास्याच्या भावनेनेंच पढविलीं आहेत आणि त्यांतहि दुःखाची

गोष्ट ही की, हें नामुष्कीचें काम ब्रिटिशांनीं हिंदी जनतेंतल्याच कांहीं व्यक्तीकडून उरकून घेतलें आहे. आज १५० वर्षे हें विष पिऊन पिऊन सुशिक्षित म्हणविणारा सगळा वर्ग जवळ जवळ शत्रुस्थानीं जाऊन बसला आहे. माय देशाशीं निमकहराम होणें हाच आता या वर्गाचा उदरंभरणाचा धंदा होऊन बसला आहे. एकाद्या तरुणाला तुम्ही म्हटलें कीं, अरे असली ही शाळा सोड, तर तो तुम्हांला विचारील कीं, 'मी शिकलों नाहीं, तर मला नौकरी कोठें मिळेल ?' हा त्याचा प्रश्न ऐकला म्हणजे या तरुणाचा हा असा अधःपात कां झाला, याची सर्व कारणपरंपरा डोळ्यापुढें उभी राहते आणि एक वेळ असें देखील वाटतें कीं या सगळ्या शिक्षणसंस्था नष्ट होऊन तरुण पिढी निदान एक तपभर सैरावैरा भटकत राहिली, तरच त्यांच्या अंगांत भिनलेलें हें विष नष्ट होईल. महात्मागांधींनीं एवढ्याचसाठीं हल्लींच्या शिक्षणावर सरसहा हत्यार उपसलें आहे; परंतु ज्यांना गांधींच्या या कृतींतलें रहस्य समजत नाहीं, असे लोक गांधींना नादान व आततायी म्हणून त्यांच्या तत्वाचा विपर्यास करण्याचा शक्य तितका प्रयत्न करतात. आणि आश्चर्य हें कीं, देशाचा घात करण्याचें कार्य प्रत्यक्ष करूनहि हे लोक आपणांस राष्ट्रभक्त म्हणवून घेण्यास दिक्कत बाळगीत नाहींत. ज्या शिक्षणानें राष्ट्राचा एवढा अधःपात झाला, तें शिक्षण या देशभक्तांना पाहिजे, कायदा आणि न्याय हीं केवळ जेथें दंडनीतीच्या आश्रयानें राहतात, अशा न्यायकचेऱ्यांना राष्ट्र कंटाळलें असतां त्या या देशभक्तांना पाहिजेत आणि ज्या कौन्सीलांत राष्ट्राचा क्षणोक्षणीं अपमान होतो, असलीं कौन्सीलेंहि या देशभक्तांना पाहिजेत. याचा अर्थ इतकाच कीं, देशद्रोह आणि देशभक्ति हीं दोन आहेत. असें मानण्यास हे देशभक्त तयार नाहींत. दररोज शेंकडों जीव नष्ट करणाऱ्या खाटकानें आपणास अहिंसावादी म्हणावें, यांतलीच ही देशभक्ति आहे. वस्तुतः ज्यांची ज्ञानतत्त्व अशुद्ध आहे, स्वार्थाच्या कल्पनेनें ज्यांचें ज्ञानबीज करपून गेलें आहे, आणि ऐश्वर्यमदानें ज्यांची मति आधीच भ्रष्ट झाली आहे, असे हिंदी प्रजाजन गांधी यांच्या मागून अगदहार योगाच्या होमकुंडांत उड्या टाकण्यास कधीं काळीं तयार होतील, हें मुळीं शक्यच नाहीं. ब्रिटिश राजशासन संस्थेनें हा जो शिक्षणिक विषवृक्ष लावून ठेवला आहे, त्याची पाळेंमुळें फार खोल गेलीं आहेत आणि गांधी यांच्या चळवळीच निराशेचें जें मुख्य स्थान आहे, तें हेंच होय; तथापि महात्माजींनीं हा वृक्ष अवघ्या दोन वर्षांच्या अवधींत मुळासुद्धां हलविला असून तो उपटून कसा काढावयाचा हें आतां

त्यांच्या अनुयायांच्या लक्षांत येऊन चुकलें आहे. या कार्यास बरेच दिवस लागतील हें खरें; परंतु हा विषवृक्ष उन्मळून पडल्यावांचून राहणार नाहीं, हें मात्र निश्चित. देशांतला शिक्षकवर्ग, वकीलवर्ग, नौकरवर्ग; अधिकारीवर्ग आणि व्यापारीवर्ग यांपैकीं पुष्कळांच्या मनांत आपल्या देशाचें हित व्हावें असें खरोखरच आहे व त्यासाठीं ते गेलीं ३०।४० वर्षे प्रामाणिकपणें प्रयत्नहि करीत आहेत; परंतु त्यांना यशाचा एक अल्पांशहि प्राप्त झाला नाहीं. याचें कारण हेंच कीं, आपल्या ऐश्वर्याला व सुखसोयीला धक्का न लागतां स्वराज्य मिळावें, असें त्यांना वाटत होतें. कित्येकांनीं या पेक्षांहि पुढें जाऊन सरकारावर विलक्षण कडक लेख लिहिले आणि कांहीं गरम डोक्याचा तरुणांनीं बांबगोळे उडविण्यासारखें अत्याचारहि केले. या दोन्ही वर्गांतल्या लोकांना जो तुरुंगत्रास भोगावा लागला, तो केवळ देशासाठीं भोगावा लागला, हें कोणीहि कबूल करील. तथापि या देशभक्तीच्या बुडाशींहि ऐश्वर्यवाद कायमच होता. उच्च अथवा हीन अशा स्वार्थाचा वास या चळवळींत होता आणि ह्मणूनच या सगळ्या प्रयत्नांचा उपयोग राजशासन संस्था विस्कळित होण्यांत न होतां, ती अधिक बळकट होण्यांत मात्र झाला आणि महात्मागांधी सारखा मानवजातीच्या कल्याणाची आकांक्षा बाळगणारा कर्मकुशल योगी जर या वेळीं भरतभूमीस लाभला नसता, तर ही स्वराज्याच्या चळवळीची गाडी पूर्वीच्याच चकारीनें शतकानुशतकें चालू राहिली असती.

महात्मागांधींनीं हा सर्व मनु पालटून टाकला आहे. जुलुमानें गांजलेल्या कोणत्याहि देशांतल्या जनतेला त्यांनीं आपल्या मुक्तीचा मार्ग अगदीं सुगम करून दिला आहे. 'तुम्ही पशुत्वाच्या सर्व भावना सोडून व मनुष्यत्वाचे सर्व अधिकार मिळवून स्वतः स्वतंत्र व्हा म्हणजे तुमचें राष्ट्र तुमच्याबरोबर सहजच स्वतंत्र होईल.' ही त्यांच्या असहकार योगाच्या संहितेंतली मुख्य ऋचा आहे. साधरण जनतेला हा मंत्र वेदवाक्याप्रमाणें वाटत असून आपला विजय निश्चयानें यांतच आहे, ही त्यांची पक्की खात्री आहे. ब्रिटिश राजशासन संस्थेच्या पोलादी भिंतीवर पूर्वीचें राजकारणपटू ३०।४० वर्षे डोकीं आपटून घेत होते; परंतु महात्मा गांधींनीं अवघ्या दोन वर्षांच्या अवधींत आपल्या असहकार योगबळानें ही पोलादी भिंत खिळ खिळी करून टाकली आहे. पूर्वींच्या राजकारणपटूंचें अर्धं शतकाचें कार्य आणि महात्माजींचें दोन वर्षांचें कार्य जनतेपुढें स्पष्ट असतां कांहीं उपटसुंभांनीं आपल्या हातांतल्या साधनांचा दुरुपयोग करून गांधींना अव्यवहार्य व आततायी म्हणण्यासाठीं वाटेल तितका टाहो फोडला, तरी राष्ट्र या गोष्टीवर कान देत-

काहि विश्वास ठेवणार नाहीं. स्वार्थाशिवाय जन्मभर ज्यांनीं दुसरा धंदा केला नाहीं, असे लोक जर जनतेच्या कल्याणासाठीं पुढें आले, तर साधारण जनता 'दगारे दगा ! सांभाळा !' असें मनांतल्या मनांत म्हणून साशंक व सावध होईल हें उघड आहे. *या असल्या स्वार्थसाधू भोगासक्त पोकळ देशभक्तावर साधारण जनतेचा काडीइतकाहि विश्वास नसून महात्माजींवर जी एवढी त्यांची श्रद्धा आहे,* त्यांचें कारण महात्माजींनीं त्यांच्या साठीं आपलें सर्वस्व देऊन टाकलें आहे. आज महात्माजी अकिंचन आहेत. एवढेंच नव्हे तर आपणाकरतां वधस्तंभ तयार केला गेला आहे, असे महात्माजींना समजलें, तर ते हंसतमुखानें व आपल्या पायानें केवळ जनतेसाठीं म्हणून वधस्तंभाजवळ जाऊन उभे राह-तील. *अशा या अलोट धैर्याच्या शूर पुरुषाला जे भित्रा व व्यवहारशून्य म्हण-तात, त्यांनीं स्वतः अगोदर आपल्या माणुसकीचा जमाखर्च तपासून पहावा* आणि मग आपल्या लेखणीला व जिव्हेला स्वैर सोडावें.

जनतेचा महात्मा गांधींवर जो एवढा अढळ विश्वास आहे, त्याचें कारण हें कीं, आपल्या प्रयत्नाचें यश आपल्या जवळ उभें आहे, हें गांधींनीं या जनतेच्या अनुभवास आणून दिलें. आपलें दैन्य व्यक्त करून कोणाजवळ कांहीं मागूं नका, हें गांधींचें तत्त्व त्यांना पटलें असून त्यांच्या शिकवणीनें चरखा व शेती या उपजिविकेच्या साधनावर ही जनता प्राणापेक्षांहि अधिक प्रेम करूं लागली आहे.

*आज सुमारें पंचवीस हजार राष्ट्रभक्त, तुरुंगांत असून यांत आपणा अमे-रिकनास सुपरिचित असलेले लाला लजपतराय* आहेत. चित्तरंजनदास या नांवाचे एक सुप्रसिद्ध व महिन्यास हजारों रुपये मिळविणारे बंगाली ब्यारिस्टर व असेच अनेक खरे देशभक्त तुरुंगांत खिचपत पडले आहेत. आणि आतां स्वतः महात्माजीहि त्याच तुरुंगांत देह झिजवीत आहेत. अशा या सोन्यासारख्या आलेल्या संधीच्या वेळीं एका नवीन पंथाचे लोक पुढें आले असून साधारण जनतेचा बुद्धिभेद करण्याचा कार्यक्रम त्यांनीं हातीं घेतला आहे. *ही सगळी चळवळ नासून टाकण्याचा त्यांनीं विडा उचलला आहे; परंतु या पापकर्मांत त्यांना यश येईल असें मला वाटत नाहीं. हे नव्या पंथाचे लोकहि आपणास राष्ट्रीय म्हणवितात आणि देशाचें कल्याण साधून स्वराज्य मिळवावें,* एवढ्यासाठींच आपण प्रयत्न करीत आहों, असेंहि ते भासवितात; परंतु त्यांच्या प्रयत्नाची दिशा अगदीं निराळी आहे आणि यावरूनच ते खरोखर कोण आहेत, याची ओळख पटण्यासारखी आहे. पोटांतलें पाणीहि न हलवितां, आपल्या सुख-

सोयी यत्किंचितहि कमी न करतां आणि आपल्या स्वार्थाला यत्किंचितहि धक्का न लावतां, स्वराज्य मिळविण्याचा त्यांनीं चंग बांधला आहे. कौन्सीलांत शिरून भालदार चोपदारांच्या ललकाऱ्या घ्याव्यात, विजेचे पंखे फिरत असलेल्या सभामंडपांत मोर्चेलें उडवीत दरबारी थाटानें रिघाव करून घ्यावा, मखमुच्या मऊ गादीच्या सुंदर खुर्चीवर देहलतिका टाकून ठेवावी आणि रुचेल पचेल असे तोळा माशानें बोलून राजशासन संस्था आपलीशी करावी, अशी या नामधारी राष्ट्रभक्तांची आकांक्षा आहे. ही लाट विशेषतः महाराष्ट्रांत अधिक पसरली आहे; परंतु या हातचलाखी करणाऱ्या राष्ट्रभक्तांना राष्ट्रानें ओळखलें असून सर्व साधारण जनताहि प्रतिहल्ल्याची तयारी जोरानें करीत आहे. माझी तर अशी समजूत आहे कीं, हे राष्ट्रभक्त जेव्हां कौन्सीलांत जाऊन बसतील, तेव्हां राष्ट्राच्या प्रचंड लोकमतापैकीं दोन, अडीच किंवा साडेतीन मतें पदरीं पडून त्यांना कौन्सीलच्या रमण्यांत वाट मिळाल्याचें आढळून येईल. एका वयोवृद्ध विद्वान महाराष्ट्रीय गृहस्थाची मी मुद्दाम गांठ घेऊन ही जी राष्ट्रविघातक चळवळ कोठें कोठें दिसते, त्यांतलें रहस्य समजावून घेतलें. तो म्हणाला, "हे लोक अगदीं थोडे आहेत. आणि त्यांना राष्ट्राचे पुढारी कोणीहि समजत नाहींत. इतकेंच नव्हें तर त्यांचा सगळ्यांना तिरस्कार वाटूं लागला आहे. हे दांभिक राष्ट्रभक्त कौन्सीलांत जाऊन स्वराज्य मिळविणार असें म्हणतात; याचा उघड अर्थ असा आहे कीं, सरकारचें सरकारपण जसेंच्या तसें मागण्याचा ही भिक्षुक मंडळी मोठ्या निकराचा प्रयत्न हल्लींच्या राजशासन संस्थेकडे करणार. राष्ट्राच्या दुर्दैवानें ही गोष्ट घडून आली, तर आज जेथें जॉर्ज लाईड गव्हर्नर आहेत, त्या जागीं आमचे सोमाजीराव कापसे दृष्टीस पडतील आणि सैन्याचीं सूत्रें जनरल गोमागणेश यांच्याकडे जातील. परंतु एवढा जरी चमत्कार घडून आला तरी, गरीबाच्या पानांतली अर्धी भाकरी सगळी होणार नाहीं आणि त्याच्या अंगावरच्या चिंध्या जाऊन त्याला धड वस्त्रहि मिळणार नाहीं. इतकेंच नव्हे तर हें अन्नवस्त्र या नव्या राजशासन संस्थेजवळ आम्ही जर थोड्या अट्टाहासानें मागूं लागलों, तर आमचे जनरल गोमागणेश जनरल डायरप्रमाणें निरपराध व निःशस्त्र बायकामुलांवर तोफ डागण्यासहि कमी करणार नाहींत. सारांश इतकाच कीं, राजशासनसंस्थेंतल्या व्यक्तींत केवळहि बदल झाला, तरी त्याचा राष्ट्राला कांहीं उपयोग नाहीं. या हल्लींच्या राजशासन संस्थेचें स्वरूप राष्ट्राला पायापासून बदलून सगळी इमारत नवी रचावयाची आहे. केवळ पाश्चात्यांच्या पार्लमेंटरी कल्पनांना सर्वस्व समजून त्यांचा ऐश्वर्य-

वाद जशाचा तसा जे हिंदुस्थानात आणूं पहातात, त्यांचा हेतु हिंदुस्थानाला स्वराज्य द्यावयाचें नसून हिंदुस्थानांवर आधिराज्य गाजवावयाचें आहे, हें अगदीं उघड होय.''

आज खुद्द ईंग्लंडांतील जनतेवर ब्रिटिशांचें म्हणजे तेथील जनतेच्या जातभाईंचेंच राजशासन आहे. अमेरिकेंत अमेरिकन लोकांचेंच राजशासन आहे. येथील राज्यकारभार पार्लमेंटरी पद्धतीनें म्हणजे लोकानुवर्ती चालतात, असा पुष्कळांचा भ्रम आहे. खरी वस्तु स्थिति अशी आहे कीं, हल्लीं असल्या राजशासनसंस्था एक मुखी बनतात व देशांतल्या गरीबांवर सारखेच जुलूम होतात. तिकडच्या शेतकऱ्यांचे व मजुरांचे प्रतिनिधी पार्लमेंटांत असतां त्या बिचाऱ्या मजुरांना अखेरीस आपली दाद लावून घेण्यासाठीं संप पुकारावे लागतात. असल्याप्रसंगीं दांब गोळयांची फेकाफेकी आणि गोळीबार हेहि प्रकार या पार्लमेंटरी संस्थांच्या नजरेखालींच होतात. सगळा देश नको नको म्हणत असतां एकटे वुड्रोवुईलसन राष्ट्रानें त्यांच्या हातांत दिलेल्या सत्तेचा उपयोग करून जर्मनी बरोबर लढाई पुकारून सगळया जगाच्या शांतीचा नाश करूं शकतात, ही गोष्ट जगानें नुकतीच पाहिली आहे. ब्रिटिश पार्लमेंटांतहि हेच प्रकार आज राजरोस घडत आहेत. तेव्हां असल्या पार्लमेंटरी संस्था पाश्चात्यांकडून हिंदुस्थानांत उसन्या आणून जे हे महाराष्ट्रीय स्वराज्याच्या वल्गना करतात, त्यांना स्वराज्य आणावयाचें नसून आपलें राज्य जनतेवर लादावयाचें आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. महाराष्ट्रांतल्या या असल्या लोकांना असें वाटतें कीं, आपलें सरकारपण गहाण पडलें होतें. सावकाराची दामदुप्पट फेड झाली आहे, तेव्हां तें त्यानें आतां आमच्या स्वाधीन करावें. मुद्दा एवढाच कीं जे पक्ष आज महात्मा गांधींशीं विरोध दर्शवित आहेत, ते सर्व ऐश्वर्याचे दास आहेत. त्यागाची नुसती कल्पनाहि त्यांच्या चित्ताला भयप्रद वाटते, आणि म्हणून दोन्ही घडींवर हात ठेवून ते जी तोंडचशी पडण्याची शर्यत जिंकू पहात आहेत, त्यांत ते यशस्वी झाल्यावांचून रहाणार नाहींत. गेल्या अर्ध शतकांत राजकारणपटू म्हणून ज्यांचीं नांवें इतिहासांत दाखल झालीं होतीं, तीं नांवें राष्ट्र पुरुष आज विसरून गेला आहे. अर्थात् आज जे राजकारणपटू म्हणून राष्ट्राचा घात करूं पहात आहेत, तीं नांवेंहि या राष्ट्र पुरुषाला ध्यानांत ठेवण्याचें कारण पडणार नाहीं. याचें कारण इतकेंच कीं, हे लोक राजशासन संस्थेंत इतके मिळून जातात कीं, साधारण जनतेला ते आपले आहेत, असें वाटत नाहीं आणि तेहि लोकगंगेला आपली समजत नाहींत.

महात्मागांधी यांचें स्वराज्य या पासून अगदीं वेगळें आहे. लोकगंगा हेंच त्या स्वराज्याचें सिंहासन, लोकगंगा हाच त्या स्वराज्याचा राजदंड आणि लोकगंगा हेंच या स्वराज्याचें सर्वस्व होय. या असल्या स्वराज्याची सगळें जग वाट पहात आहे, आणि हिंदुस्थानानें एकदां हें स्वराज्य मिळविलें म्हणजे सगळें जग आपोआप या मार्गानें आपलें ध्येय गांठण्याचा प्रयत्न करील.

एक अमेरिकन प्रवासी.